# उपयुक्त कथासंग्रह.

## भाग १ ला.

हें पुस्तक

विद्वान् मंडळीच्या साहाय्यानें

**नारायण रामचंद्र सोहनी**

यांनीं

तयार करून

**मुंबईंत**

आपल्या

जगदीश्वर छापखान्यांत छापिलें.



**आवृत्ति १० वी.**

शके १८०९

सन १८८८

( हें पुस्तक सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें

रजिस्टर केलें आहे. )

**किंमत २ रुपये.**

# प्रस्तावना.

प्राचीनकाळीं या हिंदुस्थानांत संस्कृत भाषा फार चालत होती, यामुळें धर्मसंबंधी ग्रंथ त्याच भाषेंत झाले आहेत. परंतु उत्तरोत्तर संस्कृतभाषेची अनभिज्ञता होऊन प्राकृत भाषा फारच प्रचारांत आल्याकारणानें सहजच ते ग्रंथ लोकांस समजण्यास कठीण पडतें. यामुळेंच त्यांतील कांहीं उपयुक्त ग्रंथांचीं भाषांतरें होऊन त्यांवर आमच्या लोकांची श्रद्धा बसत चालली आहे. आपल्या नेहमीच्या व्यवहारांत अनेक व्रतादि कृत्यें येतात, परंतु तीं सर्व प्राकृत भाषेंत नसल्यामुळें त्यांचा मूळ हेतु काय असतो तो बरोबर कळत नाहीं. यास्तव जीं प्राकृत झालेलीं आहेत त्यांतून कांहीं घेऊन व जीं प्राकृत झालेलीं नाहींत तीं शास्त्री यांजकडून प्राकृत ओंवीबद्ध करवून त्या सर्वांचा या पुस्तकांत अनुक्रमानें एकत्र संग्रह केला आहे. सर्व विषय एकत्र असल्यानें ग्राहकांस किंमतीकडून स्वल्प पडून ग्रंथ संग्रह करण्यास फार सोईवार पडतें. यांत प्रातःस्मरणादि विषय प्रथम घालून नंतर वर्षारंभापासून अनुक्रमानें येणारे विषय घातले आहेत, तेणेंकरून हें पुस्तक विशेष ग्राह्य होईल अशी आशा आहे.

या पुस्तकाच्या नऊ आवृत्तींच्या प्रती खपल्यामुळें आणि बहुत लोकांस पुस्तकांची गरज असल्याकारणानें ही दहावी आवृत्ति छापली आहे.



# अनुक्रमणिका.



# उपयुक्तकथासंग्रह.

## भूपाळ्या.

### भूपाळी गणपतीची.

श्रीगणेशायनमः ॥ उठाउठाहोसकळिक ॥ वाचेंस्मरावा गजमुख ॥ सिद्धिबुद्धी-
चानायक ॥ सुखदायकभक्तांसी ॥ १ ॥ आंगीशेंदुराचीउटी ॥ माथांशोभ
तसेकिरीटी ॥ केशरकस्तूरीललाटीं ॥ कंठींहारसाजिरा ॥ २ ॥ कानींकुंडलां
चीप्रभा ॥ चंद्रसूर्यजैसेनभा ॥ माजीनागबंदशोभा ॥ स्मरतांउभाजवळी
तो ॥ ३ ॥ कासेपीतांबराचीधटी ॥ हातीं मोदकांचीवाटी ॥ रामानंदस्मरतां
कंठीं ॥ तोसंकटींपावतो ॥ ४ ॥

### भूपाळी गणपतीची.

विद्याधराविनायका ॥ ऋद्धिसिद्धींच्यानायका ॥ वक्राननातूंसुखदायका ॥ ·
ध्यायकहृदयींहृदयस्थ ॥ १ ॥ ध्रु० ॥ हेसच्चिदानंदामूळस्तंभा ॥ अचळासगुण
मूर्तीस्वयंभा ॥ सकळाआदीप्रियप्रारंभा ॥ तुजहेरंबानमोस्तुते ॥ २ ॥ जय
सिंधुरारीप्रियसिंदूरा ॥ चर्चिततनुभूषितसुंदरा ॥ भक्तिमंदिरांगणामांदारा
॥ मूषकवाहनाजगद्गुरू ॥ ३ ॥ मंगळमूर्तीमंगळनामा ॥ मंगळकारकमंग
ळधामा ॥ भक्तजनांच्याहृदयारामा ॥ मनविश्रामा विघ्नहरा ॥ ४ ॥ हेत्रि
पुरांतकत्रिभुवनभूपा ॥ त्रिकाळत्रिदशध्यानअमूपा ॥ त्र्यंबकविनवीत्रि
तापदर्पा ॥ करींकृपाश्रीएकद्विजा ॥ ५ ॥

### भूपाळी गणपतीची.

उठिंउठिंबालंबोदरा ॥ चौद्याविद्यागुणगंभीरा ॥ हरणकर्ताविघ्नेश्वरा ॥ मो
रेश्वरादीनबंधू ॥ १ ॥ ध्रु० ॥ तुझेंनामघेतांआधीं ॥ सकळहरतीआधीव्या
धी ॥ प्राप्तहोतीऋद्धिसिद्धी ॥ दयानिधीगजानना ॥ २ ॥ सरळशुंडाअ-
लोलिक ॥ मस्तकींमुकुटतेजाधिक ॥ झळकतासिंदुराचाटिळक ॥ लज्जित
मृगांकपाहूनी ॥ ३ ॥ निर्जरसर्वहीमिळूनिआले ॥ द्वारींतिष्ठतांभगले ॥ तु
झेंस्वरूपचांगलें ॥ मनींरंगलेंसर्वांच्या ॥ ४ ॥ नारदतुंबरगायनकरी ॥ ऋद्धिसि

दीजोडुनीकरीं ॥ त्यांच्याकार्यानूं साह्यकारी ॥ होउनि इच्छांपुरवीसी ॥ ५ ॥
उठाउठासकळलोक ॥ आधींस्मरागणनायक ॥ प्रपंचअवघाहामायिक ॥
नदिसेसुरचपळएक ॥ ६ ॥ वरुणयमराजाइंद्र ॥ व्यासशुकतोयोगींद्र ॥ भावें
स्मरतीभालचंद्र ॥ तोभोगींद्रपाताळीं ॥ ७ ॥ उठोनीवेगींएकरदन ॥ देईं सकळां-
सीदर्शन ॥ करवीकरूनिसुरवरगण ॥ जीवनरूतासीआश्वासी ॥ ८ ॥

## भूपाळी रामाची.

रामसर्वांगींसांवळा ॥ हेमअळंकारपिंवळा ॥ नानारत्नांचीयामाळा ॥ अलंका
रशोभती ॥ १ ॥ ध्रु० ॥ पिंवळामुगुटकीरीटी ॥ पिंवळेंकेशरलल्लाटीं ॥ पिंवळ्या
कुंडलांचीथाटी ॥ पिंवळ्याकंठींवनमाळा ॥ २ ॥ पिंवळाकासेपीतांबर ॥ पिंव
ळाब्रीदाचातोडर ॥ पिंवळ्याघंटांचागजर ॥ पिंवळ्यावांक्यारुणझुणती ॥
॥ ३ ॥ पिंवळेंपदककरभूषण ॥ पिंवळेंहातींवीरकंकण ॥ पिंवळ्यामुद्रिकांचें
लेणें ॥ पिंवळेंकरींशरचाप ॥ ४ ॥ पिंवळामंडपविस्तीर्ण ॥ पिंवळेंमध्येंसिंहा
सन ॥ रामसीतालक्ष्मण ॥ दासगुणगातसे ॥ ५ ॥

## भूपाळी रामाची.

उठोनियांप्रातःकाळीं ॥ जपारामनामावळी ॥ स्वयेंध्यातोचंद्रमौळी ॥ शै
ळबाळीसमवेत ॥ १ ॥ ध्रु० ॥ रामयोग्यांचेंमंडण ॥ रामभक्तांचेंभूषण ॥ राम
धर्माचेंरक्षण ॥ संरक्षणदासांचें ॥ २ ॥ रामेंताटिकावधियेली ॥ रामेंशिळा
उद्धारिली ॥ रामेंजानकीजिंकिली ॥ मुक्तकेलीगणिका ॥ ३ ॥ रामेंपाषाणता-
रिले ॥ रामेंदैत्यसंहारिले ॥ रामेंबंधसोडविले ॥ करवीकेलेकरवर ॥ ४ ॥ रा
मेंरक्षिलेंभक्तांसी ॥ रामेंसोडविलेंदेवांसी ॥ रामभक्तांचेमानसीं ॥ राम-
दासींआनंद ॥ ५ ॥

## भूपाळी रामाची.

सूर्यवंशीवंशावळी ॥ राजेझालेभूमंडळीं ॥ स्मरात्यांचीनामावळी ॥ उदय-
काळींभानूच्या ॥ १ ॥ ध्रु० ॥ सूर्यवंशीमनुजाहला ॥ त्याचाइक्ष्वाकूजन्मला
तेथूनिवंशविस्तारला ॥ पृथुजाहलामहीपाळ ॥ २ ॥ उत्तानपादराजाथोर ॥
ध्रुवअढळपदींनिर्धार ॥ धुंधुमारत्याचापुत्र ॥ राजेपवित्ररविवंशीं ॥ ३ ॥

मांधातापुण्यश्लोक॥ शिबिझालासत्वाधिक॥ हरिश्चंद्रबहुधार्मिक॥ राजेअनेकसत्वस्थ॥ ४॥ रुक्मांगद त्याचेवंशीं॥ व्रतपाळीएकादशी॥ धर्मांगदत्याचेकुशीं॥ अंबरीषव्रतवंत॥ ५॥ सगरींकरितांसागरम्हणती॥ भगीरथेंआणिलीभागीरथी॥ तेथूनिककुत्स्थउत्पत्ति॥ रामम्हणतीकाकुत्स्थ॥ ॥ ६॥ दिलीपराजाबहुभला॥ त्याचापुत्र रघुशोभला॥ तयापासुनीअज जाहला॥ जोवर्णिलाऋषिवर्यें॥ ७॥ दशरथ वंशींपुत्रचारी॥ श्रीरामजडजीवांउद्धरी॥ पुढेंकुशाचेउदरीं॥ कलिनाशनऋतुपर्ण॥ ८॥ ऐसेराजेप्रतापकीर्ती॥ भास्कर वंशाचीउत्पत्ती॥ आणिकहीराजेअसती॥ नेणोंकितीसुरनर॥ ९॥ सूर्यवंशींचेंभूषण॥ रामगावाकुळमंडण॥ महादोषांचेंदंडण॥ संरक्षणदासाचें॥ १०॥

## भूपाळी रामाची.

उठोनियांप्रातःकाळीं॥ मूर्तीचिंतावीसांवळी॥ शोभेयोगियांचेमेळीं॥ हृदयकमळींसाजिरी॥ १॥ ध्रु०॥ रामसर्वांगींसुंदर॥ कासेशोभेपीतांबर॥ चरणींब्रीदांचातोडर॥ करुणाकरभक्तांसी॥ २॥ रामलावण्याचाराशी॥ रामकैवारीदेवांसी॥ रामभक्तांचेमानसीं॥ अहर्निशींशोभतो॥ ३॥ रामपुण्याचेंमाहेर॥ रामतापसांआधार॥ रामाध्यातोगौरीहर॥ निरंतरमानसीं॥ ४॥ रामविश्रांतीचेंस्थळ॥ रामआनंदकेवळ॥ रामदाससर्वकाळ॥ चिंतीवेळऐसाची॥ ५॥

## भूपाळी रामाची.

उठाउठाहोहरिजन॥ वाचेंस्मरारघुनंदन॥ तेणेंतुटेलभवबंधन॥ पतीतपावनदीनबंधू॥ १॥ ध्रु०॥ रामकौसल्यानंदन॥ रामयोगियांचेंध्यान॥ रामसकळांचेंजीवन॥ कीर्तिमहिमानवर्णवे॥ २॥ रामत्रैलोक्याचेंरूप॥ रामपरब्रह्मस्वरूप॥ रामनामचिअमूप॥ महाचिद्रूपकेवळहें॥ ३॥ सुंदरशोभेसिंहासन॥ समीपबंधूलक्ष्मण॥ वामभागींसीतारत्न॥ केवळनिधानजनकाचें॥ ॥ ४॥ छत्रधरूनीउभाभरत॥ चामरशत्रुघ्नवारित॥ करजोडूनियांहनुमंत॥ रुद्रावतारसेवेसी॥ ५॥ ज्याचीसत्तात्रिभुवनीं॥ त्याचागुरुवसिष्ठमुनी॥ शंकरजपतोराममनीं॥ तोअभिमानीभक्तांचा॥ ६॥ मारुनिराक्षसआणिराव

ण॥ सखीकेलेसखरगण॥ करीभक्तांचेंपालनं॥ कृपानिधानरघुवीर ॥७॥ रामनयनींआदींपहा॥ रामनटलास्वरूपेंदहा॥ रामकेंदापीसोडूनं काहा॥ सत्वरपहारामासी॥८॥ रामसर्वहिकाळगावा॥ रामहृदयींहा- ध्यावा॥रामम्हणतांहोयविसावा॥ स्मरतजावामानसीं॥९॥रामंमंत्रह्या चिसत्य॥रामींहोतीअवघेरत॥ रामनामाचाअंकित॥जीवनसुतसाष्टांगीं ॥१०॥

## भूपाळीकृष्णाची.

उठोनियांप्रातःकाळीं म्हणतीगोपिकाबाळा॥ आमुचागळाकापुनमगतूंजा ईंगोपाळा॥१॥ध्रु०॥तुझियाविरहानळेंआह्मांसीहोतोउबाळा॥वसंतगेलाम धुरेउद्धवंआलाउन्हाळा॥२॥पापीअक्रूरआलाजन्मांतरींचावेरी॥मुरळेंघा- लुनिघेउनिगेलाआमुचाश्रीहरी॥३॥बराकिंरेअक्रूराआपुलाबोलसाधिला॥ आडामध्येंघालुनिसखयादोरकापिला॥४॥धिक्धिक्आमुचेंजिणेंजळोहें लाजिरवाणें॥शेवटगोडनकेलारेसखयागेलारेप्राण॥५॥ अंधकूपांतूनका- ढींसंखयादीनोद्धारणा॥मध्वनाथशरणागताचीचिंतावारणा॥६॥

## भूपाळी कृष्णाची.

उठिंउठिंबामुरारी॥ दवडुनी झोंपेच्यालहरी॥ सूर्यउगवलागगनोदरीं॥ पू र्णदिशाफांकल्या॥१॥ध्रु०॥ आलेसखेवनासिजाया॥जागृतहोईंयादव राया॥पावनजनांसीकराया॥ स्वरूपदावींआपुलें॥२॥ सभाबेसलीआं गणीं॥ ऋषीबेसलेतारांगणीं॥ उमाकांतसकळिकजनीं॥भक्तीलागींपात ले॥३॥ त्र्यंबकसकळांसीकरजोडी॥ स्वानंदाचीउभवीगुढी॥ संतबेसवि लेप्रौढीं॥अतिआवडीदर्शनाची॥४॥

## भूपाळीकृष्णाची.

उठिंउठिंबागोपाळा॥ माझ्यातान्ह्याबाळा॥मित्रआलाउदयाचळा॥उघ डींडोळेराजसा॥१॥ध्रु०॥ गाईबाहतीदोहनाला॥ द्वारींउभागोपाळमेळा॥ उशीरहोतोमंथनाला॥मुखप्रक्षाळावेगेंसी॥२॥तुझाबळिरामबंधू॥ सोडु निआलाक्षीरसिंधू॥ तूंकांनिजसीदीनबंधू॥सौख्यसिंधूदातारा॥३॥ दुबळा मैत्रतोसुदामा॥ धांवुनिआलासेगुणधामा॥ पोहेभक्षूनित्याच्याश्रमा॥

उठोनीसत्वरपरिहारीं ॥ ४॥ अवघागौपिकांचामेळा ॥ धांवुनिआलारेघन-
नीळा ॥ घालुनिबैसलाकींपाळा ॥ त्रिभुवनडोळांपाहांवेगें ॥ ५॥ उठिंसत्वर
गेकान्हाई ॥ मजलाम्हणसीजरितूंआई ॥ स्तनींचापान्हावेगेंपिईं ॥ दर्शन
देईंसकळांसी ॥ ६॥ सकळकाष्ठांचींबाहुलीं ॥ तूंचीइतुक्यांचीमाउली ॥ आ
ह्मींवत्सतूंगाउली ॥ करीसाउलीकृपेची ॥ ७॥ बहुतजन्मींतपकेलें ॥ ह्मणउ
नितुजलाजरिपाहिलें ॥ दुःखअवघेंविसरलें ॥ सुखझालेंसकळांसी ॥ ८॥
मागतेंतुजलाएकदेवा ॥ कृष्णागोविंदाकेशवा ॥ प्रपंचअवघाह्मातोडावा
॥ ठावद्यावातुजपाशीं ॥ ९॥ ऐकुनिनिजमातेच्यागोष्टी ॥ जागाझालाजग
जेठी ॥ यशोदेच्याकंठींमिठी ॥ वेगेंघालीसप्रेम ॥ १०॥ बोलेवेगेंसर्वेश्वरू ॥
तूंचीमायमीलेंकरू ॥ तूंचिगायमीवासरू ॥ कैसाविसरूंतुजलागीं ॥ ११ ॥
लोकम्हणतीमिथ्यागोष्टी ॥ मीजन्मलोंतुझियापोटीं ॥ देईंदह्यादुधांचीवा
टी ॥ सत्वरपान्हामजदेईं ॥ १२॥ ज्याचीसकळलोकींसत्ता ॥ यशोदेसीम्हण
तोमाता ॥ आनंदझालाजीवनसुता ॥ गुणवर्णितांसद्गुरूचे ॥ १३॥

## भूपाळी घनश्यामाची.

घनश्यामसुंदराश्रीधराअरुणोदयझाला ॥ उठिंलौकरवनमाळीउदयाच-
ळींमित्रआला ॥ ध्रु० ॥ सायंकाळीं एकेमेळीं द्विजगणअवघेवृक्षीं ॥ अरुणो
दयहोतांचिउडालेचरावयापक्षी ॥ अघमर्षणादिकरूनितापसीतपाचरण
दक्षी ॥ प्रभातकाळींउठुनिकापडीतीर्थपंथलक्षी ॥ करूनिसडासंमार्जन
गोपीकुंभघेउनिकुक्षी ॥ यमुनाजळासिजातिमुकुंदादध्योदनभक्षीं ॥
चाल ॥ मुक्तताहोऊंपाहेकमळणीपासुनभ्रमरा ॥ पूर्वदिशेमुखधुतलें
होतसेनाशतिमिरा ॥ उठलौकरगोविंदासांवळ्यानंदकुमरा ॥ मुखप्रक्षा
ळनकरीं अंगिकारींभाकरकाला ॥ उठिंलौ० ॥ १॥ घरोघरींदीपअखंडत्यां
च्यासरसावुनिवाती ॥ गीतगातीसप्रेमेंगोपीसदनायेतीजाती ॥ प्रवर्तो
निगृहकामींरंगमाळाघालूंपाहती ॥ आनंदकंदाप्रभातझालीउठसरली
राती ॥ काढींधारक्षीरपात्रेंघेऊनिधेनुहंबरताती ॥ द्वारींउभेगोपाळहाका
मारुनितुजलाबाहती ॥ चाल ॥ हेमुक्ताहारकंठींघालिंयारंगमाळा ॥ हा

तींवेत्रकाष्ठबरवें कांबळा घेईकाळा ॥ ममआत्मजमधुसूदनाहृषीके-
शिजगत्पाळा ॥ लक्षितातिवासरें हरि धेनुस्तनपानाला ॥ उठिलों० ॥ २ ॥ प्रा
तः स्नानेंकरूनिगोपिका अलंकारनटती ॥ कुंकुमादिचर्चुनीमंथनालागिं
आरंभिती ॥ प्रेमभरितअंतरांत वदनींनामावळिगाती ॥ अर्घ्यदानदेऊ
नियांद्विजगण देवार्चनकरिती ॥ नेमनिष्ठवैष्णवतेविष्णुपूजासमर्पिती ॥
स्मार्तेशिवार्चनशक्तीशाक्तआराधिती ॥ चाल ॥ ऋषिगणआश्रमवासीजे
निरंजनींधाले ॥ अरुणोदयींआपुलाले ध्यानींमग्नझाले ॥ पंचपंचउषःकाळीं
रविचक्रनिघोंआलें ॥ येवढावेळनिजलासि म्हणुनि हरि समजेलनंदाला ॥ उ
ठिलों० ॥ ३ ॥ विद्यार्थीविद्याभ्यासास्तवसादरगुरुपायीं ॥ अध्यापनगुरुकरिती
शिष्यअध्ययनउदयीं ॥ याज्ञिकजनकुंडीं आहुतीटाकितातिपाहीं ॥ रविप्रका
शपडुनियांउजळल्याशुद्धदिशादाही ॥ हेमाझेपाडसेसांवळेउठकृष्णाबाई ॥
सिद्धसवेंबळरामघेऊनिगोधनेंवनाजाई ॥ चाल ॥ मुनिजनमानसहंसागो
पीमनकमलभृंगा ॥ मुरहरपंकजपाणीपद्मनाभश्रीरंगा ॥ शकटांतकसर्वे-
शाहे हरिप्रतापभृंगा ॥ कोटिअनंगांहूनिआगळें तेजतववदनाला ॥ होना
जीबाळनित्यध्यातसेहृदयींनाममाळा ॥ ४ ॥ घनश्यामसुं० ॥

## भूपाळी कृष्णाची.

गवळणदसवंतीपैंसांगे ॥ आलियाकृष्णाचेनिमागें ॥ येणेंयेणेंहोश्रीरंगें
॥ नवनीतचोरिलेंमाझें ॥ १ ॥ ध्रु० ॥ नवेतळहातटेंकित ॥ डाव्यागुडघ्यानें
रांगत ॥ गवळ्याघरींशार्ङ्गनाथ ॥ तोम्यांदेखिलासय्ये ॥ २ ॥ एकेहातिंलो-
ण्याचाकवळू ॥ मुखमाखिलेंसेअळुमाळू ॥ चुंबनदेतांअतिपरिमळू ॥ नव
नीताचागसय्ये ॥ ३ ॥ येणेंमाझें कवाडउघडिलें ॥ येणेंमाझेंशिंकेंतोडि
लें ॥ दह्यादुधांतेंभक्षिलें ॥ लवंडिलेंतक्रातें ॥ ४ ॥ ऐसेंजरीमीजाणतें ॥ य
मुनापाण्यानवजातें ॥ धरूनिउखळासीबांधितें ॥ शिक्षालावितेंगोविं
दा ॥ ५ ॥ ऐसापुराणप्रसिद्धचोर ॥ स्वामीनाम्याचादातार ॥ पंढरपुरीं
धरिलाअवतार ॥ भक्तपुंडलीकासाठीं ॥ ६ ॥ गवळणदसवंतीपैंसांगे ॥

॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## भूपाळी कृष्णाची.

उठाउठाहोप्रभातझाली ॥ चिंताश्रीविठ्ठलमाउली ॥ दीनजनाचीसाउली ॥ येईधांवुनिस्मरतांची ॥ ध्रु० ॥ पंढरपुरींजेभीमातटीं ॥ सुंदरमनोहरगोमटी ॥ दोन्हीकरठेउनिकटीं ॥ भेटीसाठींतिष्ठतसे ॥ १ ॥ किरीटकुंडलेंमंडित ॥ श्रीमुखअतिसुंदरशोभत ॥ गळांवैजयंतीडोलत ॥ हारमिरधततुळशीचे ॥ २ ॥ सुरेखमूर्तीसगुणसांवळी ॥ कंठींकौस्तुभएकावळी ॥ केशरीउटीपरिमळेआगळी ॥ बुकाभाळींविलसतसे ॥ ३ ॥ पीतांबरकसिलाकटीं ॥ अक्षयवीटचरणतळवटीं ॥ सकळसौंदर्यसुखाचीपेटी ॥ हृदयसंपुटींआठवत्ये ॥ ४ ॥ अतिप्रियआवडेतुळसीबुका ॥ तसीचप्रीतिकरीभोळ्याभाविकां ॥ नामापदपंकजपादुका ॥ शिरींमस्तकावंदितसे ॥ ५ ॥

## भूपाळी विठ्ठलाची.

उठाउठाहोमुरारी ॥ बोलेरखुमाईसुंदरी ॥ भक्तगर्जतीमहाद्वारीं ॥ त्यांसीद्यावेंदर्शन ॥ १ ॥ ध्रु० ॥ राउळींजागेझालेहरी ॥ भक्तगर्जतीजयजयकारीं ॥ नारदतुंबरकीर्तनकरी ॥ प्रेमानंदेंडुल्लतसे ॥ २ ॥ सर्वपूजातुळसीपान ॥ घेउनिआलेभक्तजन ॥ द्यावेंतयांसीदर्शन ॥ विलंबकांहींनकरावा ॥ ३ ॥ ऐसाउगवलादिनकर ॥ भक्तगर्जतिजयजयकार ॥ तेथेंगणेशनाथकिंकर ॥ हरिचरणांवरलोळतसे ॥ ४ ॥

## भूपाळी विठ्ठलाची.

ब्रम्हनिर्गुणनिराकार ॥ विठ्ठलसगुणसंताकार ॥ अवतरलेंचराचर ॥ परब्रम्हसांवळें ॥ ध्रु० ॥ विठ्ठलसंतांचेंरूपडें ॥ प्रत्यक्षपाहोंनेत्रांपुढें ॥ त्यासीनजाणतांमूढें ॥ विषयजाळींगुंतलीं ॥ १ ॥ मुक्ताबाईसकळतनू ॥ दीप्तीसांवळीतोभानू ॥ प्रभावळीसरजगजीवनू ॥ अतिलावण्यशोभतसे ॥ २ ॥ ज्ञानदेवसुखकमळ ॥ निवृत्तिमुकुटाचाझळाळ ॥ सोपानदेवनिढळ ॥ आदिपुरुषरायाचें ॥ ३ ॥ मुकुंदराजतोअवधारीं ॥ श्रवणदेवाचेनिर्धारीं ॥ चांगाविसोबाखेचरी ॥ स्वयंप्रकाशझळकतसे ॥ ४ ॥ वडवळसिद्धनसाप्रट ॥ कबीरनामादोन्हीओंठ ॥ जिव्हातोचीमुद्गलभट ॥ निंबाभक्तन

जैतसे ॥ ५ ॥ बाहुदंडचोरवामेळा ॥ वहिरापिसा वक्षस्थळा ॥ जगमित्रकंठनाळा ॥ जोगामाळा गळ्याची ॥ ६ ॥ हृदयानंद योगीजाण ॥ अच्युता सारंगदोन्हीस्तन ॥ हृदयींरेणुकानंदन ॥ नाभीनरसीमेहता ॥ ७ ॥ कान्होपाठककटिप्रदेश ॥ मूधापीतांबरसुरेश ॥ चरणीं आलेरोहिदास ॥ सूरदास सातवा ॥ ८ ॥ नाराम्हादागोंदाविठा ॥ ह्या देवाच्याक्षुद्रघंटा ॥ जनीवांकीवाकेवाजतां ॥ तोडरएकाजनार्दना ॥ ९ ॥

## भूपाळी दशावताराची.

जनम्हणाहोश्रीहरी ॥ प्रातःकाळींस्मरणकरीं ॥ तेणेंतरालभवसागरीं ॥ ह्या निर्धारींभरंवसा ॥ १ ॥ ध्रु० ॥ वेदनेलेनिशाचरीं ॥ मत्स्यरूपझालेहरी ॥ कार्यब्रह्मयाचेंकरी ॥ शंखासुर वधोनियां ॥ २ ॥ दैत्यमातलेभूमंडळीं ॥ पृथ्वीनेली रसातळीं ॥ कूर्मरूपेंहोवनमाळी ॥ पृष्ठींधरिलीमेदिनी ॥ ३ ॥ महिडळमळलीपाहाहो ॥ देवजाहलेवराहो ॥ मगवधिलेदैत्यदानवो ॥ पृथ्वीदाढेधरूनियां ॥ ४ ॥ पुत्रपित्यानेंगांजिला ॥ तोनरहरीस्मरताझाला ॥ स्तंभींअवतार धरिला ॥ भक्तरक्षिलाप्रल्हाद ॥ ५ ॥ यागकरिताझालाबळी ॥ इंद्रकांपिन्नलाचळचळीं ॥ वामनरूपेंहोवनमाळी ॥ घालीपाताळींबळिराजा ॥ ६ ॥ रेणुकेउदरींभार्गवझाले ॥ राजेसमस्तसंहारिले ॥ राज्यब्राह्मणांदीधलें ॥ सुखीकेलेभूदेव ॥ ७ ॥ सूर्यवंशींरघुनंदन ॥ वानरसैन्यमेळवून ॥ सागर पाषाणींबांधुन ॥ संहारिलेंराक्षसां ॥ ८ ॥ कारागृहींअवतरले ॥ श्रीकृष्णगोकुळींवाढिन्नले ॥ कंसचाणूरमर्दिले ॥ राज्यींस्थापिलेंउग्रसेना ॥ ९ ॥ बौद्धअवतारधरिला ॥ जनहाबहुतकष्टिजाहला ॥ मगकलीसवरदिधला ॥ आपणराहिलानिद्रित ॥ १० ॥ पुढेंकलंकीहोणार ॥ ऐसाशास्त्रांचानिर्धार ॥ मगफिटेलभवसंदेह ॥ याहीविश्वजनाचा ॥ ११ ॥ दशावतारभूपाळी ॥ नित्यस्मरतांप्रातःकाळीं ॥ दासम्हणेभूमंडळीं ॥ भाग्यवंतगातील ॥ १२ ॥

## भूपाळीज्योतिर्लिंगाची.

नित्यज्योतिर्लिंगेंबारा ॥ प्रातःकाळींस्मरणकरा ॥ कोटिकुळेंहींउद्धरा ॥ भवहातरालबापांनो ॥ १ ॥ ध्रु० ॥ वाग[illegible]विश्वनाथ ॥ मोक्षदातातोसमर्थ ॥ प्र

विलअंतरींचाअर्थ ॥ सौमनाथसोरटी ॥२॥ ओंकारममलेश्वर ॥ सेतुबं-
बंधरामेश्वर ॥ भीमाउगमींभीमाशंकर ॥ घृष्णेश्वरवेरुळीं ॥३॥ नागनाथ
अमृतोदकीं ॥ विश्वजनकेलेसुखी ॥ परळीवेजनाथम्हणतांमुखीं ॥ सुकृतसा
चेजन्माचें ॥४॥ त्र्यंबकहातीर्थराज ॥ पुरवीलअंतरींचेंकाज ॥ त्याहीतेजामाजी
तेज ॥ महाकाळउज्जयिनीं ॥५॥ दुजेंकैलासभुवन ॥ श्रीशैलमल्लिकार्जुन ॥ वा
चेस्मरतांधन्यधन्य ॥ अनुपम्यक्षेत्रहें ॥६॥ बद्रिकेदारउत्तरे ॥ ज्याचेस्मरणेंभ
वहातरे ॥ ध्यानधरिल्यावृत्तिमुरे ॥ निजनिश्चळदासांसी ॥७॥ नरहरिम्हणेज
न्मायावें ॥ शुद्धसत्वप्रेमभावें ॥ वाचेहरीगुणगावे ॥ मालोकृपेंसर्वदा ॥८॥

## भूपाळी गंगेची.

उठोनियांप्रातःकाळीं ॥ वदनींवदाचंद्रमोळी ॥ श्रीबिंदुमाधवाजवळी ॥ स्नान
करागंगेचें ॥ ध्रु० ॥ भागीरथीचेंस्नानकरा ॥ हृदयींस्मरागंगाधरा ॥ चुकेल
चौऱ्याशींचाफेरा ॥ ऐसेंमाहात्म्यगंगेचें ॥१॥ गंगाआहेस्वर्गीवरुती ॥ पाता-
ळींहेभोगावती ॥ मृत्युलोकींहेविख्याती ॥ ऐसेंमाहात्म्यगंगेचें ॥२॥ ब्रम्हीविं
ष्णुसूर्यचंद्र ॥ सीतापतीरामचंद्र ॥ परिवारेंसीराजाइंद्र ॥ स्नानकरीगंगेचें ॥
॥३॥ नारदवसिष्ठगौतममुनी ॥ अत्रिस्कमंतआणिजयमिनी ॥ ध्रुवदत्तयेती-
माध्यान्हीं ॥ स्नानकरितीगंगेचें ॥४॥ मत्स्यकूर्मवराहनरहरी ॥ वामनपरशुरा
मश्रीहरी ॥ बौद्धकलंकीअवधारीं ॥ करितीस्नानगंगेचें ॥५॥ दुर्गादिमायासर
स्वती ॥ सावित्रीलक्ष्मीपार्वती ॥ गंगापूजनआदरेंकरिती ॥ ऐसेंमाहात्म्यगंगेचें
॥६॥ स्नानदानजपकरी ॥ घडल्याभागीरथीचेतिरीं ॥ त्यावरीश्रीहरीकृपाकरी
॥ ऐसेंमाहात्म्यगंगेचें ॥७॥ गंगाथोरयात्रिभुवनीं ॥ गंगायेईलज्याच्यावदनीं ॥
तोसुटेलसंसारापासुनी ॥ ऐसेंमाहात्म्यगंगेचें ॥८॥ राधाम्हणेश्रीहरिचला ॥
काशीक्षेत्रींअघटितलीला ॥ पाहूंपंचगंगेचामेळा ॥ स्नानकरूंगंगेचें ॥९॥ नी
रातापीइंद्रायणी ॥ प्रवरासर्वपापहारिणी ॥ चंद्रभागाविठ्ठलचरणीं ॥ स्त
वनकरागंगेचें ॥१०॥ कृष्णावेण्यातुंगभद्रा ॥ फल्गूकावेरीनर्मदा ॥ भीमाभा
मामुख्यगोदा ॥ स्तवनकरितीगंगेचें ॥११॥ आलीआषाढीएकादशी ॥ चलाजा
ऊंपंढरीसी ॥ भेटूंविठ्ठलरखुमाईसी ॥ दासविनवीयाचें ॥१२॥

## भूपाळी गुरूची.

ऐकाभोळेभाविकजन ॥ नित्यकरागुरुस्मरण ॥ होयदोषांचें दहन ॥ नित्यस्म, रणकेलिया ॥ १ ॥ गुरुसेवाघडेज्यासी ॥ काळबाधीनातयासी ॥ त्याणेंसाधिलें मोक्षासी ॥ गुरूचेंस्मरणकेलिया ॥ २ ॥ गुरुचोमुक्तींचादाता ॥ गुरुदेहाचाल विता ॥ हरेपातकाचीव्यथा ॥ गुरुचेंस्मरणकेलिया ॥ ३ ॥ गुरुज्ञानाचासागरू ॥ गुरुधीटधैर्याचामेरू ॥ नोकानेईलपैलपारू ॥ गुरुचेंस्मरणकेलिया ॥ ४ ॥ गुरुमायेचेंमूळजीव ॥ गुरुमोक्षपदाचाठाव ॥ साध्यहोतीसर्वहिदेव ॥ गुरुचें स्मरणकेलिया ॥ ५ ॥ जयजयगुरूमायबापा ॥ चुकवींचौऱ्याशींच्यारवेपा ॥ बोधराजध्यातोस्वरूपा ॥ परब्रह्मींलयलावुनियां ॥ ६ ॥

## भूपाळी काशीयात्रेची.

उठोनियांप्रातःकाळीं ॥ ध्यानींआणातीरस्थळी ॥ योगीजनांचीसाउली ॥ ध्यातांमुक्तचिहोणेंकीं ॥ ध्रु० ॥ भक्तिप्रयागज्ञानकाशी ॥ वैराग्यगयाचिदा- काशीं ॥ नित्यअनुभवितांमानसीं ॥ कृतार्थताजीवपावे ॥ १ ॥ सत्वरजतमोगु- ण ॥ त्रिवेणीहीमुख्यजाण ॥ शुद्धसत्वतोसंगमपूर्ण ॥ कराप्रयागस्नानहृदयीं ॥ ॥ २ ॥ पापवासनाक्षौरकरा ॥ सकामकर्मेंपरतींसारा ॥ विकल्पाचेंश्राद्धकरा ॥ द्या अहंकारतिळांजुळी ॥ ३ ॥ शुद्धहोउनियांऐशारीतीं ॥ प्रेमेंस्मराआत्ममूर्ती ॥ जेथें होयसूक्ष्मस्फूर्ती ॥ स्वरूपआपुलेंतत्पूर्वी ॥ ४ ॥ याचेंनावज्ञानकाशी ॥ आत्मा विश्वेश्वरअविनाशी ॥ जोसर्वांतरचित्प्रकाशी ॥ भावेंस्वात्मैक्यत्यासीकरावें ॥ ५ ॥ गर्जेओंविश्वेश्वर ॥ सोहंशब्दाचाव्यापार ॥ हरिहरादिकमंदिरें ॥ तुर्यास्थानीं पहावीं ॥ ६ ॥ पंचकोशींमूलतत्वें ॥ शोधूनपहावींनित्यानित्यें ॥ प्राणमठींबैसुनि भावें ॥ अनुभवसुखपहावें ॥ ७ ॥ नातरीकरावीतेगया ॥ धरूनिवैराग्यविषया ॥ तेणेंनिरसेलमूळमाया ॥ करितांश्राद्धंषड्रिपुंचीं ॥ ८ ॥ पुढेंविष्णुपदस्वरूप- स्थिती ॥ पिंडद्यावाअहंमती ॥ मोहममतापितरभ्रांती ॥ नाशेमुक्तीसकळां तें ॥ ९ ॥ सद्बोधहाअक्षयवट ॥ पाचारूनिविवेकभट ॥ श्रवणमननविदिध्यास तोरवट ॥ कराभोजनखटपटज्ञानाची ॥ १० ॥ तनमनधर्मफळसोडूनीद्यावें ॥ गु रुविष्णुपदासेवुनिभावें ॥ क्षमाशांतीमठींयावें ॥ उन्मनिगंगाघेऊनी ॥ ११ ॥ जी

वहोसद्बोधमीवदींकरा॥ घेऊनंज्ञानातेउद्धरा॥सत्यसत्यहीयात्राकरा॥ आत्मज्ञानप्राप्तीची॥१२॥नित्यपढेजोहीभूपाळी॥पढत्यायात्राफळनत्काळीं॥देतो श्रीविठ्ठलवनमाळी॥संसृतिपाळीचुकेचिबा॥१३॥ जीवन्मुक्तहोतोप्राणी॥करितांयात्राहीअनुदिनीं॥ सदालक्ष्मणलोटांगणीं॥ यात्रेकरूलोकांचे॥१४॥

## भूपाळीश्रीहंससद्गुरूची.

उठींउठींबा गुरुनाथा॥दासविनवीतत्वता॥विवेकरूपीं पूर्णप्रभाता॥भक्तां दावींनिजमुख॥ध्रुं०॥ कनकताटांतआरती॥ घेऊनि आलीचिच्छक्ती॥क्षमादया आणि शांती॥ ओंवाळावयापातल्या॥१॥ शमदमसाधनेंसीभले॥ शिवजीवमुमुक्षुपातले॥ सात्विकादि साहाय्यआले॥उभेठेलेद्वाराशीं॥२॥अहोगुरुराजसतत॥ तुम्हीअखंडजागृत॥ परीमुमुक्षुसंकेत॥ करी स्वज्ञानाअंतीं॥३॥ ऐसेवेदबंदीजन॥ स्तुतीकरितीकरजोडुन॥ हंसदासासीअनन्य॥ झाले प्रसन्नगुरुराज॥४॥

## प्रातःस्मरणप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ प्रातःस्मरामिखलुतत्सवितुर्वरेण्यंरूपंहि मंडलमृचोथतनुर्यजूंषि॥ सामानियस्यकिरणाः प्रभवादिहेतुंब्रह्माहरात्मकमलक्ष्यमचिंत्यरूपम्॥१॥ प्रातर्नमामितरणिंतनुवाङ्मनोभिर्ब्रह्मेंद्रपूर्वकसुरैर्नुतमर्चितंच॥ वृष्टिप्रमोचनविनिग्रहहेतुभूतं त्रैलोक्यपालनपरंत्रिगुणात्मकंच॥॥२॥ प्रातर्भजामिसवितारमनंतशक्तिंपापौघशत्रुभयरोगहरंपरंच॥तंसर्वलोककलनात्मककालमूर्तिंगोकंठबंधनविमोचनमादिदेवम्॥३॥ श्लोकत्रयमिदंभानोः प्रातःप्रातःपठेत्तुयः॥ ससर्वव्याधिनिर्मुक्तः परंसुखमवाप्नुयात्॥॥४॥ प्रातःस्मरामिगणनाथमनाथबंधुंसिंदूरपूरपरिशोभितगंडयुग्मम्॥ उद्दंडविघ्नपरिखंडनचंडदंडमाखंडलादिसुरनायकवृंदवंद्यम्॥१॥ प्रातर्नमामिचतुराननवंद्यमानमिष्टानुकूलमखिलंचवरंददानम्॥ तंतुंदिलंद्विरसनप्रिययज्ञसूत्रं पुत्रंविलासचतुरंशिवयोःशिवाय॥२॥ प्रातर्भजाम्यभयदंखलुभक्तशोकदावानलंगुणविभुंवरकुंजरास्यं॥ अज्ञानकाननविनाशनहव्यवाहमुत्साहवर्धनमहंसुतमीश्वरस्य॥३॥ श्लोकत्रयमिदंपुण्यंसदासाम्रा-

ज्यदायकम् ॥ प्रातरुत्थायसततं यःपठेत्प्रयतः पुमान् ॥ ४ ॥ ॥ प्रातःस्मरामिशरदिंदुकरोज्ज्वलाभांसद्रत्नवत्सकलकुंडलहारशोभाम् ॥ दिव्यायुधोर्जितसुनीलसहस्रहस्तांरक्तोत्पलाभचरणांभवतींपरेशां ॥ १ ॥ प्रातर्नमामिमहिषासुरचंडमुंड शुंभासुरप्रमुखदैत्यविनाशदक्षाम् ॥ ब्रह्मेंद्ररुद्रमुनिमोहनशीललीलांचंडींसमस्तसुरमूर्तिमनेकरूपाम् ॥ २ ॥ प्रातर्भजामिभजतामभिलाषदात्रींधात्रींसमस्तजगतांदुरितापहंत्रीम् ॥ संसारबंधनविमोचनहेतुभूतांमायांवरांसमधिगम्यपरस्यविष्णोः ॥ ३ ॥ श्लोकत्रयमिदंदेव्याश्चंडिकायाःपठेन्नरः ॥ सर्वान्कामानवाप्नोति विष्णुलोकेमहीयते ॥ ४ ॥ प्रातःस्मरामिभवभीतिहरंसुरेशंगंगाधरंवृषभवाहनमंबिकेशम् ॥ खट्वांगशूलवरदाभयहस्तमीशंसंसाररोगहरमौषधमद्वितीयम् ॥ १ ॥ प्रातर्नमामिगिरिशंगिरिजार्धदेहं सर्गस्थितिप्रलयकारणमादिदेवम् ॥ विश्वेश्वरंविजितविश्वमनोभिरामंसंसाररोगहरमौषधमद्वितीयम् ॥ २ ॥ प्रातर्भजामिशिवमेकमनंतमाद्यंवेदांतवेद्यमनघंपुरुषंमहांतम् ॥ नामादिभेदरहितंषड्भावशून्यंसंसाररोगहरमौषधमद्वितीयम् ॥ ३ ॥ प्रातःसमुत्थायशिवंविचिंत्यश्लोकत्रयंयेनुदिनंपठंति ॥ तेदुःखजालंबहुजन्मसंचितंहित्वापदंयांतितदेवशंभोः ॥ ४ ॥ ॥ प्रातःस्मरामिभवभीतिमहार्तिशांत्यैनारायणंगरुडवाहनमब्जनाभम् ॥ ग्राहाभिभूतवरवारणमुक्तिहेतुंचक्रायुधंतरुणवारिजपत्रनेत्रम् ॥ १ ॥ प्रातर्नमामिमनसावचसाचमूर्ध्नापादारविंदयुगुलंपरमस्यपुंसः ॥ नारायणस्यनरकार्णवतारणस्यपारायणप्रवणविप्रपरायणस्य ॥ २ ॥ प्रातर्भजामिभजतामभयंकरंतंप्राक्सर्वजन्मकृतपापभयापहत्यै ॥ योग्राहवक्त्रपतितांघ्रिगजेंद्रघोरशोकप्रणाशमकरोद्धृतशंखचक्रः ॥ ३ ॥ श्लोकत्रयमिदंपुण्यंप्रातःप्रातःपठेत्तुयः ॥ लोकत्रयगुरुस्तस्मैदद्यादात्मपदंहरिः ॥ ४ ॥ ॥ प्रातःस्मरामिरघुनाथमुखारविंदं मंदस्मितंमधुरभाषिविशालभालम् ॥ कर्णावलंबिचलकुंडलशोभिगंडं कर्णांतदीर्घनयनंनयनाभिरामम् ॥ १ ॥ प्रातर्भजामिरघुनाथकरारविंदंरक्षोगणायभयदंवरदंद्विजेभ्यः ॥ यद्राजसंसदिविभज्यमहेशचापंसीताकरग्रहणमं

गलमापसद्यः ॥ २ ॥ प्रातर्नमामिरघुनाथपदारविंदं वज्रांकुशादिशुभरेखि शुभावहंमे ॥ योगींद्रमानसमधुव्रतसेव्यमानं शापापहंसपदिगोतमधर्मपत्न्याः ॥ ३ ॥ प्रातर्वदामिवचसारघुनाथनाम वाग्दोषहारिसकलंशमलंनिहंति ॥ यत्पार्वतीस्वपतिनासहमोक्षकामाप्रीत्यासहस्रहरिनामसमंजजाप ॥ ४ ॥ प्रातःश्रयेश्रुतिनुतांरघुनाथमूर्तिं नीलांबुदोत्पलसितेतररत्ननीलाम् ॥ आमुक्तमौक्तिकविशेषविभूषणाढ्यां ध्येयांसमस्तमुनिभिर्जनमुक्तिहेतुं ॥ ५ ॥ यःश्लोकपंचकमिदंप्रयतःपठेतनित्यंप्रभातसमयेपुरुषःप्रबुद्धः ॥ श्रीरामकिंकरजनेषुसएवमुख्योभूत्वाप्रयातिहरिलोकमनन्यलभ्यम् ॥ ६ ॥ ब्रह्मामुरारिस्त्रिपुरांतकारिर्भानुःशशीभूमिसुतोबुधश्च ॥ गुरुश्चशुक्रः शनिराहुकेतवःकुर्वंतुसर्वेममसुप्रभातम् ॥ १ ॥ भृगुर्वसिष्ठःक्रतुरंगिराश्च मनुःपुलस्त्यःपुलहश्चगौतमः ॥ रैभ्योमरीचिश्च्यवनश्चदक्षःकुर्वंतु० ॥ २ ॥ सनत्कुमारःसनकःसनंदनःसनातनोप्यासुरिपिंगलौच ॥ सप्तस्वराःसप्तरसातलानिकुर्वंतुस० ॥ ३ ॥ सप्तार्णवाःसप्तकुलाचलाश्चसप्तर्षयोद्वीपवनानिसप्त ॥ भूरादिकृत्वाभुवनानिसप्तकुर्वंतुस० ॥ ४ ॥ पृथ्वीसगंधासरसास्तथाऽपःस्पर्शीचवायुर्ज्वलितंचतेजः ॥ नभःसशब्दंमहतासहैवकुर्वंतुस० ॥ ५ ॥ पुण्यश्लोकोनलोराजापुण्यश्लोकोयुधिष्ठिरः ॥ पुण्यश्लोकाचवैदेहीपुण्यश्लोकोजनार्दनः ॥ ६ ॥ अहल्याद्रौपदीसीतातारामंदोदरीतथा ॥ पंचकंनास्मरेन्नित्यंमहापातकनाशनम् ॥ ७ ॥ अश्वत्थामाबलिर्व्यासोहनुमांश्चबिभीषणः ॥ कृपःपरशुरामश्चसप्तेतेचिरजीविनः ॥ ८ ॥ सप्तैतान्संस्मरेन्नित्यंमार्कंडेयंतथाष्टमम् ॥ जीवेद्वर्षशतंसाग्रमपमृत्युविवर्जितः ॥ ९ ॥ प्रल्हादनारदपराशरपुंडरीकव्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ॥ रुक्मांगदार्जुनवसिष्ठबिभीषणादीन् पुण्यानिमान्परमभागवतान्नमामि ॥ १० ॥ कर्कोटकस्यनागस्यदमयंत्यानलस्यच ॥ ऋतुपर्णस्यराजर्षेःकीर्तनंकलिनाशनम् ॥ ११ ॥ धर्मोविवर्धतियुधिष्ठिरकीर्तनेन ॥ पापंप्रणश्यतिवृकोदरकीर्तनेन ॥ शत्रुर्विनश्यतिधनंजयकीर्तनेन ॥ माद्रीसुतौकथयतांनभवंतिरोगाः ॥ १२ ॥ अहोभाग्यंमहोभाग्यंनंदगोपव्रजौकसाम् ॥ यन्मि

त्वंपरमानंदंपूर्णब्रह्मसनातनम् ॥ १३ ॥ अयोध्यामथुरामायाकाशीकांचीअवंतिका ॥ पुरीद्वारावतीचैवसप्तैतामोक्षदायिकाः ॥ १४ ॥ अर्जुनः फाल्गुनोजिष्णुःकिरीटीश्वेतवाहनः ॥ बीभत्सुर्विजयीकृष्णःसव्यसाची-धनंजयः ॥ १५ ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठगोविंदउत्तिष्ठगरुडध्वज ॥ उत्तिष्ठकमला-कांतत्रैलोक्यंमंगलंकुरु ॥ १६ ॥ समुद्रवसनेदेविपर्वतस्तनमंडले ॥ वि-ष्णुपत्निनमस्तुभ्यंपादस्पर्शंक्षमस्वमे ॥ १७ ॥ पलायध्वंपलायध्वंरेरेदानवराक्षसाः ॥ धर्मसंस्थापनार्थायरथारूढोस्वयंहरिः ॥ १८ ॥ काश्यांतुभैरवोदेवोसंसारभयनाशनः ॥ बहुजन्मकृतंपापंस्मरणेनविनश्यति ॥ ॥ १९ ॥ काश्यांतुदक्षिणेभागेकुक्कुटोनामवैद्विजः ॥ तस्यस्मरणमात्रेणदुःस्वप्नःस्फस्वदोभवेत् ॥ २० ॥ वाराणस्युत्तरेभागेस्कमंतुर्नामवैद्विजः ॥ तस्यस्मरणमात्रेणनिर्धनोधनवान्भवेत् ॥ २१ ॥ काशिकाशीतिकाशीतित्रिवारंयःपठेन्नरः ॥ सोऽपिदेशांतरेवासीकाशीवासफलंलभेत् ॥ २२ ॥ अंशीवरुणयोर्मध्येपंचक्रोशीमहत्फलम् ॥ अमरामृत्युमिच्छंतिकाकथात्वितरेजनाः ॥ २३ ॥ नंदिनीनलिनीसीतामालतीचमलापहा ॥ विष्णुपादाब्जसंभूतागंगात्रिपथगामिनी ॥ २४ ॥ भागीरथीभोगवतीजान्हवीत्रिजटेश्वरी ॥ द्वादशैतानिनामानिप्रातःकालेसदापठेत् ॥ २५ ॥ विश्वेशंमाधवंधुंडिंदंडपाणिंचभैरवम् ॥ वंदेकाशींगुहांगंगांभवानीमणिकर्णिकाम् ॥ २६ ॥ वाराणसीपुरपतेभजविश्वनाथा ॥ माझाप्रणामतुझियाचरणासिआतां ॥ मीमागतोंपरमपावनपुण्यभिक्षा ॥ द्यावीमलात्वरितशांभविवेददीक्षा ॥ १ ॥ श्रीधुंडिराजगणनायकदंडपाणी ॥ माझेउदंडअपराधसनांतनाणीं ॥ श्रीभैरवांचुकविंरौरवयातनारे ॥ वाराणसींतमजठेविंसनातनारे ॥ २ ॥ इत्थंप्रभातेपरमंपवित्रंपठेत्स्मरेद्वाशृणुयाच्चनित्यम् ॥ दुःस्वप्ननाशस्त्विहस्कप्रभातंभवेच्चनित्यंभगवत्प्रसादात् ॥ ३ ॥ कराग्रेवसतेलक्ष्मीःकरमूलेसरस्वती ॥ करमध्येचगोविंदःप्रभातेकरदर्शनम् ॥ ४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥



## व्यंकटेशस्तोत्रप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ श्रीव्यंकटेशायनमः ॥ ओंनमोजीहेरंबा ॥ सकळादीनूंप्रारंभा ॥ आठवूनितुझीस्वरूपशोभा ॥ वंदनभावेंकरीतसें ॥ १ ॥ नमनमाझेंहंसवाहनी ॥ वाग्वरदेविलासिनी ॥ ग्रंथवदावयानिरूपिणी ॥ भावार्थरवाणीजयामाजी ॥ २ ॥ नमनमाझेंगुरुवर्या ॥ प्रकाशरूपातूंस्वामिया ॥ स्फूर्तीद्यावीग्रंथवदावया ॥ जेणेंश्रोतयांसुखवाटे ॥ ३ ॥ नमनमाझेंसंतसज्जनां ॥ आणियोगियांमुनिजनां ॥ सकळश्रोतयांसज्जनां ॥ नमनमाझेंसाष्टांग ॥ ४ ॥ ग्रंथऐकाप्रार्थनाशतक ॥ महादोषांसीदाहक ॥ संतोषोनिवैकुंठनायक ॥ मनोरथपूर्णकरील ॥ ५ ॥ जयजयाजीव्यंकटरमणा ॥ दयासागरापरिपूर्णा ॥ परंज्योतीप्रकाशगहना ॥ करितोंप्रार्थनाश्रवणकीजे ॥ ६ ॥ जननीपरीत्वांपाळिलें ॥ पितयापरीसांभाळिलें ॥ सकळसंकटांपासूनिरक्षिलें ॥ पूर्णदीधलेंप्रेमसुख ॥ ७ ॥ हेंअलोलिकजरीमानावें ॥ तरीजगहेंसृजिलेंआघवें ॥ जनकजननीपणस्वभावें ॥ सहजआलेंआंगासीं ॥ ८ ॥ दीननाथाप्रेमासाठीं ॥ भक्तरक्षिलेसंक

दीं ॥ प्रेमदीधलेंअपूर्वगोष्टी ॥ भजनासाठींभक्तांच्या ॥ ९ ॥ आतांपरिसावी विज्ञापना ॥ कृपाळुवालक्ष्मीरमणा ॥ मज़घालोनिगर्भाधाना ॥ अलोलिक रचनादाखविली ॥ १० ॥ तुजनेणतांझालोंकष्टी ॥ आतांदृढतुझेपायींघातलीमिठी ॥ कृपाळुवाजगजेठी ॥ अपराधपोटींघालीमाझे ॥ ११ ॥ माझियाअपराधांच्याराशी ॥ भेदोनिगेल्यागगनासी ॥ दयावंताहृषीकेशी ॥ आपुल्याब्रीदासीसत्यकरीं ॥ १२ ॥ पुत्राचेसहस्रअपराध ॥ मातकायमानीतयाचाखेद ॥ तेवितूंकृपाळूगोविंद ॥ मायबापमजलागीं ॥ १३ ॥ उडदांमाजीकाळेंगोरें ॥ कायनिवडावेंनिवडणारें ॥ कुचलीयावृक्षाचीं फळें ॥ मधुरकोठोनीअसतील ॥ १४ ॥ आराटीलागीं मृदुता ॥ कोठोनिअनेलकृपावंता ॥ पाषाणासीगुल्मलता ॥ कैशियापरीफुटतील ॥ १५ ॥ आपादमस्तकवरीअन्यायी ॥ परीतुझेपदरींपडलोंपाहीं ॥ आतांरक्षणनानाउपायीं ॥ करणेंतुजउचित ॥ १६ ॥ समर्थाचे घरींचेंश्वान ॥ त्यासस र्वहीदेतीमान ॥ तैसांतुझाम्हणवितोंदीन ॥ हाअपमानकवणाचा ॥ १७ ॥ लक्ष्मीतुझेपायांतळीं ॥ आम्हींभिक्षेसि घातलीझोळी ॥ येणेंतुझीब्रीदावळी ॥ कैशीराहीलगोविंदा ॥ १८ ॥ कुबेरतुझाभांडारी ॥ आम्हांफिरविसीदारोदारीं ॥ यांतपुरुषार्थमुरारी ॥ कायतुजलापैंआला ॥ १९ ॥ द्रौपदीसीवस्त्रेंअनंता ॥ देतहोतासीभाग्यवंता ॥ आम्हालागींकृपणता ॥ कोठूनिआणिलीगोविंदा ॥ २० ॥ मावेचा करून द्रौपदीसती ॥ अन्नेंपुरविलींमध्यराती ॥ ऋषेश्वरांच्यावैसल्यापंक्ती ॥ तृप्तकेल्याक्षणमात्रें ॥ २१ ॥ अन्नासाठींदाहीदिशा ॥ आम्हांफिरविसी जगदीशा ॥ कृपाळुवा परमपुरुषा ॥ करुणाकैशीतुजनये ॥ २२ ॥ अंगिकारियाशिरोमणी ॥ तुजप्रार्थितोंमधुर वचनीं ॥ अंगिकारकेलियाझणी ॥ मजह्मातीचेंनसोडावें ॥ २३ ॥ समुद्रें अंगिकारिलावडवानळ ॥ तेणेंअंतरींहोतसेविव्हळ ॥ ऐसेंअसोनिसर्वकाळ ॥ अंतरींसांठविलातयानें ॥ २४ ॥ कूर्मेंपृथ्वीचाघेतलाभार ॥ तेणेंसोडिलानाहींबडिवार ॥ एवढाब्रम्हांडगोळथोर ॥ त्याच्याअंगिकारपैंकेला ॥ २५ ॥ शंकरेंधरिलेंहाळाहळा ॥ तेणें नीलवर्ण झालागळा ॥ परीत्यागिलेंनाहीगोपाळा ॥ भक्तवत्सलागोविंदा ॥ २६ ॥ माझ्या

अपराधांच्यापरी ॥ वर्णिनांधिणलीवैखरी ॥ दुष्टपतितदुराचारी ॥ अध-
माह्नीअधम ॥ २७ ॥ विषयासक्तमंदमतीआळसी ॥ कृपणएकुव्यसनीमलि
नमानसीं ॥ सदासर्वकाळसज्जनांसी ॥ द्रोहकरींसर्वदा ॥ २८ ॥ वचनोक्ती
नाहींमधुर ॥ अत्यंतजनांसीनिष्ठुर ॥ सकळपामरांमाजीपामर ॥ व्यर्थबडि
वारजगींवाचे ॥ २९ ॥ कामक्रोधमदमत्सर ॥ देंशरीरत्यांचेंबिढार ॥ काम
कल्पंनेसीथार ॥ दृढयेथेंकेलाअसे ॥ ३० ॥ अठराभारवनस्पतींचीलेखणी ॥
समुद्रभरलामषीकरूनी ॥ माझेअवगुणलिहितांधरणी ॥ तरीलिहिलेनजा
ती ॥ ३१ ॥ ऐसापतितमीखरा ॥ परीतूंपतितपावनशार्ङ्गधरा ॥ तुवांअंगिकारके
लियागदाधरा ॥ कोणदोषगुणगणील ॥ ३२ ॥ नीचरतलीरायासीं ॥ तिसीको
णह्मणेलदासी ॥ लोहलागतांपरिसासी ॥ पूर्वस्थितीमगकैंची ॥ ३३ ॥ गांवीं
चेह्मोतेलेंडवोहळ ॥ गंगेसिमिळतांगंगाजळ ॥ काकविष्ठेचेहोतीपिंपळ ॥ तयां
सीनिंद्यकोणह्मणे ॥ ३४ ॥ तैसाकुजातीमीअमंगळ ॥ परीतुझाह्मणवितों
केवळ ॥ कन्यादेऊनियांकुळ ॥ मगकायविचारावें ॥ ३५ ॥ जाणतअसतां
अपराधीनर ॥ तरीकांकेलाअंगिकार ॥ अंगिकारावरीअव्हेर ॥ समर्थेंकेला
नपाहिजे ॥ ३६ ॥ धांवपावरेगोविंदा ॥ हातींघेऊनियांगदा ॥ करींमाझ्याक-
र्मांचाचेंदा ॥ सच्चिदानंदाश्रीहरी ॥ ३७ ॥ तुझियानामाचीअपरिमितशक्ती
॥ तेथेंमाझीं पापेंकिती ॥ कृपाकुचालक्ष्मीपती ॥ बरवेंचित्तींविचारीं ॥ ३८ ॥
तुझेंनामपतितपावन ॥ तुझेंनामकलिमलदहन ॥ तुझेंनामभवतारण
॥ संकटनाशननामतुझें ॥ ३९ ॥ आतांप्रार्थनाएककमळापती ॥ तुझे
नामींराहोमाझीमती ॥ हेंचिमागणेंपुढतांपुढती ॥ परंज्योतीव्यंकटेशा
॥ ४० ॥ तूंअनंततुझींअनंतनामें ॥ तयांमाजीअतिसुगमें ॥ तींमीअल्प-
मतीसप्रेमें ॥ स्मरूनिप्रार्थनाकरीतसें ॥ ४१ ॥ श्रीव्यंकटेशावासुदेवा ॥
प्रद्युम्नाअनंताकेशवा ॥ संकर्षणाश्रीधरामाधवा ॥ नारायणाआदिमू-
र्ती ॥ ४२ ॥ पद्मनाभादामोदरा ॥ प्रकाशगहनापरात्परा ॥ आदिअना
दिविश्वंभरा ॥ जगदुद्धाराजगदीशा ॥ ४३ ॥ कृष्णाविष्णोहृषीकेशा ॥
सच्चिदानंदापुरुषोत्तमापरेशा ॥ नृसिंहवामनभार्गवेशा ॥ बौद्धकलंकीनि

जमूर्ती ॥ ४४ ॥ अनाथरक्षका आदिपुरुषा ॥ पूर्णब्रह्मसनातना निर्दोषा ॥ सकळमंगळा मंगळाधीशा ॥ सज्जनजीवना सुखमूर्ती ॥ ४५ ॥ गुणातीता गुणज्ञा ॥ निजबोधरूपा निमग्ना ॥ शुद्धसात्विक सुज्ञा ॥ गुणप्राज्ञा परमेश्वरा ॥ ४६ ॥ श्रीनिधि श्रीवत्सलांछनधरा ॥ भयकृत् भयनाशन गिरिधरा ॥ दुष्टदैत्यसंहारकरा ॥ वीरा सुखकरा तूं एक ॥ ४७ ॥ निखिल निरंजना निर्विकारा ॥ विवेकखाणी वैरागरा ॥ मधुमुरदैत्यसंहारकरा ॥ असुरमर्दना उग्रमूर्ती ॥ ४८ ॥ शंखचक्रगदाधरा ॥ गरुडवाहना भक्तप्रियकरा ॥ गोपीमनरंजना सुखकरा ॥ अखंडितस्वभावें ॥ ४९ ॥ नानानाटकसूत्रधारिया ॥ जगव्यापका जगवर्या ॥ कृपासमुद्रा करुणालया ॥ मुनिजनध्येया मूळमूर्ती ॥ ५० ॥ शेषशयना सार्वभौमा ॥ वैकुंठवासिया निरुपमा ॥ भक्तकैवारिया गुणधामा ॥ पाव आम्हां ये समयीं ॥ ५१ ॥ ऐशी प्रार्थना करूनि देवीदास ॥ अंतरीं आठवी श्रीव्यंकटेश ॥ स्मरतां हृदयीं प्रगटला ईश ॥ त्या सुखासी पार नाहीं ॥ ५२ ॥ हृदयीं आविर्भवली मूर्ती ॥ त्या स्वरूपाची अलोलिकस्थिती ॥ आपले आपण श्रीपती ॥ वाचे हातीं बोलवीतसे ॥ ५३ ॥ तें स्वरूप अत्यंत सुंदर ॥ श्रोतीं श्रवण कीजे सादर ॥ सांवळी तनु सुकुमार ॥ कुंकुमाकार पादपद्में ॥ ५४ ॥ सुरेख सकळ अंगुळिका ॥ नखें जैशी चंद्ररेखा ॥ घोटींव सुनीळ अपूर्व देखा ॥ इंद्रनीळाचियेपरी ॥ ५५ ॥ चरणीं वाळे घागरिया ॥ वांकी वरती गुजरिया ॥ सरळ सुंदर पोटरिया ॥ कर्दळिस्तंभाचियेपरी ॥ ५६ ॥ गुडघे मांडिया जानुस्थळ ॥ कटितटीं किंकिणी विशाळ ॥ खालतें विश्वउत्पत्तीचें स्थळ ॥ वरी झळाळी सोनसळा ॥ ५७ ॥ कटीवरतें नाभिस्थान ॥ जेथोनि ब्रह्मा झाला उत्पन्न ॥ उदरीं त्रिवळी शोभे गहन ॥ त्रैलोक्य संपूर्ण जयामाजी ॥ ५८ ॥ वक्षस्थळीं शोभे पदक ॥ पाहोनि चंद्रमा अधोमुख ॥ वैजयंती करी लखलख ॥ विद्युल्लतेचियेपरी ॥ ५९ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन ॥ भूषण मिरवी श्रीभगवान ॥ त्यावरतें कंठस्थान ॥ जयासी मुनिजन अवलोकिती ॥ ६० ॥ उभय बाहू दंडसरळ ॥ नखें चंद्रापरिस तेजाळ ॥ शोभती दोन्ही करकमळ ॥

शतोसलांत्रियेपरी ॥ ६१ ॥ मणगटीविराजतीकंकणें ॥ बाहुवटीबाहुभूषणें ॥ कंठींलेइलींआभरणें ॥ सूर्यकिरणेंउगवलीं ॥ ६२ ॥ कंठावरुतें मुखकमळ ॥ हनुवटीअत्यंतसुनीळ ॥ मुखचंद्रमाअतिनिर्मळ ॥ भक्तस्नेहाळगोविंद ॥ ६३ ॥ दोहोंअधरांमाजीदंतपंक्ती ॥ जिव्हाजेसीलावण्यज्योती ॥ अधरामृतप्राप्तीचीगती ॥ तेंसुखजाणेलक्ष्मी ॥ ६४ ॥ सरळसुंदरनासिक ॥ जेथेंपवनासिझालेंसुख ॥ गंडस्थळींतेजअधिक ॥ लखलखितदोहोंभागीं ॥ ६५ ॥ त्रिभुवनींचेंतेजएकवटलें ॥ बरवेपणासिगेसिआलें ॥ दोहींपातयांनींधरिलें ॥ तेचनेत्रश्रीहरीचे ॥ ६६ ॥ व्यंकटाभ्रुकुटियासुनीळा ॥ कर्णद्वयाचीअभिनवलीला ॥ कुंडलांच्याफाकतीकळा ॥ तोसुखसोहळाअलोलिक ॥ ६७ ॥ भाळविशाळसुरेख ॥ वरतीशोभेकस्तुरीटिळक ॥ केशकुरळअलोलिक ॥ मस्तकावरीशोभती ॥ ६८ ॥ मस्तकींमुकुटआणिकिरीटी ॥ सभोंवतीझिळमिळ्यांचीदाटी ॥ त्यावरीमयूरपिसांचीवेंटी ॥ ऐसाजगजेठीदेखिला ॥ ६९ ॥ ऐसातूंदेवाधिदेव ॥ गुणातीतवासुदेव ॥ माझियांभक्तीस्तव ॥ सगुणरूपझालासी ॥ ७० ॥ आतांकरूंतुझीपूजा ॥ जगज्जीवनाअधोक्षजा ॥ आर्षभावार्थहामाझा ॥ तुजअर्पणकेलाअसे ॥ ७१ ॥ करूनिपंचामृतस्नान ॥ शुद्धअमृतवरीघालून ॥ तुजकरूंमंगळस्नान ॥ पुरुषसूक्तेंकरूनियां ॥ ७२ ॥ वस्त्रेंआणियज्ञोपवीत ॥ तुजअर्पणकरूंप्रीत्यर्थ ॥ गंधाक्षतापुष्पेंबहुत ॥ तुजलागींसमर्पूं ॥ ७३ ॥ धूपदीपनैवेद्य ॥ फळतांबूलदक्षिणाशुद्ध ॥ वस्त्रेंभूषणेंगोमेद ॥ पद्मरागादिकरूनी ॥ ७४ ॥ भक्तवत्सलागोविंदा ॥ हीपूजाअंगिकारवीपरमानंदा ॥ नमस्कारकरूनिपादारविंदा ॥ मगप्रदक्षिणाआरंभिली ॥ ७५ ॥ ऐसाषोडशोपचारींभगवंत ॥ यथाविधिपूजिलाहृदयांत ॥ मगप्रार्थनाआरंभिलीबहुत ॥ वरप्रसादमागावया ॥ ७६ ॥ जयजयाजीश्रुतिशास्त्रांअगम्या ॥ जयजयाजीपरब्रह्मा ॥ जयजयाजीहृदयवासियारामा ॥ जगदुद्धाराजगद्गुरू ॥ ७७ ॥ जयजयाजीपंकजाक्षा ॥ जयजयाजीकमळाधीशा ॥ जयजयाजीपूर्णपरेशा ॥ अव्यक्ताव्यक्तासुखमूर्ती ॥ ७८ ॥ जयजयाजीभक्तरक्षका ॥ जयजयाजीवैकुंठ

नायका॥ जयजयाजीजगपाळका॥ भक्तांसिसरवातूंएक॥ ७९॥ जयज याजीनिरंजना॥ जयजयाजीपरात्परगहना॥ जयजयाजीशून्यातीत निर्गुणा॥ परिसावीविज्ञापनाएकमाझी॥ ८०॥ मजलागीदेईऐसावर॥ जेणेंघडेलपरोपकार॥ हेंचिमागणेंसाचार॥ वारंवारप्रार्थितसें॥ ८१॥ हाग्रं थजोपठणकरी॥ त्यासीदुःखनसावेंसंसारीं॥ पठणमात्रेंचराचरीं॥ विजयी करींजगातें॥ ८२॥ लग्नार्थीयाचेंव्हावेंलग्न॥ धनार्थीयासीव्हावेंधन॥ पुत्रा र्थीयाचेमनोरथपूर्ण॥ पुत्रदेऊनिकरावे॥ ८३॥ पुत्रविजयीआणिपंडित॥ शतायुषीभाग्यवंत॥ पितृसेवेसीअत्यंतरत॥ जयाचेंचित्तसर्वकाळ॥ ८४॥ उदारआणिसर्वज्ञ॥ पुत्रदेईभक्तांलागुन॥ व्याधिष्ठाचीपीडाहरण॥ त त्काळकीजेगोविंदा॥ ८५॥ क्षयअपस्मारकुष्ठादिरोग॥ ग्रंथपठणेंसरावा भोग॥ योगाभ्यासियासीयोग॥ पठणमात्रेंसाधावा॥ ८६॥ दरिद्रीव्हावा भाग्यवंत॥ शत्रूंचाव्हावानिःपात॥ सभावशसमस्त॥ ग्रंथपठणेंकरून व्हावी॥ ८७॥ विद्यार्थीयासीविद्याव्हावी॥ युद्धींशस्त्रेंनलागावीं॥ पठणें जगांतकीर्तीव्हावी॥ साधुसाधुह्मणोनियां॥ ८८॥ अंतींव्हावेंमोक्षसाध न॥ ऐसेंप्रार्थनेसीदीजेमन॥ एवढेंमागतोंवरदान॥ कृपानिधेगोविंदा॥ ॥ ८९॥ प्रसन्नजाहलाव्यंकटरमण॥ देविदासासीदिधलेंवरदान॥ ग्रंथा- क्षरींमाझेंवचन॥ यथार्थजाणनिश्चयेंसीं॥ ९०॥ ग्रंथींधरोनिविश्वास॥ प ठणकरीलरात्रंदिवस॥ त्यालागींमीजगदीश॥ क्षणएकनविसंबें॥ ९१॥ इच्छाधरूनिकरीलपठण॥ त्याचेंसांगतोंमीप्रमाण॥ सर्वकामनेसीसाध न॥ पठणएकनेमिलें॥ ९२॥ पुत्रार्थीयाणेंतीनमास॥ धनार्थीयाणेंएकवी सदिवस॥ कन्यार्थीयाणेंषण्मास॥ ग्रंथआदरेंवाचावा॥ ९३॥ क्षयअप स्मारकुष्ठादिरोग॥ इत्यादिसाधनेंप्रयोग॥ त्यासीएकमंडळसांग॥ पठ णेंकरूनिकार्यसिद्धी॥ ९४॥ हेंवाक्यमाझेंनेमस्त॥ ऐसेंबोलिलाश्रीभगवं त॥ साचनमानीजयाचेंचित्त॥ त्यासीअधःपातसत्यहोय॥ ९५॥ वि- श्वासधरीलग्रंथपठणीं॥ त्यासीकृपाकरीलचक्रपाणी॥ वरदीधलाकृपा करूनी॥ अनुभवेंकळोंयेईल॥ ९६॥ गजेंद्राचियाआक्रांतासी॥ कैसापाव

लाहृषीकेशी ॥ प्रल्हादांचिया भावार्थासी ॥ स्तंभांतूनि प्रगटला ॥ ९७ ॥ व्रजासाठीं गोविंदा ॥ गोवर्धन परमानंदा ॥ उचलोनियां स्वानंदकंदा ॥ सुखरवी केलें तये वेळीं ॥ ९८ ॥ वत्साचे परी भक्तांसी ॥ मोहें पान्हावे धेनु जैसी ॥ मातेचा स्नेह तुलनेसी ॥ त्याच परी घडलें से ॥ ९९ ॥ ऐसा तूं माझा दातार ॥ भक्तांसि घालिशी कृपेची पाखर ॥ हाच तुझा निर्धार ॥ अनाथ नाथ नाम तुझें ॥ १०० ॥ श्रीचैतन्य कृपा अलोलिक ॥ संतोषोनि वैकुंठनायक ॥ वर दीधला अलोलिक ॥ जेणें सुख सकळांसी ॥ १ ॥ हा ग्रंथ लिहिता गोविंद ॥ या वचनीं न धरावा भेद ॥ हृदयीं वसे परमानंद ॥ अनुभवसिद्ध सकळांसी ॥ २ ॥ या ग्रंथाचा इतिहास ॥ भावें बोलिला विष्णुदास ॥ आणिक न लागती सायास ॥ पठणमात्रें कार्यसिद्धी ॥ ३ ॥ पार्वतीस उपदेशी कैलासनायक ॥ पूर्णानंद प्रेमसुख ॥ त्याचा पार न जाणती ब्रह्मादिक ॥ मुनि सुरवर विस्मित ॥ ४ ॥ प्रत्यक्ष प्रकटेल वनमाळी ॥ त्रैलोक्यीं भजती त्रिकाळीं ॥ ध्याती योगी आणि चंद्रमौळी ॥ शेषाद्रिपर्वतीं उभा असे ॥ ५ ॥ देवीदास विनवी श्रोतयां चतुरां ॥ प्रार्थनाशतक पठण करा ॥ जावया मोक्षाचिया मंदिरा ॥ कांहीं न लागती सायास ॥ ६ ॥ एकाग्रचित्तीं एकांतीं ॥ अनुष्ठान कीजे मध्यरातीं ॥ बैसोनियां स्वस्थ चित्तीं ॥ प्रत्यक्ष मूर्ती प्रगटेल ॥ ७ ॥ तेथें देहभावासी नुरे ठाव ॥ अवघा चतुर्भुज देव ॥ त्याचे चरणीं ठेवूनि भाव ॥ वरप्रसाद मागावा ॥ १०८ ॥ ॥ इति श्रीव्यंकटेशस्तोत्रं समाप्तम् ॥ ॥





## अथसूर्यस्तुतिप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ ॥श्रीसवितासूर्यनारायणायनमः॥ ॥अथ ध्यानम्॥ ध्येयःसदासवितृमंडलमध्यवर्तीनारायणःसरसिजासनसन्निविष्टः॥ केयूरवान्मकरकुंडलवान्किरीटीहारीहिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः॥इतिध्यानम्॥ जयाच्यारथाएकचीचक्रपाहीं॥ नसेभूमिआकाशआधारकांहीं॥ असेसारथीपांगुळाज्यारथासी॥ नमस्कारत्यासूर्यनारायणासी॥१॥ करींपद्ममाथाकिरीटीझळाळी॥ प्रभाकुंडलांचीशरीरानिराळी॥पहारश्मिज्याचीत्रिलोकांसिकैसी॥ नमस्कार०॥२॥सहस्रद्वयेंदोनशे आणिदोन॥ क्रमीयोजनेंजोनिमिष्यार्धतेन॥ मनाकल्पवेनाजयाच्यात्वरेसी॥नमस्कार०॥३॥विधीवेदकर्मासिआधारकर्ता॥स्वधाकारस्वाहादि सर्वत्रभोक्ता॥असेअन्नदातासमस्तांजनांसी॥नमस्कार०॥४॥ युगेंमंत्र कल्पांतज्याचेनिहोती॥हरीब्रह्मरुद्रादिज्याबोलिजेती॥ क्षयांतींमहा-काळरूपाप्रकाशा॥नम०॥५॥शशीतारगोंवोनियांजोग्रहांतें॥ त्वरेंमेरु वेढोनियांपूर्वपंथें॥ भ्रमेजोसदालोकरक्षावयासी॥नमस्कार०॥ ६॥ समस्तांसुरांमाजितूंजाणचर्या॥ म्हणोनीचतूंश्रेष्ठत्यानामसूर्या॥ दुजादेवतोदास्वयीस्वप्रकाशीं॥नम०॥ ७॥ महामोहतोअंधकारासिनाशी॥प्रभाशुद्धसत्वाचिअज्ञाननाशी॥ अनाथाकृपाजोकरीनित्यऐशी॥नम०॥८॥

कृपाज्यावरीहोयत्याभास्कराची ॥ नपहूंशकेशत्रुत्यालाविरंची ॥ उण्यारा हतीसिद्धिहोऊनिदासी ॥ नम० ॥ ९ ॥ फुलेंचंदनेंपत्रपुष्पेंकस्तूरी ॥ पुजावेंबरेंएकनिष्ठाधरोनी ॥ मनींइच्छिलेंपाविजेतीकरवासी ॥ नम० ॥ १० ॥ नमस्कारसाष्टांगबापास्वभावें ॥ करोनीनयाभास्करालागिंध्यावें ॥ दरिद्रेंसहस्त्रादिजोक्लेशनाशी ॥ नमस्कारत्यासूर्यनारायणासी ॥ ११ ॥ रवीसूर्यआदित्यमित्रादिभानू ॥ विवस्वानइत्यादिहीपादरेणू ॥ सदावांछितांपुज्यतेशंकरासी ॥ नमस्कारत्यासूर्यनारायणासी ॥ १२ ॥ ॥ इतिवामनकृतसूर्यस्तुतिःसमाप्ता ॥ ॥ श्रीसूर्यनारायणार्पणमस्तु ॥ ॥ ६ ॥



## तुळसीआख्यानप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॥ गणेशगौरीचानंदन ॥ सिद्धिबुद्धींचादातापूर्ण ॥ आदिवंदावागजवदन ॥ मंगळमूर्तीमोरया ॥ १ ॥ मगनमूंशारदासुंदरी ॥ बैसोनिहंसावरी ॥ तेणेंवळलीमाझीवैखरी ॥ कवित्वालागीं ॥ २ ॥ मगनमूंसद्गुरुमाउली ॥ त्याणेंमजवरकृपाकेली ॥ देहींमाझ्याशीतळझाली ॥ आलेंहृदयींज्ञान ॥ ३ ॥ मगनमूंव्यासादिकजाण ॥ जेचौदाविद्यांचेंनिधान ॥ त्यांसीकेलेंनमन ॥ दोनीकरजोडूनियां ॥ ४ ॥ व्याससांगेजन्मेजयालागून ॥ कथाऐकापुण्यपावन ॥ तुळसीदेवीचेंआख्यान ॥ एकचित्तेंश्रवणकरावें ॥ ५ ॥ तुळसीवृंदावनजयाचेघरीं ॥ धन्यधन्यतोप्राणीसंसारीं ॥ नयाच्यापुण्यानाहींसरी ॥ ऐकराया ॥ ६ ॥ नित्यजोतुळसीसनमस्कारी ॥ त्यासीदेखूनियांयमपळेदूरी ॥ वि

ष्णुदूतआदरकरी ॥ तयाप्राणियासी ॥ ७ ॥ जेप्राणीतुळसीचीपूजाकरिती ॥ तुळसीआंगेंघडेश्रीहरीचीभक्ती ॥ हेवार्ताआहेनिश्चिती ॥ असत्यनम्हणावें ॥ ८ ॥ तुळसीदेवीचीमंजरी ॥ चढवितीश्रीकृष्णाचेशिरीं ॥ धन्यधन्यतेचिसंसारीं ॥ ऐसेंवदेव्यासऋषी ॥ ९ ॥ तुळसीपत्रघालितीकानीं ॥ त्यांच्यापातकाचीहोयधुणी ॥ तोमाझाभक्तह्मणेशार्ङ्गपाणी ॥ मजआवडीतयाची ॥ १० ॥ तुळसीवृंदावनींचीमृत्तिका ॥ जोकपाळींलावीतिलका ॥ तोमाझाभक्तनिका ॥ ह्मणे-श्रीकृष्ण ॥ ११ ॥ जेतुळसीच्यामाळा ॥ प्राणीघालितीगळां ॥ मीस्वरूपसांवळा ॥ आहेतेथें ॥ १२ ॥ ब्रह्माविष्णूमहेश ॥ तिन्हीदेवयेतीतुळसीस ॥ आवडतीसावकाश ॥ तुळसीपूजनें ॥ १३ ॥ नित्यकरीतुळसीपूजन ॥ स्मरणेंसंतोषपावेश्रीकृष्ण ॥ तोचिहोयसुखसंपन्न ॥ धन्यधन्यभक्तमाझा ॥ १४ ॥ फुकाचीतुळसीपूजिती ॥ तयांसीयमयातनातुटती ॥ बळेंघेऊनजाती ॥ विष्णुदूतवैकुंठीं ॥ १५ ॥ जयासीजाणेंवैकुंठासी ॥ तोवैकुंठआहेतुळसीपासी ॥ मनींविश्वासेंतुळसी ॥ पूजनकरावें ॥ १६ तुळसीसघालीजोउदक ॥ त्याप्राणियासिकैचेंदुःख ॥ सदासर्वकाळपावेसुख ॥ तुळसीपूजनें ॥ १७ ॥ जोकरीतुळसीपूजा ॥ भक्तिभावेंगरुडध्वजा ॥ कृष्णह्मणेकेवळभक्तमाझा ॥ अतिप्रियहोय ॥ १८ ॥ तुळसीवृंदावनजयाचेआंगणीं ॥ प्रातःकाळीं दर्शनघडेनित्यानीं ॥ त्याच्यापातकाचीहोयधुणी ॥ तोपुण्यप्राणीजाणावा ॥ १९ ॥ फुकाचेंघालितीतुळसीसपाणी ॥ यमदूतनगांजितीतयांलागुनी ॥ बळेंविष्णुदूतनेतीवैकुंठभुवनीं ॥ त्याप्राणियांसी ॥ २० ॥ कुंभीपाकपडलावोस ॥ प्राणियांसिनाहींदोष ॥ बळेंनेतीविष्णुदास ॥ यमापासूनी ॥ २१ ॥ हेंतुळसीचेंमाहिमान ॥ जियेपासींअक्षयनारायण ॥ सांगतसेजन्मेजयालागुन ॥ ऐकराया ॥ २२ ॥ धूपदीपनैवेद्यआरती ॥ जेतुळसीसनित्यकरिती ॥ त्याप्राणियांपुनरावृत्ती ॥ नाहींकल्पांतींजाणपां ॥ २३ ॥ तुळसीचीकरूनियांमाळ ॥ रामनामजपेसदासर्वकाळ ॥ तोदरिद्रीनहोयकेवळ ॥ निश्चयेंसी ॥ २४ ॥ जेतुळसीपासीसारविती ॥ नित्यघृतदीपउजळिती ॥ तयांघरचीनसरेसंपत्ती ॥ तेकेवळभक्तमाझे ॥ २५ ॥ जेतुळसीसविनविती ॥ मनोभावेंसेवाकरिती ॥ जवळबैसोनिप्रार्थिती ॥ तेचप्राणसखेमाझे ॥ २६ ॥ उद्धवह्मणेशार्ङ्गधरू ॥ तुळसीपूजनेंउतरेपारू ॥

जेतुळसीसनपूंजितीपामरू॥कायगंतीतयांची॥२७॥उद्धवासिह्मणेशार्ङ्गपाणी॥जे तुळसीचीनिंदाकरितीप्राणी॥अधोगतीत्यांहोउनी॥कोडेवेडेहोतात॥२८॥जोप्राणी तुळसीचेंमोडीआळें॥त्याप्राणियाचेंतोंडकाळें॥सदाप्राणीतोतळमळे॥भाग्यनाहीं तयासी॥२९॥जेप्राणीमोडितीतुळसीवृंदावन॥यमसांगेदूतांलागुन॥कुंभीपाकीं टाकानेऊन॥सत्यजाणउद्धवा॥३०॥उद्धवह्मणेश्रीपती॥पुरुषांचीसांगितलीगती॥ आतांस्त्रियांचीकैसीगती॥तीसांगावीस्वामिया॥३१॥उद्धवासीसांगेनारायण॥ही कथाएकचित्तेंकरून॥तुळसीदेवीचेंआख्यान॥यथानिगुतीऐकपां॥३२॥ज्याना रीतुळसीपूजनकरिती॥सदासौभाग्यवतीहोती॥पुत्रपौत्रसंपत्ती॥होयतुळसीपू- जनें॥३३॥तुळसीपासींचैतन्यवनमाळी॥भक्तांसीसांभाळीचंद्रमौळी॥ज्याना रीभावधरूनिप्रातःकाळीं॥तुळसीपूजिती॥३४॥ज्यानारीतुळसीचीपूजाचुकती॥ पुढिलेजन्मींसौभाग्यहीनहोती॥हावृत्तांतसांगेश्रीपती॥उद्धवालागोनियां॥ ॥३५॥ज्यानारीकरितीतुळसीपूजन॥नित्यज्यांसीमाझेंध्यान॥त्यांठावकेलातं यांलागुन॥वैकुंठासीराहावया॥३६॥वैकुंठवासींचीतुळसी॥सत्यजाणमृत्युलो कासीं॥पातकीउद्धरावयासी॥त्यांआणिलीनिश्चयें॥३७॥मृत्युलोकींचेंजनअ- भिमानी॥नओंळखतीतुळसीलागुनी॥ह्मणोनियमकरीलजाचणी॥त्याप्राणि यांसी॥३८॥तुळसीमंदिरमाहेर॥तेथेंमीवसेंसाचार॥दुसरानाहींविचार॥सत्य जाणगाउद्धवा॥३९॥तुळसीवनाचेंझाडम्हणती॥तेंझाडनव्हेविष्णुमूर्ती॥आपण सांगेऋषींप्रती॥शुकदेव॥४०॥जोप्राणीपूजीनित्यकाळीं॥मीत्याचाबालकतोमा झीमाउली॥नव्हहाताचीसाउली॥म्यांकेलीतयावरी॥४१॥तोतरीमाझाआत्मस खा॥आणिमीत्याचापाठिराखा॥तोमजहोयप्रीतिअधिका॥तुळसीपूजनें॥४२॥ भावेंतुळसीप्रदक्षिणाकरिती॥तेमाझेभक्तसख्यानिश्चिती॥उद्धवातेमजअतिप्री तींआवडती॥मीत्यांचाअंकित॥४३॥जोकरीतुळसीपूजन॥तोमाझाचित्तचैतन्य॥ उद्धवामीत्याचासज्जन॥सत्यसत्यजाणगा॥४४॥तुळसीचीआणिमाझीप्रीती॥ जेतुळसीपूंजाकरिती॥चिरंजीवतयांचीसंतती॥अखंडसौभाग्यतयांसी॥४५॥ तुळसीमीअभेददोन्ही॥जेहरिकथाकरितीनित्यानी॥त्यांच्याचुकतीयमजाच णी॥तेहोतवैकुंठवासी॥४६॥तुळसीसकरितीप्रदक्षिणा॥त्यांच्याचुकतीयमया

तना॥ बळेंनेती वैकुंठभुवना॥ त्या प्राणियांसीं॥४७॥ तुळसीस घालिती लोटां
गण॥ ते माझे प्रेमळ भक्त जाण॥ कृष्णा ह्मणे इची भक्ती करून॥ उद्धरती प्राणी
॥४८॥ जे प्राणी तुळसीचें करिती लग्न॥ त्यांचें चुकतें जन्ममरण॥ ते जाती वैकुंठा
लागुन॥ असत्य न ह्मणावें॥४९॥ व्यास सांगे जन्मेजयाप्रती॥ जे करिती तुळसीची
भक्ती॥ त्यांसी नाहीं जन्ममरणनिश्चिती॥ चिरंजीव ते जाणावे॥५०॥ स्त्रीपुरुष
दोघें जण॥ करिती तुळसीपूजा एकचित्तें करून॥ त्यांचें फिटे वांझपण॥ वदे व्या
सऋषी॥५१॥ जे प्राणी तुळसीस घालिती दंडवत॥ ते माझे भक्त जाण गा सत्य
॥त्यांचें माझें एकचित्त॥ ह्मणे हृषीकेश॥५२॥ तुळसीस बोले जो जाण॥ तो माझा
वैरी प्रत्यक्ष सगण॥ त्याचें हृदय पायें करीन चूर्ण॥ सत्य जाण उद्धवा॥५३॥ उणें
जो बोले तुळसीस॥ त्याचा मी करीन निर्वंश॥ श्रीकृष्ण म्हणे उद्धवास॥ असत्य नव्हे
कदाकाळीं॥५४॥ मजसी बोलती न्यूनता॥ त्याची नाहीं मज चिंता॥ तुळसीस बोल
ती अन्यथा॥ ते पावती महापतन॥५५॥ जो करील तुळसीची पूजा॥ तो प्रीतीचा भ
क्त माझा॥ वैकुंठासी जावया दुजा॥ मार्ग नसे जाणपां॥५६॥ तुळसीनाम उच्चारी
जो निशिदिनीं॥ तो माझा भक्त शिरोमणी॥ त्याचिया सत्वाची खाणी॥ उद्धरली आ
हे॥५७॥ जेणें षोडशोपचारीं पूजा केली॥ ऐसी ह्मणे कृष्णामाउली॥ लडिवाळपणें
आत्म बोली॥ उद्धवाप्रती बोलतसे॥५८॥ उद्धव ह्मणे देवा श्रीपती॥ दोन्ही कर जो
डून करीं विनंती॥ बरी सांगितली उद्धारगती॥ पापी यांची॥५९॥ तुळसीकथा ऐके
कानीं॥ कृष्णा ह्मणे उद्धवा लागोनी॥ ठाव केला वैकुंठभुवनीं॥ त्या प्राणियांसी॥
॥६०॥ फुकाचें घडे तुळसीपूजन॥ त्यालागीं प्रसन्न नारायण॥ हे देवा तुझें गुसदेणें
॥ह्मणे उद्धव॥६१॥ त्रैलोक्य असंर्की तुळसी जवळी॥ अठ्यायशीं सहस्र ऋषींच्या
मेळीं॥ साधुसंतांसहित गोपाळीं॥ तुळसीसान्निध॥६२॥ जे तुळसीस न पूजि
ती॥ अज्ञान अभिमानी न मानिती॥ ते भजन वोळखती॥ त्यासी नरकप्राप्ती
जाणपां॥६३॥ साक्षात् वैकुंठपाळ न यांसी॥ नाहींल टकीव खटनैसी॥ जे नाहीं
म्हणती तुळसीसी॥ ते मजसी नेणती॥६४॥ उद्धवा तूं माझा आवडता भक्त॥ त्या
हून विशेष सांगतों वृत्तांत॥ जो जाणे तुळसी भावार्थ॥ तो मला अत्यंत प्रियकर॥६५
मी निर्गुण निराकारू॥ मज कैंचा रे आकारू॥ मी झालों साकारू॥ भक्तांलागीं॥

॥६६॥ मजकेंचेरें शिखासूत्रें ॥ मजलानाहीं कुळगोत्र ॥ मजकेंचेइष्टमित्र ॥ निष्कलं कमीअसें ॥ ६७॥ जेसीदोनप्रहरचीसाउली ॥ तैसीमायामजमाजीमाइली ॥ हीरखू णमीसांगितली ॥ उद्धवातुज ॥ ६८॥ कल्पवृक्षाचीछाया ॥ तेथेंमीहोयतृप्तीपा वलिया ॥ तैसीभक्तींमाझीमाया ॥ जाणगाचिउद्धवा ॥ ६९॥ मजभक्तीनेंगोंविलें ॥ त्याच्याघरींम्यांदास्यत्वकेलें ॥ धर्माघरींम्यांउच्छिष्ठकाढिलें ॥ भक्तीलागींजा णपां ॥ ७०॥ उद्धवमाझाभक्तसरवा ॥ आणित्याचामीपाठीराखा ॥ सर्वांठायींने टका ॥ धर्मानेंबांधलिया ॥ ७१॥ नित्यभक्तीधर्मज्याचेघरीं ॥ तोमाझाजाणसाह्य कारी ॥ मीत्याचाकैवारी ॥ ऐकगाउद्धवा ॥ ७२॥ उद्धवकृष्णासीकायह्मणे ॥ माझीविनंतीस्वामीऐकणें ॥ एकअसेंस्वामीसपुसणें ॥ तेंसांगावेंदेवा ॥ ७३॥ कवणेठायींस्वामीचेंठिकाण ॥ तेंसांगाआह्मांलागुन ॥ मीबालकअज्ञान ॥ सांगिजेस्वामी ॥ ७४॥ उद्धवाऐकसावधान ॥ सांगतोंमाझेंठिकाण ॥ जेणेंहोय समाधान ॥ तुझियामनाचें ॥ ७५॥ एकभक्तांच्याहृदयकमळीं ॥ दुसरेंठिकाण तुळसीजवळी ॥ तिसरेंठिकाणसंतांचेमेळीं ॥ सत्यजाणउद्धवा ॥ ७६॥ कृष्ण मुखींचीऐकोनिवार्ता ॥ उद्धवेंचरणींठेविलामाथा ॥ धन्यधन्यगोपीनाथा ॥ मजसनाथत्वांकेलें ॥ ७७॥ उद्धवासीसांगेनारायण ॥ संतमाझेंचित्तचैतन्य ॥ माझेंसुखदुःखत्यांवीण ॥ कोणजाणे ॥ ७८॥ संतमाझेगुरुमीसंतांचाचेला ॥ त्याणींमाझेनामाचाविस्तारकेला ॥ नाहींतरीमजला ॥ कोणजाणे ॥ ७९॥ वै कुंठलोकींचीतुळसी ॥ संतेंआणिलीमृत्युलोकासी ॥ तुळसीनामसांगेजना सी ॥ तेंचनांवझालें ॥ ८०॥ उद्धवासीसांगेनारायण ॥ तरीतूं माझाभक्तसज्ज न ॥ ऐसेंहेंतुळसीचेंआख्यान ॥ विस्तारोनीसांगितलें ॥ ८१॥ हीकथाजेकरि तीश्रवण ॥ तयांचेंचुकेजन्ममरण ॥ तेजिवंतपाहतीवैकुंठभुवन ॥ सत्यजा णगाउद्धवा ॥ ८२॥ उद्धवह्मणेघननीळा ॥ तुझीनकळेमावळीला ॥ तुळसी पूजासांगितलीसकळा ॥ यथानिगुती ॥ ८३॥ ह्मणेनामाविष्णुदास ॥ हीक थाऐकतीसावकाश ॥ जेणेंहोयपापनाश ॥ नासतीब्रह्महत्या ॥ ८४॥ हेंतुळ सीचेंआहेआख्यान ॥ रसाळआहेनिरूपण ॥ संतविश्रांतमुनिजन ॥ आद रेंपरिसिजे ॥ ८५॥ ॥ इतिश्रीतुळसीआख्यानंसंपूर्णम् ॥ ॥



## शनिमाहात्म्यप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ ॥ओंनमोजीगणनायका॥एकदंतावरदायका॥स्वरू-
पसुंदराविनायका॥करींकृपामजवरी॥१॥आतांनमूंब्रह्मकुमारी॥हंसारूढवागी
श्वरी॥वीणाशोभेदक्षिणकरीं॥विजयमूर्तीसर्वदा॥२॥नमनमाझेंगुरुवर्या॥सु
खमूर्तीकरुणालया॥नमूंसंतश्रोतयांच्यापायां॥अभेदभेदाकरूनी॥३॥आतांन-
मूंश्रीपांडुरंगा॥यावेंतुवांकथेचियाप्रसंगा॥निरसूनिमाझियाभवभंगा॥करींकृ
पामजवरी॥४॥गुजरातभाषेचीकथा॥नवग्रहांचीतत्वता॥हीऐकतांएकचित्ता॥
संकटव्यथानबाधिती॥५॥आताउज्जयिनीनामनगरीं॥राजाविक्रमराज्यकरी
॥तेथीलचरित्राचीपरी॥ऐकाचित्तदेऊनियां॥६॥कोणीएकेदिवशींप्रातःकाळीं
॥बैसलीहोतीसभामंडळी॥तेथेंमहापंडितत्याकाळीं॥लहानथोरबैसले॥७॥ऐ
सीसभाबैसलीघनदाट॥तेथेंचर्चानिघालीस्पष्ट॥म्हणतीनवग्रहांतकोणश्रेष्ठ॥
सांगावेंनीटनिवडोनी॥८॥कोणत्याग्रहाचीकैशीस्थिती॥कैशीपूजाकैशीमती॥
कोणरूपकैशीगती॥ऐसेंयथार्थसांगावें॥९॥ऐसेंऐकतांचिउत्तर॥पंडितसरसा
वलेसमोर॥काढोनिपुस्तकांचासंभार॥बोलतीतेयथामतीनें॥१०॥प्रथमएक
पंडितबोलिला॥रविग्रहतोअसेभला॥जोलागेत्याच्याउपासनेला॥त्यासिग्रहक

दानबाधा॥११॥ रवितोसूर्यनारायण॥ अमरझालेतत्परायण॥ त्यांचींविघ्नें होतीनिरसन॥ महासामर्थ्यरवीचें॥१२॥ आधिव्याधिदरिद्र॥ स्मरणमात्रेंचि होतीदूर॥ मगउपासनाकरीजोनर॥ चिंतिलेअर्थसर्वपुरती॥१३॥ रवीतोमुख्यदैवत॥ त्यावीणसर्वहीजाणव्यर्थ॥ नवग्रहआज्ञापाळित॥ ऐसाश्रेष्ठरविग्रहहा॥१४॥ ऐकतांरवीचीवार्ता॥ आणित्याइतरग्रहांचीकथा॥ तेणेंनिवारेसर्वव्यथा॥ ऐसेनवग्रहहीसमर्थ॥१५॥ परीरवीअसेमहाबळी॥ सर्वांमाजीआतुर्बळी॥ प्रत्यक्षदिसतोनेत्रकमळीं॥ तोमहासूर्यनारायण॥१६॥ तंवदुसरापंडितबोलत॥ सोमासीअसेबळअद्भुत॥ तोमाळीअसेंम्हणवित॥ वनस्पतीपोषीतसे॥१७॥ जयाचेंआराध्यदैवत॥ शिवसांबकैलासनाथ॥ त्याच्याभाळींहाविलसत॥ म्हणोनिश्रेष्ठजाणावा॥१८॥ चंद्रवर्षेअमृतास॥ तृप्तकरीसर्वदेवांस॥ निशिराजमहारूपस॥ षोडशकळाजयासी॥१९॥ तोनग्रांजीचकोणासी॥ अतिसौख्यदातासर्वांसी॥ सदासर्वदानिर्मळमानसीं॥ धन्यजयाचेंपूजन॥२०॥ मगतिसरापंडितबोलत॥ ऐकरायास्फनिश्चित॥ मंगळतोमहासमर्थ॥ कथाऐकतयाची॥२१॥ मंगळग्रहमहाक्रूर॥ जैसीकांतेरखड्गाचीधार॥ तयाचानकळेपार॥ सर्वग्रहांमाजीवरिष्ठपैं॥२२॥ मंगळग्रहसोनार॥ क्रूरताजयाचीअतिथोर॥ परीतोपूजकांसीकृपाकर॥ मंगळकरीसर्वदा॥२३॥ जेगर्वधरूनिपूजानकरिती॥ त्यांवरीतोखवळेउग्रमूर्ती॥ विलयाजायसंततीसंपत्ती॥ शेवटींनाशकरीजीविताचा॥२४॥ तोचिपूजकांसीसदाप्रसन्न॥ सर्वअर्थकरीपावन॥ सर्वदुःखनिरसून॥ अंतर्बाह्यसंरक्षी॥२५॥ तंवबोलेचवथापंडित॥ बुधअसेमहाबळवंत॥ बुधाचाप्रतापअद्भुत॥ सर्वग्रहांमाजी॥२६॥ बुधजातीनाअसेवाणी॥ नवग्रहांतशिरोमणी॥ विघ्ननाशतीनत्याच्यापूजनीं॥ सर्वानंदप्राप्तकरी॥२७॥ बुधज्यावरीकृपाकरी॥ लक्ष्मीवंतत्यासिकरी॥ ऐसातोमहापरोपकारी॥ बुधग्रहजाणिजे॥२८॥ बुधग्रहआहेज्यासनीट॥ सर्वमार्गसुचतीसुभट॥ कोणत्याकार्यासहीतूट॥ तोनपाडीकल्पांतीं॥२९॥ बुधाचीबुद्धिभारी॥ कोणासीनिष्ठुरतातोनकरी॥ संसारचिंताहरी॥ प्राणिमात्रांची॥३०॥ मगबोलेपांचवापंडित॥ गुरूचेंसामर्थ्यअसेअद्भुत॥ गुरुतोश्रेष्ठसर्वांत॥ इंद्रादिदेवांसमस्तां॥३१॥ गुरुज्ञानाचानकळेपार॥ भाविकांसितोकरुणाकर॥ क

मेंअकर्मीचाकरीचूर ॥ भवभन्यव्यथेसी ॥ ३२ ॥ दुःखआणिदरिद्ररोग ॥ स्मरणमात्रेंहोयभंग ॥ नवग्रहांतमहायोग्य ॥ ऐसाजाणिजे ॥ ३३ ॥ गुरुजातीचाअसेब्राह्मण ॥ सर्वांतश्रेष्ठअसेवर्ण ॥ सर्वदेवकरितीमान्य ॥ गुरुवचनासी ॥ ३४ ॥ गुरुअसेज्ञानाचापुरा ॥ तयाच्यासाम्यासिनसेदुसरा ॥ त्यापुढेंनसेचीथारा ॥ कल्पनेच्याकदाही ॥ ॥ ३५ ॥ म्हणोनिकरितांगुरुसेवा ॥ मगग्रहांचाकोणकेवा ॥ गुरुसर्वभावेंभजावा ॥ तेणेंसंतोषसर्वग्रहांसी ॥ ३६ ॥ शिवकरीगुरुपूजनासी ॥ तेथेंपाडकायइतरांसी ॥ ऐसाश्रेष्ठजोसर्वांसी ॥ आगमागमा ॥ ३७ ॥ तंवसाहवापंडितबोलिला ॥ शुक्रग्रहअसेबहुभला ॥ जेणेंअसुरांउपकारकेला ॥ संजीवनीमंत्रेंकरूनी ॥ ३८ ॥ शुक्रगुरुतोदैत्यांचा ॥ त्रिभुवनींधाकवाहतीजयाचा ॥ पारनकळेसामर्थ्याचा ॥ म्हणोनिश्रेष्ठतो ॥ ३९ ॥ शुक्राचीशक्तीआहेफार ॥ तोकरीकर्माकर्मांचाचूर ॥ विघ्नेंपळतीदूरच्यादूर ॥ शुक्राचेंनामघेतां ॥ ४० ॥ शुक्रपूजनींजेतत्पर ॥ त्यांच्याशौर्यासीनाहींपार ॥ जोदिव्यदेहीनिरंतर ॥ एकाक्षतो ॥ ४१ ॥ आधिव्याधिदुःखदरिद्र ॥ स्मरणमात्रेंचहोतीदूर ॥ सर्वाभीष्टपरिकर ॥ प्राप्तकरीपूजकांसी ॥ ४२ ॥ नवग्रहांतशिरोमणी ॥ ज्याचामहिमावर्णिजेपुराणीं ॥ मान्यताश्रेष्ठसर्वांहूनी ॥ शुक्राचीअसेजाणपां ॥ ४३ ॥ ऐसेंहेसहाग्रहएकोनिराजा ॥ तर्जनीमस्तकडोलवीवोजा ॥ म्हणेउत्तमकथिलेंकाजा ॥ अखंडितयांतेंस्मरावें ॥ ४४ ॥ आणिकग्रहराहिलेकोण ॥ सांगापंडितहोनिवडून ॥ कैसींत्यांचींनामेंखूण ॥ त्यामूर्तींसिबोलिजे ॥ ४५ ॥ मगसंकेतेंबोलेपंडित ॥ राहूआणिदुसराकेत ॥ हेउभयतांअतिअद्भुत ॥ दैत्यकुळींचेअसती ॥ ४६ ॥ मातंगजातीचेदोन्ही ॥ दुष्टक्रियाम्हणवोनी ॥ त्यांच्यादर्शनेंचंद्रसूर्यगगनीं ॥ चळचळांकांपती ॥ ४७ ॥ राहूपीडीचंद्रासी ॥ केतुतोसूर्यासी ॥ ग्रहणबोलिजेतयासी ॥ प्रत्यक्षदृष्टीसीदिसतसे ॥ ४८ ॥ प्राणिमात्रसर्वजन ॥ त्यांसीनसांडितीपीडेवीण ॥ परीकेलियापूजनस्मरण ॥ किंचित्पीडाकरिताती ॥ ४९ ॥ राहूमहापीडकअनिवारमाया ॥ तद्रूपचिकेतुजाणराया ॥ उभयतांचीएकचर्या ॥ पूजनस्मरणेंतोषती ॥ ५० ॥ सर्वग्रहांपरीसअतिक्रूर ॥ जनांसिपीडाकरितीफार ॥ म्हणोनिपूजनस्मरणनिरंतर ॥ राहूकेतूंचेंकरावें ॥ ५१ ॥ तंवनवांपंडितबोलत ॥ शनिग्रहश्रेष्ठअवघ्यांत ॥ बलाढ्यहोयअद्भुत ॥ नकळेकळातयाची ॥ ५२ ॥ तोज्यावरीकरीकृपा ॥ त्यासिसर्वमार्गअसेसोपा ॥ ग्रहदि-

ऱ्यालांवरी छोपा ॥ तयाशंनिग्रहाचा ॥ ५३ ॥ ज्याबरीतो कोपासिचढे ॥ तयाव रीनानाविघ्नेंयेतीरोकडे ॥ नयाचासंसारविघडे ॥ नराहेकल्पांतीं ॥ ५४ ॥ शनिदे वमहाक्रोधी ॥ ज्याचापराभवनोहेयुद्धीं ॥ देवदानवांत्रिशुद्धीं ॥ दुःखदाताशनि देव ॥ ५५ ॥ जोकांभाविकसुज्ञाननर ॥ तोयाग्रंथाचाकरीआदर ॥ पूजनस्मरणनि रंतर ॥ त्यावरीकृपाकरीशनिदेव ॥ ५६ ॥ शनेश्वराचीमूर्तीकाळी ॥ तोजातीचाहो यतेली ॥ चरणपंगुस्फुरतचांगली ॥ पूजाकरीकाळभैरवाची ॥ ५७ ॥ त्याचीदृष्टीपडे जयावर ॥ करीतयाचाचकनाचूर ॥ अथवाकृपाकरीजयावर ॥ तयासीसर्वआन दप्राप्तहोय ॥ ५८ ॥ दृष्टीचाऐकाचमत्कार ॥ जन्मलाजेव्हांशनैश्वर ॥ तेव्हांदृष्टीप डलीपित्यावर ॥ तेणेंकुष्ठभरलेंसर्वांगीं ॥ ५९ ॥ पित्याच्यारथींहोताजोसारथी ॥ तो पांगुळझालानिश्चितीं ॥ अश्वांचियानेत्रांप्रती ॥ अंधत्वआलेंतत्क्षणीं ॥ ६० ॥ तेव्हांत्यांनींउपायकेलेफार ॥ तरीगुणनयेचिअणुमात्र ॥ जंवदृष्टीफिरवीशनेश्वर ॥ तंवतिघेहीआरोग्यपावले ॥ ६१ ॥ ऐसेंऐकनांराजाविक्रम ॥ हांसूनिबोलेसप्रेम ॥ म्हणेपुत्रजन्मोनिकायकाम ॥ ऐसाअपवित्रजो ॥ ६२ ॥ तोपुत्रनव्हेकेवळवैरी ॥ जो उपजतांचिऐसेंकरी ॥ पुढेंतोकायनकरी ॥ सांगापंडितहो ॥ ६३ ॥ ऐसेंबोलिलाहांसो न ॥ करींटाळीवाजवीगर्जोन ॥ सभेसीविनोदवचन ॥ म्हणेहापुत्रकेसाहो ॥ ६४ ॥ ऐसेंबोलतांतेअवसरीं ॥ कैसीवर्तलीनवलपरी ॥ तेऐकावीआतांचतुरीं ॥ चित्त देऊनियां ॥ ६५ ॥ त्यासमयींशनिदेवविमानीं ॥ जातहोतेबैसोनी ॥ रायाचेंवा क्यऐकतांतत्क्षणीं ॥ विमानखालींउतरिलें ॥ ६६ ॥ अकस्मातयेऊनिसभेंत ॥ बैसलेतेव्हांविमानासहित ॥ तंवपाहतेझालेसभापंडित ॥ म्हणतीआलेशनिदेव ॥ ६७ ॥ मगरावउठेझडकरोनी ॥ जाऊनिनमनकरीचरणीं ॥ तंवटाकिलाझि डकारूनी ॥ शनिदेवानें ॥ ६८ ॥ म्हणेतूंराजाऐसामस्त ॥ टवाळीकरिशीअ- द्भुत ॥ याचाचमत्कारक्षणांत ॥ दावीनपाहेंआतांची ॥ ६९ ॥ तूंफारकरितो सीटवाळी ॥ नसतीचचढविलीकळी ॥ तरीकन्याराशीसमुळीं ॥ तुजलाग्रह मीआलों ॥ ७० ॥ तरीआतांपाहेंमाझाचमत्कार ॥ तूंनकोकरूंगर्वफार ॥ ऐसेंवदो निअतिसत्वर ॥ विमानारूढपैंझाला ॥ ७१ ॥ तंवतोरावलागेचरणांसी ॥ म्हणेकृ पाकरावीदीनासी ॥ अन्यायघालींपोटासीं ॥ कृपाळूवाशनिदेवा ॥ ७२ ॥ नरीतोन

॥२६॥ पीतांबरआणिवनमाळा॥ चारुहास्यघनसांवळा॥ ऐसादेखतांचितेवेळा॥ मस्त कठेविलातयेचरणीं॥२७॥ सद्गदवाणीकरूनी॥ शतानंदलागेतयाच्याचरणीं॥ ह्मणेहे भवनाशकमोक्षदानी॥ शरणतुजमीअसें॥२८॥ शतानंदउवाच॥ नमस्कारकरूनियां चरणीं॥ भवसमुद्रांतबुडोनी॥ तुझेंस्वरूपविसरोनी॥ मूढमायझालोंमी॥२९॥ आदिअ नादिमायेचाकर्ता॥ तूंचिभक्तांचींसंकटेंहर्ता॥ तुझेआज्ञेवीणात्रिजगता॥ सामर्थ्यदेवा दिकांनसे॥३०॥ नमूंसत्यनारायणरूप॥ विश्वहेंतुझेंस्वरूप॥ तूंचिसर्वांचाकाळरूप॥ तार कसर्वांसीचतूं॥३१॥ भाग्यमाझेंउदयासिआलें॥ तुझेरूपेंपाहिलींपाउलें॥ मजदीनातेंउ द्धरिलें॥ नारायणासर्वेशा॥३२॥ मीनजाणेंवदणाप्रकार॥ केलामाझाअंगीकार॥ आ दिअनादिविश्वंभरा॥ मजदीनातेंतारावें॥३३॥ मीदरिद्रीकरून॥ व्यापिलोंआहेंपरिपूर्ण ॥आतांतुझेपूजेचेंविधान॥ संपूर्णसांगेंमजलागीं॥३४॥ मुकेकरिशीलवाचाळ॥ गिरि वरचढेपांगुळ॥ तुझ्याकृपेचापरिमळ॥ संतजनसेविती॥३५॥ ॥सत्यनारायणउ०॥ द्रव्यादिकेंमजनव्हेतृप्ती॥ भक्तीचीकेवळमजप्रीती॥ हास्यकरूनमधुरगती॥ ऐसें बोलताजाहला॥३६॥ बहुतधनाचेंनव्हेकारण॥ अनायासेंमिळेलतेणेंकरून॥ भक्ती नेंकरावेंपूजन॥ षोडशोपचारेंकरूनियां॥३७॥ नवग्रहआदिकरून॥ संकटांतनि र्मुक्तझालेजाण॥ केवळभक्तीचेंचकारण॥ आणीकप्रियमजनाहीं॥३८॥ आतांपूजे चेंविधान॥ सांगतोंसर्वनिधान॥ अनायासेंनकरितांप्रयत्न॥ भक्तिभावेंभजावें॥३९ ॥गृहींअथवामंदिरांत॥ सौम्यवारींयथास्थित॥ नानाप्रकारेंतोरणादिसमवेत॥ स्थंडि लतेथेंकरावें॥४०॥ पांचकलशउदकेंपूर्ण॥ आणूनस्थापावेपरिपूर्ण॥ वरीदीपप्रज्वळून॥ घृतेंकरूनठेवावे॥४१॥ मध्येंमांडूनसिंहासन॥ त्यावरीशालिग्रामस्थापून॥ ब्राह्मणमुखें पूजन॥ यथाविधीकरावें॥४२॥ अथवाविष्णुमूर्ती॥ स्थापूनपूजावेंयथामती॥ भक्तिभा वेंमनोरथपूर्ती॥ सत्यसत्यजाणपां॥४३॥ धूपदीपाचाविस्तार॥ करावाजोयथाप्रका र॥ नैवेद्याचाहीविचार॥ तोहीऐकपांयथाविधी॥४४॥ सपादगोधूमचूर्ण॥ घृतांतत्या सआहाळून॥ दूधशर्करामेळवून॥ पाकसिद्धकरावा॥४५॥ षड्रसयुक्तपक्वान्न॥ ओदनआणिमिष्टान्न॥ नानाप्रकारचींकरून॥ भक्तींमजअर्पावीं॥४६॥ मध्येंपा नीयआचमन॥ सुगंधयुक्ततांबूलजाण॥ श्रीफलादिदक्षिणारत्न॥ यथाविभवें अर्पावें॥४७॥ मेळवूनसकळआप्तजन॥ गृहस्थादिसंपूर्ण॥ कथाइतिहासजा-

ण॥आदरें करूनऐकावा॥४८॥भिल्लराजाआणिवणिक॥चरित्रत्यांचेंअनेक॥उद्ध
रूनगेलेभाविक॥शुद्धभावेंकरूनियां॥४९॥याप्रकारेंपूजाकरोनी॥जीकामनाइ
च्छितीलमनीं॥तीतीमीपूर्णकरूनी॥अंतींनेईननिजधामा॥५०॥द्रव्याचीमजनाहीं
प्रीती॥अंतःकरणापासूनिभक्ती॥करूनिआळवावेंमजप्रती॥पुत्रादिकदेईनसर्व
भावें॥५१॥ऐसेंदेवोनिवरदान॥ब्राह्मणरूपअंतर्धान॥झालेआपणसत्यनाराय
ण॥आपुलेंपूजनप्रकटकेलें॥५२॥ब्राह्मणविस्मितहोऊन॥घरींआलापरतोन॥
स्त्रियेसीसर्ववर्तमान॥सांगताझालातेधवां॥५३॥उभयतांनमस्कारकरून॥जें
कांआजीभिक्षेंतमिळेलअन्न॥त्यांतसत्यनारायणाचेंपूजन॥यथाविधीकरीनमी॥
॥५४॥हानिश्चयकरोनतेवेळां॥भिक्षेसीनगरांतपातला॥नमागतांपूर्णझाला॥म
नोरथब्राह्मणाचा॥५५॥ब्राह्मणासीहर्षझाला॥विस्मयहीमनांतकेला॥श्रीहरीप्र
सन्नझाला॥सत्यनारायणरूपानें॥५६॥स्त्रियेनेंत्याचकाळीं॥पतिआज्ञावंदूनभा
ळीं॥पूजासामग्रीआणूनमंडळी॥आप्तमित्रादिमिळविले॥५७॥सत्यनारायणाचें
पूजन॥यथाविधीनेंकरून॥इतिहाससकळश्रवण॥करूनिकृतकृत्यजाहला॥५८
॥भक्तीपाहोनितात्काळ॥प्रसन्नझालाघननीळ॥ब्राह्मणातेंसांगेप्रेमळ॥माग
इच्छितवरदान॥५९॥ ॥शतानंदउ०॥ ॥रथअश्वआणिहत्ती॥मंदिरेंआणि
चामरेंडुलतीं॥दासदासीआणिपदाती॥लक्ष्मीविपुळदेईमज॥६०॥गाईम्हशीवा
सरेंसहित॥दूधविपुलआनंदेंदेत॥कायावाचाकरूनिमनांत॥आपुलीभक्तीही
द्यावी॥६१॥तथास्तुम्हणेभगवंत॥दिधलेंतुलामनवांछित॥अंतकाळींमाझेंप
दप्राप्त॥तुजहोईलविप्रोत्तमा॥६२॥ऐसेंपावोनवरदान॥कृतकृत्यझालाब्रा
ह्मण॥नानाभोगभोगीतआपण॥स्त्रीपुत्रादिसमवेत॥६३॥दंडवतनमस्कारघा
लुनी॥प्रसादघेतलाआदरेंकरूनी॥आपआपलेघरालागुनी॥सर्वजातेजाहले॥
॥६४॥धन्यधन्यहाब्राह्मण॥यासीप्रसन्नझालासत्यनारायण॥त्यादिवसापासू
न॥व्रतप्रसिद्धझालेंकलियुगीं॥६५॥आतांपुढेंआख्यान॥भिल्लाचेंहीसांगेन॥
उद्धरूनपावलामोक्षसदन॥कथापावनऐकावी॥६६॥ ॥इतिश्रीइतिहाससमुच्च
येप्रथमोऽध्यायः॥१॥ ॥सूतउवाच॥ निषादएककाष्ठेंवेंचुनी॥नित्यविकावया
गांवांतआणी॥एकेदिवशींकाशीस्थानीं॥भाराआणूनठेविला॥१॥तोझालातृ-

षाक्रांत॥शतानंदाचेघरींयेत॥पाणीपिऊनविस्मित॥मनींबहुतझालासे॥२॥हा ब्राह्मणनिष्कांचन॥याचेघरींइतुकेंधन॥व्हावयासीकायकारण॥तयालागींपुसता झाला॥३॥निषादउ०॥हेब्राह्मणातूंदरिद्रीअंसतां॥कोठूनवैभवआलेंआतां॥दासी दासादिप्रभुता॥प्राप्तझालीतुजलागीं॥४॥हातजोडूनिम्हणेतया॥तूंसमर्थसांगाव या॥मजवरीआतांकरूनिदया॥झालेंतेंसर्वसांगावें॥५॥शतानंदउ०॥सत्यनारा यणदेव॥तयासिपूजितांकायनहोय॥कलींतज्याचाप्रभाव॥शेषासहीनवर्णवे॥६ ॥त्याचेंमीकेलेंपूजन॥यथाविभवेंकरून॥मजवरीतयेंप्रसन्न॥होऊनिवैभवदी धलें॥७॥निषादउ०॥ब्राह्मणाससाष्टांगनमन॥करूनिम्हणेदेवसत्यनारायण ॥यथाविधीत्याचेंपूजन॥मजलागींसांगावें॥८॥कोणविधानकायअर्चन॥उपचा रविधीकोण॥हेंसर्वसांगेमजलागून॥शरणतुजअसेंमी॥९॥साधूचेंजेंकांचित्त॥ समानउपकारीराहत॥कांहींगोष्टनठेवितांवृत्तांत॥वदावेंजीस्वामिया॥१०॥हें ऐकोनियांतेवेळां॥ब्राह्मणसर्वसांगताझाला॥राजाकृतार्थजेणेंजाहला॥तोइतिहा सर्सवही॥११॥श०उ०॥कोणीएकराजापुण्यवंत॥केदारमणिपूरनगरांत॥बहुतदिव सराज्यकरीत॥प्रजापाळकधार्मिक॥१२॥शांतमधुरवाचकधीर॥नारायणींतत्पर ॥सेनापतीधुरंधर॥माझेआश्रमींयेताझाला॥१३॥सत्यनारायणाचेंअर्चन॥मीक रीतहोतोंजाण॥हेंपाहूनतोआदरेंकरून॥मजपुसताझाला॥१४॥मीत्याससांगि तलाप्रकार॥तोचिऐकेंसर्वविस्तार॥कामनाइच्छूनिकरितीजेनर॥निष्कामकरिती क्वचित्॥१५॥मजसांगितलेंनारायणें॥तेंचिविधानसर्वपूर्ण॥सांगताझालोंत्याला गुन॥पूर्वपीठिकाज्यापरी॥१६॥त्याचप्रकारेंजाण॥पूजिताझालासत्यनारायण॥ राजाचेमनोरथपूर्ण॥होतेझालेतयेवेळीं॥१७॥पूजाकरावीभक्तीकरून॥वित्तशाठ्य विवर्जून॥तोषतनाहींनारायण॥द्रव्यसंभारेंकरूनी॥१८॥श्रीनारायणपरमात्माजाण ॥तयासीसर्वांचाअभिमान॥सोसतनाहींहेंसत्यजाण॥भक्तीनेंचपूजावा॥१९॥सु दामदेवाचेपोहेभक्षण॥प्रीतीनेंकरीनारायण॥विदुरगृहींतैसाजाण॥आतिथ्येंक रूनतोषला॥२०॥दुर्योधनाचेघरीं॥पूजानअंगिकारीश्रीहरी॥विदुराचियेमंदिरीं॥ राहताझालागोविंद॥२१॥गोपीअजामेळआणिव्याध॥हनुमंतबिभीषणआणिगीध ॥अधमकायजेकांप्रसिद्ध॥दैत्यदानवतारिले॥२२॥ऐसेंऐकोनियांराजा॥पूजासंभा

रआणोनियांवोजा ॥ मिळवूनिप्रीतीनेंसमाजा ॥ भक्तिपूर्वकपूजित ॥ २३ ॥ ऐसेंनिषाद अकिंचन ॥ भक्तिभावेंकरीपूजन ॥ सर्वभावेंत्यासीशरण ॥ जाईंतूं सत्यनारायणा ॥ २४ ॥ यालोकींसर्वसुखजाण ॥ अंतींश्रीहरीचेचरण ॥ पावसीलहेंमाझेंवचन ॥ सत्य सत्यजाणतूं ॥ २५ ॥ ऐसेंऐकतांचिनेवेळां ॥ निषादेंनथासिनमस्कारकेला ॥ तेथूनीआ पुलेघरींआला ॥ राहताझालाआनंदें ॥ २६ ॥ आपलेस्वजातीजन ॥ निषादेंसर्वबोला वून ॥ सांगीतलेंवर्तमान ॥ सत्यनारायणपूजेचें ॥ २७ ॥ मनींनिश्चयकेलातयानें ॥ आजकाष्ठविक्रयांतजेंधन ॥ मिळेलत्याचेंसाहित्यआणून ॥ सत्यनारायणपूजीनमें ॥ २८ ॥ ह्यानिश्चयकरूनिगेला ॥ तोंअनायासेंधनपावला ॥ चतुर्गुणितनयेवेळां ॥ आनंदझालामनांत ॥ २९ ॥ आपुलेघरींयेऊन ॥ स्त्रियेसीबोलावून ॥ सांगताझा लाप्रेमेंकरून ॥ पूजासामग्रीआणीतूं ॥ ३० ॥ तीऐकूनआनंदयुक्त ॥ पूजनाचेंसा हित्यआणित ॥ गोधूमचूर्णआणिघृत ॥ दुग्धशर्कराआणिली ॥ ३१ ॥ त्यांचाकरूनि- यांपाक ॥ आणिकपक्वान्नेंअनेक ॥ पुत्रपौत्रादिआप्तसकळिक ॥ अर्चनालागींबो लाविले ॥ ३२ ॥ ब्राह्मणउपाध्याययेऊन ॥ स्थापितेझालेसत्यनारायण ॥ यथाविधी पूजनकरवून ॥ कथाश्रवणकरविली ॥ ३३ ॥ भक्तिभावेंनमस्कार ॥ करिताझालानिषा देश्वर ॥ प्रसादेंसर्वांसीआदर ॥ सेवितेझालेतत्काळ ॥ ३४ ॥ यालोकींभोगवासना ॥ जीजीकेलीत्यांनींकल्पना ॥ तेदेताझालासत्यनारायण ॥ अंतींसान्निध्यतयांतें ॥ ३५ ॥ ॥ इतिश्रीइतिहाससमुच्चयेद्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ ॥ सूतउवाच ॥ ॥ आतांकथा इतिहास ॥ पुढीलअनुसंधानविशेष ॥ जेणेंकृतार्थझालावैश्य ॥ रायाचियाउपदेशें ॥ १ ॥ मणिपूरनगरांत ॥ चंद्रचूडनामेंराजाविख्यात ॥ त्यानेंमेळवूनजनसमस्त ॥ सत्यना- रायणपूजिताझाला ॥ २ ॥ रत्नपूरचाराहणार ॥ साधुनामेंवाणीथोर ॥ नौकेंतभरून धनफार ॥ येताझालानदीमार्गें ॥ ३ ॥ बहुतजनांचासमुदायतेथ ॥ पाहताझालाय- थार्थ ॥ मनींधरूनियांमनोरथ ॥ येताझालातेठायीं ॥ ४ ॥ चांदवेलखलखीतगहन ॥ मणीमोत्यांनींशोभायमान ॥ नृत्यवाद्येंआणिगायन ॥ तेंहीऐकताझाला ॥ ५ ॥ ब्रा ह्मणकरितीवेदाध्ययन ॥ ऐसेंमनोहररम्यस्थान ॥ पाहूनहर्षयुक्तमन ॥ वैश्याचेंजा हलें ॥ ६ ॥ कर्णधारासिह्मणेवचन ॥ मीपाहोनयेतोंपरतोन ॥ तोंपर्यंतनौकास्थून ॥ चालूतुह्मीनंकरावी ॥ ७ ॥ त्यावेळींसेवकजन ॥ हातजोडूनबोलतीवचन ॥ आज्ञा

तुमचीप्रमाण॥ पाहूनियावेंस्वामिआ॥८॥ वैश्यनावेंतूनउतरून॥ नमस्कारूनि यांसभाजन॥ पुसताझालातयांलागुन॥ काययेथेंहोनसे॥९॥ सभ्यबोलतीव चन॥ येथेंसत्यनारायणाचेंअर्चन॥ कलियुगींऐसादेवजाण॥ दुसरानाहींसर्वथां ॥१०॥ राजालोकांचेहिताकरितां॥ पूजनाचीकरीप्रसिद्धता॥ कलियुगींह्याप्रकार वाढतां॥ लोकतरतीलसमस्त॥११॥ दोनघटिकायेथेंराहून॥ कथाऐकपामगहन॥ नंतरप्रसादघेऊन॥ जावेंआपुलेनौकेवरी॥१२॥ ऐसीऐकूनियांसाधुवाणी॥ बरें बोलतयांलागुनी॥ कैसेंपूजनकरावेंकोणी॥ हेंसर्वमुनीसांगावें॥१३॥ स०उ०॥ स त्यनारायणाचेंपूजनफळ॥ ब्रह्माआणिदेवसकळ॥ सांगावयानाहींप्रबळ॥ ऐसा- कलियुगींफळदाता॥१४॥ परंतुथोडेंतुजलागुन॥ सांगतोंऐकप्रेमेंकरून॥ निर्धनी होऊनिधनवान॥ अतिउत्तमसुखभोगी॥१५॥ अपुत्रीपुत्रवानहोऊन॥ अंधायेती नयन॥ राज्यगेलेंतयालागुन॥ प्राप्तहोयतत्काळ॥१६॥ जीजीकामनाकरितीजन॥ तीतीदेतोसत्यनारायण॥ पूजकांचेंसर्वविघ्न॥ तत्काळनासत॥१७॥ साधूवाणीहेंऐ- कून॥ गळ्यांतआंगवस्त्रघालून॥ सभ्यांसनमस्कारकरून॥ बोलताझालातेवेळां॥१८ ॥सा०॥ मजलासंततीनाहींजाण॥ कृपाकरूनसत्यनारायण॥ पुत्रअथवाकन्यार- त्न॥ कृपेनेंजेंदेईल॥१९॥ पताकाकांचनीकरून॥ मीपूजीनसत्यनारायण॥ हेंऐकू नसमस्तजन॥ म्हणतीप्राप्तहोयतुजलागीं॥२०॥ ऐकूनिहेंप्रतिउत्तर॥ संतोषलेंत्याचें अंतर॥ करूनिश्रीहरीसनमस्कार॥ प्रसादघेताझाला॥२१॥ तेथूनिआलानावेवरी ॥सेवकांसआज्ञाकरी॥ नौकाचालवावीसत्वरी॥ घराप्रतीयेताझाला॥२२॥ स्त्रियेनें मंगळवैभवें॥ साधुओंवाळिलाजीवेंभावें॥ आनंदेंकरूनस्वभावें॥ श्रीहरीसीभजत से॥२३॥ गेलाकौतुकेंकांहींकाळ॥ ऋतुस्नातझालीवेल्हाळ॥ पतीचेसंयोगेंकरूनितत्का ळ॥ गर्भधारणकरितीझाली॥२४॥ नऊमासभरतांजाण॥ प्रसवलीकन्यारत्न॥ मुख केवळरोहिणीरमण॥ नेत्रकमळासारिखे॥२५॥ साधुकरूनिमंगळस्नाना॥ करीक- न्येचेमुखावलोकना॥ ब्राह्मणांआणिबंदीजनां॥ द्रव्यअपारदीधलें॥२६॥ जन्मपत्रव र्तवूनी॥ कलावतीनामठेवूनी॥ ब्राह्मणआनंदेंकरूनी॥ जातेझालेस्वस्थाना॥२७॥ कलानिधीचंद्रासीम्हणत॥ तोइचेमुखावरीवासकरित॥ कलावतीनामठेवित॥ म्हणो निसर्वब्राह्मण॥२८॥ शुक्लपक्षींकलावाढत॥ तेशीतीथोरहोत॥ प्रौढावस्थातीसयेत॥

विवंचनाकरीलग्नांची ॥२९॥गोकांचनपूरविख्यात॥तेथेंशंखपतीवाणीराहत॥ ध
निकआणिकुळवंत॥ घरनेमिताझाला॥३०॥शुभदिवसलग्नपाहून॥ कन्याअर्पिली
त्यालागुन॥अग्नीब्राह्मणांचेसाक्षेन॥लग्नकरिताझाला॥३१॥वाद्यनृत्यादिगीत॥
याचकांबहुतद्रव्यदेत॥सोहळाकेलादिवससात॥आंदणफारदीधलें॥३२॥जामा
तासीपुत्रमानून॥ घरींठेविलातत्क्षण॥सत्यनारायणाचेंअर्चन॥केलेंनाहींजाणपां
॥३३॥इतिनृ०॥ सूतउ०॥आतांसाधूचाइतिहास॥श्रवणकरासांगतोंतुम्हांस॥भोगो
नियांसर्वविलास॥अंतींसान्निध्यपावला॥१॥पाहूनियांसुमुहूर्त॥व्यापारकरावयासी
निघत॥मणीमोतींरत्नेंबहुत॥नौकेंतभरूनचालला॥२॥संगेंघेऊनजामात॥देशांतरीं
प्रयाणकरित॥एकनगरअतिअद्भुत॥नर्मदातीरींपाहिलें॥३॥तेथेंजामातासहित॥रा
हिलात्याजागेंत॥क्रयविक्रयआसमंतांत॥करीतसेआनंदें॥४॥ करावेंसत्यनारा
यणाचेंपूजन॥हेंतयासीनाहींस्मरण॥ धनधान्यामाजीप्रमादेंकरून॥ सदांलुब्ध
जाहला॥५॥त्याकर्मविपाकेंकरून॥तापपावलापरमगहन॥एकेदिवसींत्यान
गरांतजाण॥चोरींराजभांडारफोडिलें॥६॥ त्यांतीलमणिमोतियांच्यामाळा॥घेते
झालेपाहूनसकळा॥ निद्रेनेंव्यापिलेंरक्षपाळां॥कोणीपाहतानझाला॥७॥सूतमा
गधबंदीजन॥जागेकरितीराजालागुन॥शौचविधीस्नानकरून॥बसताझाला
सिंहासनीं॥८॥ सेवकजनसर्वयेऊन॥करूनियांसाष्टांगनमन॥ सांगतीवर्तमान
॥चोरेंभांडारफोडिलें॥९॥ रत्नमाळादिधन॥नेलेंसर्वहरणकरून॥ आज्ञाकेलीस
मस्तांलागुन॥ धरूनिआणाचोरांतें॥१०॥नआणितांतस्कर॥होईलतुमचाघात
फार॥हेंऐकूनदूतविचार॥करितेझालेतेधवां॥११॥शोधितीग्रामांतर॥कोठेंनला
गेत्याचाथार॥विलापकरितीनानाप्रकार॥ आतांकायकरावें॥१२॥राजाआतांदंड
करून॥ घेईलसर्वांचेप्राण॥ऐसेंमनांतभयमानून॥कायकरितेझाले॥१३॥पर
देशीसाधूसजाणून॥थोरचोरहाचस्थापून॥त्यासीकेलेंबंधन॥साधुजामातासहित
॥१४॥रत्नेंआणिमौक्तिकमाळा॥वस्त्रेंघेतलींसकळा॥ पुढेंघालूनदोघांला॥राजापा
शींआणिले॥१५॥ प्रतिकूळहरीत्यासझाला॥ह्मणूनराजाकांहींनबोलिला॥धनत्या
चेंतयेवेळां॥राजभांडारींठेविलें॥१६॥ साधूयासकारागृहीं॥घालतेझालेजामा
तासही॥लोहशृंखलापायांतत्यांहीं॥सेवकजनींघातल्या॥१७॥साधुजामाता

सहित॥ वारंवारविलापकरित॥ ह्मणेहेपुत्रहेतात॥ धनआपुलेंकोठेंगेलें॥१८॥को
ठेंमाझीभार्याअसेल॥ कलावतीकायकरील॥ विधाताझालाप्रतिकूळ॥ आतांका
यकरावें॥१९॥ ऐशादुःखांतनिमग्न॥ होऊनिकरीचिंतागहन॥ मोठया प्रयासें हें
धन॥ मेळविलेंहोतेंमीं॥२०॥ कोणत्याकर्मविपाकें करून॥ कोणत्यापापाचेंआच
रण॥ मींकेलेंकायह्मणून॥ चिंतेंतवर्षेलोटली॥२१॥ प्रतिकूळहरीहोत॥ घरींजें
होतेंधनसंचित॥ राजदंडेंतेंगेलेंसमस्त॥ राहिलेंतेंचोरेंनेलें॥२२॥ भार्याझालीअ
तिदुःखित॥ पतीचेंकल्याणइच्छित॥ वस्त्रेंआणिपात्रेंसमस्त॥ सर्वविकोनिखात
से॥२३॥ घरींकांहींनराहिलेंजाण॥ मगकन्येसहितआपण॥ काष्ठेंवेंचूनरानांतून॥
निर्वाहकरितीझाली॥२४॥ अन्नआच्छादननसतांघरीं॥ कन्यातिचीकायकरी
॥राहतहोताब्राह्मणशेजारीं॥ त्याचेघरींजातसे॥२५॥ तोंतेथेंसत्यनारायणाचेंअर्च
न॥ करीतहोताएकब्राह्मण॥ कलावतीकरूनिनमन॥ कायतेथेंबोलली॥२६॥
पितांआणिभ्रतार॥ घरासयेतीलसत्वर॥ तूंमजपावसीसर्वेश्वर॥ तरीमीपूजनकरी
न॥२७॥ ऐशीतीप्रार्थनाकरित॥ तथास्तुह्मणतीसभास्थ॥ कथाऐकूनिप्रसादघेत
॥प्रातःकाळींघरींआली॥२८॥ आईह्मणेसुलक्षणा॥ कोठेंराहिलीसकोणेकारणा॥ स
त्यनारायणकथापूजना॥ सर्वतीसांगतसे॥२९॥ मातेमींइच्छापूजेचीकरून॥ आ
हेंजरीकांतूंह्मणशीजाण॥ जनकआणिभ्रतारमिळून॥ घरींयावयासाठीं॥३०॥ माते
चेआलेंमनास॥ भिक्षार्थगेलीनगरांत॥ नकरितांआयासबहुत॥ धनफारमिळालें॥
॥३१॥ तिणेंआणोनिसाहित्य॥ पूजाकलावतीकरित॥ लीलावतीसहित॥ भक्तिभा
वेंकरोनी॥३२॥ कलावतीचेपूजेंकरून॥ प्रसन्नझालानारायण॥ कृपावंतआनंद
घन॥ त्याचेंवर्णनकोणकरी॥३३॥ सत्यनारायणउ०॥ पूजेचेंमाहात्म्य॥ वर्णूनश
कतीनिगमागम॥ देवाधिदेवपुरुषोत्तम॥ भक्तिभावेंतोषतो॥३४॥ भुक्तिमुक्तिदेणा
र॥ त्यासिनसोसेगर्वाचाभार॥ ब्राह्मणह्मणेचमत्कार॥ श्रीहरीनेंदाखविला॥३५
॥कलावतीकरितांपूजन॥ त्यादिवशींचसत्यनारायण॥ राजाचेस्वप्नांतयेऊन॥ का
यबोलताझाला॥३६॥ साधूचाअपराधनसतां॥ बंधनकेलेंतत्वतां॥ मुक्तत्यासकरीं
आतां॥ आज्ञामाझीतुज॥३७॥ स्वपर्यंकावरती॥ राजानेंनिद्राकेलीहोती॥ विप्र-
रूपेंतयाप्रती॥ बोधकरिताझाला॥३८॥ मायाहरीचीप्रगटली॥ निद्रारायाचीगेली॥

विस्मितहोऊनितयेवेळीं॥आश्चर्यकरीमनांत॥३९॥गुरुआणिगणपती॥आदरेंक रूनिकमळापती॥स्मरवेंअवलोकूनिधृतीं॥सिंहासनींबैसला॥४०॥सर्ववृत्तांत तयेवेळां॥मंत्रियांसिसांगताझाला॥ऐकोनिप्रधानादिकतयाला॥कायबोलतेझा ले॥४१॥हेंराजेंद्रास्वप्नांत॥पाहिलेंतेंआहेसत्य॥मनांतझालाहर्षयुक्त॥मायाहरी चीप्रबळ॥४२॥कारागृहांतून॥तत्काळसाधूसआणून॥सन्निधतयाबैसवून॥ पुसतसेआनंदें॥४३॥रा०उ०॥कायतुझेंकुळगोत्र॥कोणदेशपवित्र॥येथेंयेण्यास कायनिमित्त॥हेंसर्वसांगावेंमजपासीं॥४४॥साधुरुवाच॥रम्यरत्नापुरनगर॥ आह्मीतेथीलराहणार॥क्रयविक्रयाचाव्यवहार॥यातीवाणीअसोंआह्मी॥४५ ॥मणीमोतींहिरेरत्न॥विकावींकरूनियांप्रयत्न॥राजदूतींहेंसर्वज्ञ॥तस्करह्मणू निआणिलें॥४६॥चोरनाहींआह्मींजाण॥मनांतपाहेंविचारून॥राजदूतींतुम- च्याभयानें॥धरूनिआणिलेंआह्मासी॥४७॥अपराधनसतांयथार्थ॥केलाआ- ह्मांवरअनर्थ॥आतांआह्मींकोणातापरमार्थ॥करावाहेंस्फुरेना॥४८॥उक्तदिसेतेंक रींआतांवहिला॥हेंबोलोनिउगाराहिला॥ऐकूनियांनिश्चयकेला॥त्याचवेळेंराजा नें॥४९॥तत्काळबंधापासून॥उभयतांतेंमुक्तकरून॥नापितातेंआणवून॥श्मश्रू दोघांचाकरविला॥५०॥गोघृतांततिळमिळवून॥अंगींउटणेंलावून॥उष्णोदकें- स्नानेंघालून॥वस्त्रेंदिधलींतयांसीं॥५१॥पक्वान्नेंसहितभोजन॥नानाप्रका रेंकरवून॥उभयतांसिसत्कारेंकरून॥तांबूलदीधलें॥५२॥केलाबहुतआदर॥दुः खभोगीतहोतेफार॥त्याव्यथेचापरिहार॥केलाराजानेंतत्वतां॥५३॥ऐसासन्मा नपावून॥साधूबोलेराजालागून॥राजेंद्राकृपाकरून॥मजआज्ञाद्यावीजी॥५४॥ स्वामीतुमचेकारागृहीं॥दुःखभोगिलेंबहुतपाहीं॥आतांआह्मांसलवलाहीं॥नगरा प्रतीपाठवा॥५५॥आज्ञाद्यावीमहाराज॥जामातासहमज॥ऐसेंबोलोनिसह ज॥उगाचितोराहिला॥५६॥ऐशीसाधूचीवाणी॥ऐकोनियांतेचक्षणीं॥कोशा धिकारीबोलावूनी॥आज्ञाकरिताझाला॥५७॥द्रव्यआहेत्याचेंसंचित॥तेंनौकेंत भरूनित्वरित॥साधूयासआज्ञादेत॥जावेंआपुल्यागृहासी॥५८॥राजाज्ञाघेऊ न॥साधूचालिलातेथून॥नौकेवरीबैसून॥नदीमार्गेंचालिला॥५९॥जामातसा धूतेवेळां॥गीतवाद्यकरिताझाला॥मंगळकरूनचालिला॥पूजनासविसरलापैं

॥६०॥सत्यनारायणदेव॥कलियुगींचाअनुभव॥पूजनकरीलमनोभावें॥त्यावरी कृपाकरीतसे॥६१॥सर्वकामनादेऊन॥करीत्याचेमनोरथपूर्ण॥ऐसादेवकृपाघन॥ त्यासकांरेभजाना॥६२॥ इतिचतु०॥४॥ ॥सूतउवाच॥ शौनकादिकऋषिगण॥ ऐकाहरीचेंमहिमान॥तापत्रयांतपडेलजन॥त्यासकृपेनेंउद्धरितो॥१॥तोतापस रूपधरून॥करीसाधूचेंविटंबन॥तीकथागहन॥ऐकावीजीवेंभावें॥२॥ता०उ०॥ नौकेंतकायभरलेंधन॥हेंसांगावेंमजलागुन॥साधुबोलेलतापत्रेंपूर्ण॥नौकेंतभ रियेलीं॥३॥आह्मीतरणीवरबसूनी॥जातोंनदीमार्गेकरूनी॥विरोधीप्रयोज नीं॥कायकारणेंकरितां॥४॥तापसऐकतांवचन॥ह्मणेलतापत्रेंकरूनपूर्ण ॥मनींइच्छातेचिजाण॥तथास्तुहोयऐसेंची॥५॥त्यावेळेसर्वधन॥गुप्तझालें नौकेंतून॥साधूऐसेंपाहतांजाण॥बोलताझालाजामातासी॥६॥नौकेंतीलसर्वध न॥जाऊनलतापत्रेंजाण॥दिसतीमजलागुन॥द्रव्ययांतीलगेलेंकोठें॥७॥ऐसेंऐ कूनतत्काळ॥मूर्छितपडलातेवेळ॥विलापकरूनिप्रबळ॥दुःखेंशोककरीपैं॥८॥ तोंजामातबोलेवचन॥तापसाचाकेलाअपमान॥आतांत्यासीजावेंशरण॥स्मरण नाहींतुह्मास॥९॥गळ्यांतवस्त्रघालून॥गेलातापसाशरण॥महाराजतुह्मीको ण॥नकळेमजस्वामिया॥१०॥यक्षकिन्नरगंधर्व॥कींदेवांचाहीदेव॥मीनजाणतां प्रभाव॥सहजवृत्तींबोलिलों॥११॥माझेविडंबनाचेंकारण॥सर्वसांगावेंमजलागु न॥तत्काळकृपावंतहोऊन॥तापसबोलताझाला॥१२॥ ता०उ०॥आपुलेंमनआ पणास॥शत्रुमित्रयादोघांस॥मोठेपणाचाइतिहास॥सोडीआतांतूंसाधू॥१३॥ आपलेमूढपणाचेयोगें॥विसरलासीजेंकेलेंमागें॥चंद्रचूडसमुदायसंगें॥नाराय णपूजितहोता॥१४॥अनपत्यमीकृपाकरून॥पुत्रअथवाकन्यारत्न॥मजलादे शीनारायण॥तरीपूजीनयथाविधी॥१५॥तूंधनाचेगर्वेंभरित॥पूजाविसरला ससत्य॥सर्वव्यापीतोभगवंत॥तुजप्रचीतदावीतसे॥१६॥पूर्वीऐसावरपावूनी ॥कन्याझालीतुजलागुनी॥मूर्खाआतांतरींउमजमनीं॥बोलोनरूपदाखविलें ॥१७॥साधुकरीसाष्टांगनमन॥गळ्यांतवस्त्रघालून॥ह्मणेमीअपराधीगहह न॥गद्गदवाणीबोलतसे॥१८॥जयजयाजीसत्यनारायणा॥जयजयाजीअ परंपरगहना॥जयजयाजीसर्वातीतनिर्गुणा॥विश्वव्यापकतूंचि॥१९॥तूंसत्य

रूपनिरंजन ॥ तूंरूपेंचासागरपूर्ण ॥ तुझेआधारेंप्राणिमात्रजाण ॥ चारीयुगींव र्तती ॥ २० ॥ तूंदेवाधिदेवजगन्निवास ॥ तूंचिरवराजगदीश ॥ द्रव्यमदेंआह्मांस ॥ स्म रणनाहींतुझेंकीं ॥ २१ ॥ माझेबुद्धीचेंक्षमापन ॥ करींआतांकृपानिधान ॥ वारंवारस्म रण ॥ करीनहेंजाणपां ॥ २२ ॥ ऐशीस्तुतीकरूनिमुद्रालक्ष ॥ स्थापिलेतेथेंप्रत्यक्ष ॥ मजलाआहेतुझेचरणसाक्ष ॥ पोंचतांचिघरींपूजीन ॥ २३ ॥ प्रसन्नहोऊनिनारा यण ॥ ह्मणालेतुझीइच्छापूर्ण ॥ पुत्रपौत्रांसमवेतजाण ॥ नानाभोगभोगिशी ॥ २४ ॥ भोगूनसर्वसंपदा ॥ अंतींमाझेसन्निधपदा ॥ नहोतांतुजलाआपदा ॥ स्वरवेंराहें यालोकीं ॥ २५ ॥ ऐसेंदेऊनवरदान ॥ अंतर्धानपावलानारायण ॥ साधुआपलेनौ केंतबसून ॥ चालताझालास्वगृहा ॥ २६ ॥ आपलेनगराजवळ ॥ येताझालातत्का ळ ॥ दूतपाठविलातेवेळ ॥ लीलावतीससांगावया ॥ २७ ॥ साधुजामातासहित ॥ कृ तकृत्यहोऊनियांयेत ॥ पतिव्रताकन्येसहित ॥ पूजाकरीसत्यनारायणाची ॥ २८ ॥ पूजासमाप्तझाल्यावर ॥ साध्वीनिघतीझालीसत्वर ॥ संगातीसरवीजनांचेगंजर ॥ नावेजवळीपातली ॥ २९ ॥ कलावतीप्रसादनघेतां ॥ निघोनिआलीतत्वता ॥ पतिं मुखपाहण्याचीउत्सुकता ॥ तेथेंहेंवर्तलें ॥ ३० ॥ अवज्ञाप्रसादाचीझाली ॥ त्याकार णेंनौकाबुडाली ॥ साधुह्मणेतयेवेळीं ॥ माझेंविटंबनकोणीकेलें ॥ ३१ ॥ कारागृहीं बहुतप्रकार ॥ दुःखभोगिलेंदिवसफार ॥ प्रारब्धाचीकरणीअपार ॥ कायकरूंमी- आतां ॥ ३२ ॥ पुत्रावीणमाझासंसार ॥ वृथाझालादुस्तर ॥ आतांमाझेजीवासीधि- क्कार ॥ नानाप्रकारेंविलापकरी ॥ ३३ ॥ पतीमरणऐकून ॥ कलावतीशोककरीदारुण ॥ इ तक्यांतलीलावतीपूजासारून ॥ मंगलेंकरीतआली ॥ ३४ ॥ जामाताचेंझालेंनिधन ॥ हेंऐ कतांचशोकपूर्ण ॥ कलावतीसपुढेंघेऊन ॥ रुदनकरीअपार ॥ ३५ ॥ स्वामीकृतार्थअस तां ॥ कायझालीहीअवस्था ॥ धिक्कारतुझियाप्रभुत्वा ॥ असेंबोलूनराहतसे ॥ ३६ ॥ कन्येचेमुखाकडेपाहे ॥ तोंतिचामृगांकउतरलाआहे ॥ मातेच्यामुखाकडेतीपाहे ॥ प डलीधरणींमूर्च्छित ॥ ३७ ॥ कर्दळीस्तंभाचेपरी ॥ पडतांचझालीघाबरी ॥ सावधहोऊ निसत्वरी ॥ पित्याचेंमुखपाहतसे ॥ ३८ ॥ रूपेंअत्यंतसुंदर ॥ नेत्रांतूनिवाहेनीर ॥ मो तींसाररखेंहृदयावर ॥ शोभायमानहोतसे ॥ ३९ ॥ हाप्रियनाथसमर्थ ॥ मजवरी कांकेलाअनर्थ ॥ आतांजिणेंमाझेंव्यर्थ ॥ झालेंअसेतुजविणें ॥ ४० ॥ पतीचें-

स्त्रीअर्धांग॥ हेंवेदांतआहेचांग॥ अर्धांगजातांइंअंग॥ कैसेंराहील समर्थी॥ ४१॥ कलावतीआणिलीलावती॥ साधुसहितआणियुवती॥ शोकसमुद्रांतबुडती ॥ मगकाय वर्तलेंऐका ॥ ४२॥ आकाशवाणीतेवेळेझाली॥ तीकळावतीनेंऐकिली॥ प्रसादनघेतां आली॥ ह्मणोनिक्षोभहा॥ ४३॥ आतांप्रसादघेईतूंआदरें॥ पतीपावशीलसादरें॥ हें ऐकतांपरमादरें॥ प्रसादसेवितीजाहली॥ ४४॥ त्यावेळेससत्यनारायणें॥ करुणाकरपरायणें॥ कृपातत्क्षणींकेलीत्याणें॥ ऐसेंमहिमानकृपेचें॥ ४५॥ नौकापाण्यांतबुडाली॥ तीजामातासहितनिघाली॥ साधुधांवूनतयेवेळीं॥ जामातासीभेटला॥ ४६॥ जामातमृत्युगृहींगेला॥ तोमाघाराफिरोनिआला॥ हेंपाहतांचिजनाला॥ विस्मय फारझाला॥ ४७॥ ह्मणतीसत्यनारायण॥ कोणजाणेविंदान॥ पावतोभक्तांलागुन ॥ कलियुगींतत्काळ॥ ४८॥ साधुजामातासहित॥ स्त्रीकन्येचाधरूनहात॥ घरींआलेसमस्त॥ याचकांतेंगौरविलें॥ ४९॥ लक्षमुद्रांचेंस्थापन॥ केलेंहोतेंतेंआणून॥ पूजासंभारतयारकरून॥ चांदवेतेथेंलाविले॥ ५०॥ पताकाकांचनीकरून ॥ सोयरेआप्तजन॥ ब्राह्मणवेदघोषकरून॥ पूजाकरवितेझाले॥ ५१॥ सुवर्णपुष्पआणिफळें॥ देवासिअर्पिलींसकळें॥ भक्ष्यभोज्यादिनिर्मळें॥ नानाप्रकारींकरीतसे॥ ५२॥ षोडशोपचारींभगवंत॥ पूजिताझालाजामातासहित॥ मगप्रार्थनाकेलीबहुत॥ वासुदेवतोषविला॥ ५३॥ सा०उ०॥ प्रणमामिमहासिद्ध॥ तूंसत्यनारायणप्रसिद्ध॥ मीमूढममापराध॥ क्षमाकेलेपाहिजे॥ ५४॥ स्थावरजंगमप्रती॥ नागगंधर्वांचीरीती॥ तुझेहातींजगत्पती॥ कळासूत्रसर्वांचें॥ ५५॥ तुझेकृपेनेंचालती॥ तुझेकृपेनेंबोलती॥ तुझेकृपें त्रिजगतीं॥ वर्ततीतुझियासंधानें॥ ५६॥ आतांकरूनमजकृपा॥ करुणाकराजगद्रूपा॥ माझीपूजाअंगिकारानिजरूपा॥ माजीठावदेई॥ ५७॥ ऐशीप्रार्थनाकरूनिवणिक॥ तत्काळकरितीप्रणिपात॥ ब्राह्मणभोजनकरवूनसमस्त॥ तोषविलें भूदेवां॥ ५८॥ पुत्रबंधुआप्तजन॥ सर्वांदीधलेंसेभोजन॥ यालोकींसुखभोगून॥ अंतींविष्णुपदपावला॥ ५९॥ याविधानेंकरून॥ करीलसत्यनारायणाचेंपूजन॥ त्याचेसर्वमनोरथजाण॥ तोदेवपुरवील॥ ६०॥ जीजीकामनामनांतून॥ करील तीसिद्धीपावेजाण॥ कलियुगींहेंपूजन॥ स्वतःप्रकटूनचालविलें॥ ६१॥ इतिश्रीइतिहाससमुच्चयेश्रीसत्यनारायणकथाकथनंनामपंचमोऽध्यायः॥ ५॥ समाप्त॥




# श्रीरामजन्मकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः॥ तुह्मीश्रोतेभाविक॥ कविमुद्रारत्नपरीक्षक॥ श्रोतादेखोनिमृगांक॥ वक्तासोमकांतपाझरे॥१॥ तुझीबोधसमुद्रींचींमुक्तेंपवित्रें॥ कींचैतन्यनभींचींदिव्यनक्षत्रें॥ कींवैराग्यवनींचींसुमनेंविचित्रें॥ संतरूपेंविकासलीं॥२॥ कींनिश्चलरामकथामृतपात्रें॥ ज्ञानभरितपिकलींक्षेत्रें॥ कींभजनपथींचींसरोवरें॥ संतरूपींभरलींहो॥३॥ सूर्यवंशभूषणअद्भुत॥ अयोध्येप्रतीराजादशरथ॥ त्याचीपट्टराणीविख्यात॥ बहुकुशळकौसल्या॥४॥ सुमित्राकेकेयीस्वरूपवंत॥ दोघींसवरीरावदशरथ॥ आणिकसातशेंपरणीत॥ भोगांगनासुंदरा॥५॥ ज्ञानकळाकौसल्यासती॥ सुमित्राकेवळसद्भक्ती॥ कैकेयीतेप्रकटप्रकृती॥ रजतमयुक्तसर्वदा॥६॥ केवळविवेकमूर्तिमंत॥ तोचिअजपाळसुतदशरथ॥ जोपरमयोद्धारणपंडित॥ धनुर्विद्यासर्वजाणे॥७॥ अंधारामाजीशब्दउमटतां॥ तेथेंचिबाणमारीअवचिता॥ धन्यतयाचीहस्तकुशलता॥ वीरदशरथाऐसानसे॥८॥ परीपोटींनसेपुत्रसंतान॥ तेणेंराजेंद्रदिसेउद्विग्न॥ पुत्रावीणशून्यसदन॥ बोलतीशास्त्रज्ञपंडित॥९॥ शरीरजैसेंप्राणावीण॥ तारुण्यावीणपंचबाण॥ दयेवीणव्यर्थज्ञान॥ शांतीवांचूनिवैराग्य॥१०॥ असोराजादशरथ॥ संततीलागींचिंताक्रांत॥

सदाविपिनेंगहनहिंडत ॥ मृगयाअभिषेंकरूनी ॥११॥ नावडे छत्रसिंहासन ॥ नावडे चातुर्यकलागायन ॥ बहुतकेलेंप्रयत्न ॥ परीसंताननहोयची ॥१२॥ तोंदशरथेंस्वभूदेखिलें ॥ दोघेपुरुषआपणवधिले ॥ आणियेकेंस्त्रियेसीमारिलें ॥ अपराधेंवीणसर्वथा ॥१३॥ गजबजोनिउठिलात्वरित ॥ कोणासीनबोलेमूकवत ॥ वसिष्ठगृहासजाउनित्वरित ॥ नमोनिस्वप्नसांगतसे ॥१४॥ गुरुबोलेहेंदुःस्वप्न ॥ तीनश्वापदेंयेसीवधीन ॥ मगयाचीशांतीकरून ॥ दोषदूरकरावा ॥१५॥ गुरुआज्ञेनेंतेदिवशीं ॥ राजेंद्रनिघाला मृगयेसी ॥ वासरमणीगेलाअस्तासी ॥ परीश्वापदनसांपडे ॥ १६॥ पडिलाअत्यंतअंधकार ॥ एकलाहिंडेनृपवर ॥ धनुष्यासीलावूनिशर ॥ शोधीकांताररतेधवां ॥१७॥ तोंएकसरोवराचेतिरीं ॥ राजागुप्तबैसेवृक्षावरी ॥ कानाडीओढूनितेअवसरीं ॥ कर्णीएकेसांचोल ॥१८ तोंतेमार्गीश्रावण ॥ आलामायबापघेऊन ॥ दिवसाबहुतविघ्नआणिउष्ण ॥ ह्मणोनरात्रींगमनकरी ॥१९॥ दोघेंवृद्धेंखांदावरीघेऊनी ॥ श्रावणतीर्थेंहिंडेमेदिनीं ॥ तोंत्यासरोवराचेतीरींयेऊनी ॥ उभाराहिलानावेक ॥२०॥ तोंतींवृद्धेंह्मणतीश्रावणा ॥ आह्मांकरवींउदकपाना ॥ ऐकतांऐसीयावचना ॥ कावडखालींठेविली ॥ २१॥ हातींकमंडलूघेऊन ॥ जीवनींप्रवेशलाश्रावण ॥ दशरथेंसांचोलऐकोन ॥ निर्वाणबाणसोडिला ॥२२॥ सेपक्षबाणहृदयींभेदला ॥ हातींचाकमंडलूखालींपडला ॥ देहभूमीवरीटाकिला ॥ प्राणचालिलाश्रावणाचा ॥२३॥ ह्मणेकोणेसभाग्याचाबाण ॥ करीतआलानामस्मरण ॥ हृदयनिवालेंसंपूर्ण ॥ केलेंपावनमजलागीं ॥२४॥ ऐकोनिमनुष्याचेंवचन ॥ नृपवरजवळीआलाधांवून ॥ तंवतोपडिलाअसेश्रावण ॥ रामस्तवनकरीतची ॥२५॥ मगह्मणेकर्मीपापकरी ॥ पडलीहत्यामजवरी ॥ श्रावणह्मणेरायानकरीं ॥ खेदकांहींसर्वथा ॥२६॥ माझींमायबापेंवृद्धदीन ॥ तयांसीकरवींउदकपान ॥ मगमीसोडीनप्राण ॥ सत्यजाणराजेंद्रा ॥२७॥ दोघेंवृद्धेंअत्यंतपाहीं ॥ त्यांचेसेवेसीकोणीनाहीं ॥ दशरथगहिंवरलाहृदयीं ॥ शोकावर्तीपडियेला ॥२८॥ श्रावणह्मणेदशरथा ॥ उदकदोघांपाजूनितत्वतां ॥ मगहेसांगावीवार्ता ॥ नाहींतरीप्राणत्यागिती ॥२९॥ उदकनेतांअयोध्याराणा ॥ वृद्धेंह्मणतीबारेश्रावणा ॥ तंवतोनबोलेचिवचना ॥ कांहींकेल्यासर्वथा ॥३०॥ कांरेश्रावणानबोलसी ॥ उदकमागितलेंएवढेंनिशीं ॥ बारेह्मणोनिकोपलासी ॥ शिणलासीपाडसा ॥३१॥ उदयाचळींमावळेमित्र ॥ शेषसांडीलभूमिभार ॥

तीव्रतपेरोहिणीवर॥ तरीक्रोधअणुंमात्रनयेतूतें॥३२॥ जैसेंगंगेचेंनिर्मळजीवन॥ तै सेंश्रावणातुझेंमन॥ तान्हयाकांरेनबोलसीवचन॥ राजाऐसेंऐकोनगहिंवरे॥३३॥ म गअजपुत्रबोलिला॥ म्यांअवचितश्रावणावधिला॥ तंवत्यांणींधरणीवरीदेहटाकिला ॥प्राणझालेकासाविस॥३४॥आठवूनिश्रावणाचेगुण॥ दोघेंआक्रंदतीदीनवदन॥ऐ सापुत्रहेंत्रिभुवन॥ शोधितांनसांपडे॥३५॥ अहारेपुत्राश्रावणा॥ गंभीरगुणनिधा ना॥आमुचेप्राणकरितीप्रयाणा॥श्रावणावदनदावींकां॥३६॥ याब्रह्मांडमंडपांत॥ श्रावणाऐसानाहींसुत॥ जैसीलक्ष्मीवैकुंठनाथ॥ तैसींभावितमातापिता॥३७॥जोन करीमातृपितृभजन॥जळोत्याचेंब्रह्मज्ञान॥ तोषट्शास्त्रेंआलाजरीपढोन ॥त्याचें दर्शननव्हावें॥३८॥त्याचेंजपतपअनुष्ठान॥ दानअध्ययनश्रवणमनन॥ कळाचा तुर्यव्यर्थज्ञान॥जैसेंभाषणमद्यपीयाचें॥३९॥ तेणेंअभ्यासिल्याचौसष्टीकळा॥ त्याअवघ्याझाल्याविकळा॥ जयासीमातापित्यांचाकंटाळा॥ त्याचांडाळानशिवा वें॥४०॥मातापितागुरुदेवजाण॥चारीदैवतेंसमसमान॥तोचिपरमज्ञाताजाण॥ नमोडीवचनश्रेष्ठांचें॥४१॥ह्मणूनपुत्रएकश्रावण॥ आठवोनितयाचेगुण॥दोघेंपड लींमूर्च्छायेऊन॥जावयाप्राणएकवटले॥४२॥मगतींउभयतांशापदेतीनृपनाथा ॥ह्मणतीतूंहिपुत्रपुत्रकरितां॥ प्राणजाऊंदेतुझादशरथा॥आमुच्याऐसातत्का ळ॥४३॥ मगत्यांणींसोडिलाप्राण॥रायेंकेलेंनयांचेंदहन॥उत्तरकार्यसंपादू न॥ अयोध्येसीपातला॥४४॥ मनांतहर्षमानीनृपवर॥ मजशापझालातोकेव ळवर॥ यांचेशापेंतरीपुत्र॥होकांसत्वरमजलागीं॥४५॥ अयोध्येसीयेऊनद शरथ॥ वसिष्ठासिसांगेवृत्तांत॥ पुढेंद्वादशवर्षेपर्यंत॥दुष्काळपडलापृथ्वीव री॥४६॥ कदापीनवर्षेबलाहक॥ अत्यंततपेअर्क॥ धान्यतृणजीवनसकळि- क॥नाहींनिःशंकपृथ्वीवरी॥४७॥ गाईब्राह्मणपीडिलेबहुत॥ दैत्यगुरुकाप- ट्यवंत॥तेणेंजलदआकर्षिलासमस्त॥ वृष्टीएकाक्षहोऊंनेदी॥४८॥वृष्टीझालि यावरीपूर्ण॥ सुखीहोतीलगोब्राह्मण॥तेकरितीलमहायज्ञ॥ तेणेंबळपूर्णसुरवरां ॥४९॥वृषपर्वादैत्यथोर॥ परमयोद्धामहाशूर॥त्याससाह्यकारीझालाशुक्र॥ यु द्धकरीदेवांसी॥५०॥ बहुतदिवसझालासंग्राम॥ परीशुक्रकपटियापरिपूर्णपरम॥ मेघवर्षोंनेदीअधम॥ चिंताक्रांतशंक्रझाला॥५१॥वज्रधरासह्मणेब्रह्मसुत॥अ-

योध्येचाराजा दशरथ ॥ तोप्रतापार्करणपंडित ॥ जिंकील दैत्यक्षणमात्रें ॥ ५२ ॥ मग मातलीआणिविजयरथा ॥ मूळपाठविलें दशरथा ॥ मातली सांगे मूळवार्ता ॥ अना वृष्टीकारणेंजे ॥ ५३ ॥ ऐकोनिदैत्यप्रतापअद्भुत ॥ कैकेयीसहितदशरथ ॥ निराळमार्गेरथनेत ॥ देवदैत्यांचेरणमंडळीं ॥ ५४ ॥ अजपुत्रदेखोनपाकशासन ॥ देताझाला क्षेमालिंगन ॥ दशरथेंधनुष्यचढवून ॥ उभाठाकलायुद्धासी ॥ ५५ ॥ मारिलेदैत्य भारतेव्हां ॥ तोंपुढेंआलावृषपर्वा ॥ कपटकळायुद्धमावा ॥ नानाप्रकारेंदावित ॥ ५६ ॥ परीदशरथवीरसमर्थ ॥ कापट्यविद्यानचलेतेथ ॥ जैसेंमूर्खवाचेंवागूजाळसमस्त ॥ उच्छेदीपंडितएकशब्दें ॥ ५७ ॥ देखोनिदशरथाचाप्रतापतेव्हां ॥ विरथझाला वृषपर्वा ॥ पाठीदेऊनितेधवां ॥ निघताझाला सवेगें ॥ ५८ ॥ घृतेंशिंपिलावैश्वानर ॥ तैसाक्रोधायमानझालाशुक्र ॥ रथींबैसोनियांशर ॥ सोडिताझालाप्रतापें ॥ ५९ ॥ अस्त्रयुद्धकेलेंदारुण ॥ परीनाटोपेअजनंदन ॥ शक्रेंकाढोनिनिर्वाण-बाण ॥ छेदिलातयाचारथांक ॥ ६० ॥ अंकछेदितांअकस्मात ॥ खालींपडावाजों दशरथ ॥ कैकेयीदेखोनिधांवत ॥ घालोनिहातअंकधरी ॥ ६१ ॥ पर्वताकाररथ थोर ॥ दंडावरीभारघेतलासमग्र ॥ वीरश्रीरंगेंनृपवर ॥ समाचारनेणेतो ॥ ६२ ॥ दशरथेंसोडिलानिर्वाणबाण ॥ तोडिलाकवीचास्यंदन ॥ अश्वासहितकुटकेकरून ॥ रणमंडळींपाडिला ॥ ६३ ॥ विरथजेव्हांझालाशुक्र ॥ दशरथेंकाढिलासूर्यमुखशर ॥ ह्मणेयाचेंछेदीनशिर ॥ कापट्यमुकुटासहितपैं ॥ ६४ ॥ मागुतीविचारीअजनंदन शुक्रतोहोयब्राह्मण ॥ याचारक्षोनियांप्राण ॥ मुकुटमात्रछेदावा ॥ ६५ ॥ निमिष नलगतांगेलाबाण ॥ मुकुटपाडिलातळींछेदून ॥ भयभीतभृगुनंदन ॥ पळताझालातेधवां ॥ ६६ ॥ देवकरितीजयजयकार ॥ पळोंलागलेदैत्यभार ॥ जैसामहावातस्फुटतांसमग्र ॥ भूसउडेअंबरीं ॥ ६७ ॥ रायेंकोदंडासीघातलीगवसणी ॥ तूणीरठेविलाआवरणघालुनी ॥ जैसाकुंडामाजीदेदीप्यअग्नी ॥ आच्छादितयाज्ञिक ॥ ६८ ॥ दशरथपाहेसावधान ॥ तोंकैकेयीनेंहातघालून ॥ धरिलासेतेथेंस्यंदन ॥ वर्तमान कळलेंतें ॥ ६९ ॥ खालींउतरूनदशरथ ॥ प्रियेलागींआलिंगनदेत ॥ ह्मणेदोनवरमागेंत्वरित ॥ जेकांअपेक्षाअसेल ॥ ७० ॥ कैकेयीआनंदलीथोर ॥ म्हणेमींमागेनजेव्हां वर ॥ तेव्हांमजद्यावेसाचार ॥ ह्मणोनभाषघेतली ॥ ७१ ॥ पूजासामग्रीदीधली

ऋषींप्रत ॥ नेणें कैकेयीवरलाधन ॥ त्यावरदें ध्यासमर्थी अद्भुत ॥ जयप्रासकैकेयीतें ॥७२॥ असोइंद्रआणिबृहस्पती ॥ दशरथाचेंयशवानिती ॥ वस्त्रेंभूषणेंअमरपती ॥ देताझालारायातें ॥७३॥ वस्त्राभरणेंअद्भुतें ॥ दिव्यमणीदिधलाकैकेयीतें ॥ येरीनें घातलावेणीतें ॥ परमप्रकाशवंतजो ॥७४॥ तोंदेवआचार्यबोलेवचन ॥ रायासी- कायआहेपुत्रसंतान ॥ दशरथह्मणेपुत्रवदन ॥ देखिलेंनाहींअद्यापी ॥७५॥ सुरगुरुह्मणेरायावरिष्ठा ॥ त्रिभुवनपतीयेईलतुझ्यापोटा ॥ ज्याचेंध्यानलागलेंनीळकंठा ॥ सनकादिकांभक्तांसी ॥७६॥ जोमायाचक्रचाळक ॥ अनंतब्रह्मांडांचानायक ॥ जोकमलोद्भवाचाजनक ॥ तोपुत्रतुझादेखराया ॥७७॥ वेदशास्त्रांचेंजिव्हार ॥ जोआदिमायेचानिजवर ॥ तोपुराणपुरुषअगोचर ॥ तुझापुत्रहोईलपैं ॥७८॥ विभांडकाचापुत्रशृंगऋषी ॥ हरिणीगर्भसंभूततेजोराशी ॥ त्यासिआणावेंनानासायासीं ॥ पुत्रेष्टीकरावया ॥७९॥ त्यासीनाहींमनुष्यदर्शन ॥ देखिलेंनाहींस्त्रियांचेंवदन ॥ त्यासशब्दविषयेंमोहून ॥ करूनगायनआणावें ॥८०॥ दशरथइंद्रगुरूची आज्ञा ॥ घेऊनिआलाअयोध्याभुवना ॥ आनंदझालासकळजनां ॥ पर्जन्यवृष्टी जाहली ॥८१॥ शृंगीसिआणावयासत्वर ॥ देवांगनापाठविल्यासुंदर ॥ त्यांणींनृत्यगायनकरूनिमनोहर ॥ नयासिभुलवूनिआणिलें ॥८२॥ दशरथेंकरूनिनमस्कार ॥ केलाबहुतआदर ॥ ह्मणेमहाराजतूंबहुथोर ॥ दर्शनआह्मांदीधलें ॥८३॥ मग पाळककन्याआपुली ॥ शृंगऋषीसदीधली ॥ लग्नसोहळातेवेळीं ॥ चारदिवसजाहला ॥८४॥ मगऋषीमेळविलेबहुत ॥ जेशापानुग्रहसमर्थ ॥ वसिष्ठमुख्यआचार्यजेथ ॥ नपडेपदार्थन्यूनकांहीं ॥८५॥ इकडेज्ञानीपाहेविभांडकमुनी ॥ तोंस्त्रियांनींनेलाचाळवूनी ॥ परमक्रोधाविष्टहोऊनी ॥ अयोध्येसीपातला ॥८६॥ तोंऋषीनें देखिलापुत्र ॥ जैसानक्षत्रींवेष्टिलारोहिणीवर ॥ कींकिरणींवेष्टिलादिवाकर ॥ तैसास्नुतदेखिला ॥८७॥ स्नुषादेखोनिनयनीं ॥ विभांडकनिवालामनीं ॥ दशरथलागलाऋषीच्याचरणीं ॥ आनंदेंकरूनतेधवां ॥८८॥ विभांडकआनंदेंबहुत ॥ नृपासिआशीर्वाददेत ॥ तुजहोतीलचौघेसुत ॥ जेकांसमर्थत्रिभुवनीं ॥८९॥ असोयज्ञमंडपींशृंगीआपण ॥ सकळऋषीमंडळीघेऊन ॥ स्वाहाकारासीअवदान ॥ मंत्रयुक्तटाकित ॥९०॥ पूर्णाहुतीचियेकाळीं ॥ प्रत्यक्षप्रगटलाज्वाळमाळी ॥ प्रभातीं

उगवेउदयाचळीं॥रवीजैसाअकस्मात॥९१॥चत्वारिश्रृंगहिमूर्ध्नी॥कृशाननिघा
लात्रिचरण॥देखतांयज्ञनारायण॥ऋषिजनस्फुरवावले॥९२॥हातींपायस्व
ताटभरून॥श्रृंगीपासींदेतकृशान॥ह्मणेअविलंबेंपिंडकरून॥तिघीराणींसदेई
जे॥९३॥बहुत्वराकराहोयेक्षणीं॥विलंबहोतांहोयकार्यहानी॥पोटायेईलकैव-
ल्यदानी॥क्षीरसागरविहारीजो॥९४॥ऐसेंबोलोनितयेवेळीं॥गुप्तझालाज्वा
ळामाळी॥श्रृंगीनेंवसिष्ठाजवळी॥पायसपात्रदीधलें॥९५॥वसिष्ठकरूनिवि-
भाग॥राणियांसदेतसवेग॥कौसल्येसीश्रेष्ठभाग॥देतांक्रोधआलाकनिष्ठेतें॥
॥९६॥ह्मणेमीरायासीप्रियकर॥म्यांरथचक्रींघालोनिकर॥रणींविजयीकेला
नृपवर॥इंद्रादिदेवांदेखतां॥९७॥वयेंकरूनवृद्धफार॥तोज्येष्ठनव्हेसाचार॥ज
यामाजीगुणथोर॥तोचिश्रेष्ठजाणिजे॥९८॥केतकीचेंलघुपत्र॥त्यासीमानितीसर्वत्र
॥इतरपत्रेंदिसतीथोर॥परीचतुरनमानिती॥९९॥अमोलिकलहानरत्न॥कायक
रावेथोरपाषाण॥मृगेंद्राचीआकृतीलहान॥थोरवारणकायसा॥१००॥जवादी
बिडालदूषणस्फुवास॥परीआवडेश्रीमंतास॥रासभाचेथोरबहुवस॥नशिवेकों-
णीतयांतें॥१॥मजआदींनदेतांमान॥कायकरावाभागमागून॥म्हणोनकैकेयी
रुसोन॥अधोवदनबैसली॥२॥मगबोलेवसिष्ठमुनी॥विघ्नहोईलयेचक्षणीं॥तों
करींचापिंडझडपोनी॥घारीनेंनेलाअकस्मात॥३॥हाहाकारझालातेअवसरीं॥पिं
डनेतपैंघारी॥कैकेयीपडेधरणीवरी॥आक्रंदतनेधवां॥४॥माझेंपूर्वकर्मगहन॥म
जकेंचेंपुत्रसंतान॥अभाग्यासीनिधान॥जिरेलकैसेंसांगपां॥५॥परमचिंताक्रां
तदशरथ॥कौसल्येकडेविलोकित॥कैकेयीचेंसमाधानकरित॥पट्टमहिषीतेध
वां॥६॥अर्धविभागस्वभागांतुनी॥देतकौसल्यासुमित्रादोनी॥एकत्रकरितांते
क्षणीं॥पूर्णपिंडकैकेयीतें॥७॥जैशाभागीरथीआणिमंदाकिनी॥तैशासुमित्रा
कौसल्यादोन्ही॥मत्सरअणुमात्रनाहींमनीं॥संतोषरूपसर्वदा॥८॥अत्यंतजेकु
टिलदेख॥तयांसीस्वर्गींहीनहोयसुख॥कदानमानितीलोक॥अपेशमाथांस
र्वदां॥९॥जवळीयेऊनदशरथ॥कैकेयीलागींआलिंगित॥ह्मणेदोनभागझाले
प्राप्त॥जेअपेक्षिततुजलागीं॥१०॥असोवसिष्ठेंदीधलेंतीर्थ॥त्यासवेंपिंडप्राशन
करित॥कैकेयीच्यागळांअडकत॥कासावीसझालीते॥११॥मगवसिष्ठेंशिंपितां

तीर्थ ॥ अंतरींपिंडप्रवेशत ॥ आनंदलाराजादशरथ ॥ दानेंदेतअपार ॥ १२ ॥ वस्त्राभरणेंउदंडदक्षिणा ॥ देवोनिगौरविलेंब्राह्मणा ॥ सकळऋषीपावलेस्वस्थाना ॥ शृंगीआदिकरूनियां ॥ १३ ॥ तिघीराण्याझाल्यागर्भयुक्त ॥ आनंदलारावदशरथ ॥ ह्मणेमाझेंभाग्यउदित ॥ दिसतसेयेथोनियां ॥ १४ ॥ जैसाशुद्धबीजेचामृगांक ॥ कींपक्षेंपक्षेंवाढेअर्क ॥ प्रकाशपडेअधिकाधिक ॥ उदयाद्रीहूनिपश्चिमे ॥ १५ ॥ कींकरितांसंतसमागम ॥ दिवसेंदिवसवाढेप्रेम ॥ कींऔदार्यकरूनिपरम ॥ कीर्तीवाढेसत्वर ॥ १६ ॥ तैसेराणियांचेगर्भवाढती ॥ तोंवसिष्ठबोलेदशरथाप्रती ॥ रायाधर्मशास्त्रीं ऐसीरीती ॥ डोहळेस्त्रियांसीपुसावे ॥ १७ ॥ ऐसेंबोलतांब्रह्मऋषी ॥ हर्षवाटलारायासी ॥ नमोनिवसिष्ठाच्याचरणांसी ॥ राजेंद्रतेव्हांचालिला ॥ १८ ॥ शचीचियामंदिरांत ॥ जैसावृत्रशत्रूप्रवेशत ॥ तैसाचिअजपाळसुत ॥ कैकेयीसदनींप्रवेशला ॥ १९ ॥ पिंडप्राशनाचेकाळीं ॥ कैकेयीहोतीरुसली ॥ ह्मणोनिराजेंद्रयेकाळीं ॥ तिचेसदनींप्रवेशला ॥ २० ॥ दूतीजाणवितीस्वामिणीतें ॥ डोहळेपुसावयातुह्मांतें ॥ नृपतीस्वयेंयेतसेयेथें ॥ सुमुहूर्तपाहोनियां ॥ २१ ॥ सुंदरपणाचाअभिमान ॥ त्याहीवरीकैकेयीगर्भिण ॥ जैसाअल्पविद्यावंतासगर्वपूर्ण ॥ तैसेंयेथेंजाहलें ॥ २२ ॥ जैसीगारुडीविद्याकिंचित ॥ परीब्रीदेंबांधितीबहुत ॥ कींनिर्नासिकवाहत ॥ रूपाभिमानविशेषें ॥ २३ ॥ बिंदुमात्रविषवृश्चिका ॥ परीपुच्छाग्रचरतीदेखा ॥ किंचित्ज्ञानझालियामूर्खा ॥ मगतोनगणीकोणातें ॥ २४ ॥ खडणधेनूसीदुग्धकिंचित ॥ परीलत्ताप्रहारकरीबहुत ॥ अल्पोदकउचंबळत ॥ आंगभिजतवाहकाचें ॥ २५ ॥ तैसेंकैकेयीसझालेंतयेवेळीं ॥ प्रीतीनेंदशरथआलाजवळी ॥ आपणशेजेवरीबैसली ॥ नाहींउठलीनृपादेखतां ॥ २६ ॥ कांहींचमर्यादातेथ ॥ नधरीदेखिल्यानृपनाथ ॥ मगउभाराहोनिदशरथ ॥ डोहळेपुसततियेसी ॥ २७ ॥ ह्मणेकैकेयीबोलेंवचन ॥ तुजजेंआवडेमनांतून ॥ तेंमीसमस्तपुरवीन ॥ सत्यजाणप्रियकरे ॥ २८ ॥ मगकायबोललीतयेवेळे ॥ तुह्मीपुरवालकायमाझेडोहळे ॥ माझेमनींचेजेसोहळे ॥ पूर्णकर्तादिसेना ॥ २९ ॥ मगबोलेअजनंदन ॥ तुजकारणेंवेंचीनप्राण ॥ परीडोहळेतुझेपुरवीन ॥ सत्यजाणसुकुमारे ॥ ३० ॥ मगतीह्मणेजीनृपवरा ॥ डोहळेमाझेचिअवधारा ॥ कौसल्यासुमित्रेच्यापुत्रां ॥ दिगंतरादवडावें ॥ ३१ ॥ पाठवावे

दूरकानना॥ त्यांचासमाचारपुनःकळेना॥आमचेंवर्तमानत्यांचियाकर्णा॥सहसाहीनजावें॥३३॥राज्यद्यावेंमाझियापुत्रा॥हेंचिडोहळेहोतीराजेंद्रा॥तुम्हीं मानालअधर्मरवरा॥तोदोषमजवरीघालिंजे॥३४॥मजनिंदितीलजोंजोंलोक॥ तोंतोंवाटेपरमसुख॥समस्तजनांव्हावेंदुःख॥हेंचिमजलाआवडे॥३५॥ऐसें वचनतेंअवसरीं॥ऐकतांनृपरचोंचलाअंतरीं॥कींकाळजीतघातलीसुरी॥कीं आंगावरीचपळापडे॥३६॥वचननव्हेतेंकेवळ॥दुःखवल्लीचेंश्रेष्ठफळ॥कींसं चारलेंहालाहल॥हृदयींवाटेदशरथा॥३७॥कींपर्वतकोसळला॥कींकाळसर्प जिव्हाग्रींझोंबला॥कींतसशस्त्रघायपडिला॥अंगावरीअकस्मात॥३८॥कैके यीवचनकलशोद्भवजाण॥प्राशिलेंआयुष्यसमुद्रजीवन॥शवघाबरलाजैसाचतु राननन॥वेदहरणकेलेतेव्हां॥३९॥परमखेदपावलानृपवर॥तीसनेदीप्रत्युत्तर॥म गसुमित्रेचेंमंदिर॥प्रवेशतापेंझाला॥४०॥संसारतापेंजैसेसंतप्त॥तेसंतसमा गमेंनिवत॥तैसाराजादशरथ॥सुमित्रासदनींसुखावला॥४१॥तिचेंनांवसु मित्रासती॥परीनामऐशीआहेरीती॥वरकड नांवेंजींऐकती॥तींतरजाणाव्य र्थची॥४२॥नांवठेविलेंउदारकर्ण॥अडकावेचितांजायप्राण॥बृहस्पतीनाम ज्यालागुन॥धडवचनबोलतांनये॥४३॥कमलनयननामविशेष॥परीदोहों डोळ्यांसाढलेवडस॥क्षीरसिंधुनामपुत्रास॥परीताकतयासीमिळेना॥४४॥नाम ठेविलेंपंचानन॥परीजंबुकदेखतांपळेउठोन॥जन्मगेलामागतांकोरान्न॥सा र्वभौमनामतयातें॥४५॥नामठेविलेंजयामदन॥तोकुरूपकुलक्षण॥तैसीसु मित्रानव्हेपूर्ण॥करणीनामासारखी॥४६॥नृपआलाऐकतांकर्णी॥समोर आलीहंसगामिनी॥दशरथाचियेचरणीं॥मस्तकठेवीसद्भावें॥४७॥स्त्रियां सिदेवतोआपलानाथ॥पुत्रांसिदेवमातापितासत्य॥शिष्यांसीगुरुदैवत॥दैव तअतीतगृहस्थांसी॥४८॥ह्मणोनिसुमित्रेनेंअजनंदन॥पूजिलाषोडशोपचा रेंकरून॥उभीठाकलीकरजोडून॥अधोवदनसलज्ज॥४९॥कैकेयीडोहळ्यां चेंदुःखप्रबळ॥परीतेंविसरलायेथेंसकळ॥जैसाबोधठसावतांनिर्मळ॥तम ज्ञानवितळेपैं॥५०॥राजाह्मणेसुमित्रेसी॥कायडोहळेहोतातमानसीं॥तेम जसांगनिश्चयेंसी॥कुरंगनेत्रेसुकुमारे॥५१॥मगकिंचितहास्यकरून॥बो

लेसलज्ज अधोवदन॥ जेंऐकतांसकंरवसंपन्न॥ अजनंदनपैंहोय॥५१॥ ह्मणे
ह्रेचआवडीबहुवस॥ कौसल्यागर्भीजिगन्निवास॥अवतरेलआदिपुरुष॥
जगद्‌ध्येजगदात्मा॥५२॥ त्याचीअहोरात्रसेवाबरवी॥वाटेममपुत्रेंचिकरा
वी॥जाणीवशाहणीवआघवी॥ ओंवाळावीतयावरूनी॥५४॥सेवेपरतेंथोर
साधन॥ममपुत्रासीनमानेंआन॥ आपुलेआंगाचेंआंथरूण॥ज्येष्ठसेवेलागीं
करू॥५५॥ त्रिभुवनराज्यतृणसमान॥त्याहून अधिकज्येष्ठभजन॥चारीमु
क्तीवाटतीगौण॥ज्येष्ठसेवेपुढेंपैं॥५६॥ एकधारसत्यजोमिनिर्मळ॥ कोणास
आवडेलहालाहल॥ उत्तमसांडोनितांदुळ॥ सिकताकांहोशिजवावी॥५७॥
त्यजोनिसुंदररायकेळें॥कोणभक्षीलअर्कीफळें॥ कल्पद्रुमींजोविहंगमरवे
ळे॥तोनातळेबाभुळेसी॥५८॥मानससरोवरींचाराजहंसपाहीं॥तोकदान
राहेउलूकगृहीं॥बुडीदिधलीक्षीराब्धिडोहीं॥दग्धवननावडेत्या॥५९॥ नंदन
वनींचाभ्रमरकदाकाळीं॥ अर्कपुष्पींरुंजीनघाली॥जेणेंइंद्रभुवनींनिद्राकेली
॥रवदिरांगारींननिजेतो॥६०॥ रंभेतुल्यजायाचांगली॥सांडोनिमेलकोणकंव
ळी॥तैसीरामींआवडीधरिली॥कदाविषयींनरमेतो॥६१॥ ह्मणोनिराजच-
क्रचूडामणी॥ माझीआवडीज्येष्ठभजनीं॥ ऐसेसुमित्रेचेशब्दऐकोनी॥आ-
लिंगनदिधलेंदशरथें॥६२॥ वाटेअमृतप्राशनकेलें॥ कींत्रिभुवनराज्यहाता
सिआलें॥तैसेंनृपाचेंमनसंतोषलें॥ आलिंगनेंसुमित्रेचे॥६३॥ह्मणेएकेंएकु
मारेराजसे॥चंपककळिकेडोळसे॥ तुवांसांगितलेडोहळेसुरसे॥ पूर्णहोती-
ळनिर्धारें॥६४॥ नानाभूषणेंअलंकार॥ओंवाळीतिजवरूननृपवर॥दानेंदेव
विलींअपार॥ सुमित्रेहातींयाचकां॥६५॥ यावरीज्येष्ठराणी॥कौसल्याना
मेंज्ञानरवाणी॥जीपुराणपुरुषाचीजननी॥त्रिभुवनींविख्यात॥६६॥जेप
रब्रह्मरसाचीमूस॥कींनिजप्रकाशरत्नमांदुस॥क्षीराब्धिहृदयविलास॥जिणें
अंतरींसांठविला॥६७॥जोइंदिरावरत्रिभुवनेश्वर॥जयाचेआज्ञाधारविधिश
चिवर॥ हृदयींध्यायअपर्णावर॥कौसल्याउदरींनिवसेतो॥६८॥असोकौसल्ये
चेमंदिरीं॥ प्रवेशताझालाश्रावणारी॥सेवकराहिलेबाहेरी॥द्वारमर्यादाधरू•
नियां॥६९॥ कौसल्याज्ञानकळापरम॥तीसअंतर्बाह्यव्यापलाराम॥आचरण

अवघेंपरब्रह्म॥ नदिसेविषमकदाही॥७०॥सांडोनिजागृतीसुषुप्तीस्वप्न॥ नयनीं लाविलेंज्ञानांजन॥ चराचरअवघेंनिरंजन॥ स्वरूपदिसेकौसल्या॥७१॥दश रथप्रवेशोनिअंतरीं॥पाहेस्थूळवोसरीवरी॥ मगसूक्ष्मदेहमाजघरीं॥नदिसेक दाकौसल्या॥७२॥कारणकोठडींतपाहेसादर॥ तंवतेथेंअवघाअंधकार॥ मगम हाकारणउपरीथोर॥ त्यावरीनृपवरचढियेला॥७३॥ तेथेंनदिसेकौसल्यासती॥ मगचकितपाहेनृपती॥जोउदरींसाठविलाजगत्पती॥ तिचीस्थितीकळेना॥७४॥ मगपरात्परघरांत॥प्रवेशेतेव्हांअजपाळसुत॥तोंतेबैसलीसमाधिस्थ॥ निर्विक ल्पवृक्षातळीं॥७५॥ अंतरदृष्टीमुरडली॥ वरदळस्वनामविसरली॥ ब्रह्मानंदरू पझाली॥ नचालेबोलीद्वैताची॥७६॥जैसासतेजपरमपवित्र॥ तेथेंडागनलागे- अणुमात्र॥ स्वरूपींरमतांयोगीश्वर॥ ज्ञानराहेऐलीकडे॥७७॥ कल्पांतवीजम शकगिळी॥पिपीलिकामेरूकक्षेसिघाली॥ धेनुवत्समृगेंद्राआकळी॥ एकवेळे घडेलहें॥७८॥परीचतुराविश्वरूपावरी॥ नचालेनहालेनिर्धारीं॥ श्रोत्रियांचे यज्ञशाळेभीतरी॥ कोणमहारप्रवेशेल॥७९॥ वडवानळापुढेंकर्पूरजाण॥ कींज ळनिधीमाजीलवण॥ तैसीबुद्धिआणिमन॥ स्वसुखावरीविरालें॥८०॥ असो स्वानंदसागरांत॥ कौसल्यापूर्णसमाधिस्थ॥ जवळीउभाठाकलादशरथ॥पाहे तटस्थउगाची॥८१॥ कौसल्यास्वरूपींलीन॥ हेदशरथासीनेणवेरवुण॥ ह्मणेहे रुसलीसंपूर्ण॥तरीवचननबोले॥८२॥ ह्मणोनिराजचक्रचूडामणी॥ कौसल्ये- जवळीबैसोनी॥ स्नेहेंतीसहृदयींधरूनी॥समाधानकरीतसे॥८३॥तरीतेनउघ डीनयन॥ नाहींशरीराचेंभान॥ मीस्त्रीपुरुषस्मरण॥ गेलीविसरूनकौसल्या॥८४॥ अलंकारकेंचेएकसुवर्ण॥ तरंगलहरीकेअवघेंजीवन॥ तैसेंविश्वनाहींरघुनंदन॥आ नंदघनविस्तारला॥८५॥ ऐशीकौसल्येचीस्थितीझाली॥राजाह्मणेभूतेंझडपिली॥ कींमहद्भूतेंघेरली॥वोळखीमोडलीइयेची॥८६॥ राजाह्मणेदेवऋषीसिद्ध॥इहीं दीधलाआशीर्वाद॥ कींपोटायेईलब्रह्मानंद॥ आदिपुरुषश्रीराम॥८७॥ऐकतांरा मनामस्मरण॥ कौसल्येनेंउघडिलेनयन॥ जगदाभाससंपूर्ण॥ रघुनंदनरूपदि से॥८८॥राजाह्मणेनितंबिनी॥ कुरंगनेत्रेगजगामिनी॥ कायजेअसेलआवडम नीं॥ तेंडोहळेपुरवीनसर्व॥८९॥ श्रमदाकीबोलेवचन॥ तोंकौसल्याबोलेगर्जोन

॥मीजगदात्मारघुनंदन॥ केंचेंअज्ञानमजपाशीं॥ ९०॥स्थूललिंगआणिकारण॥ यांहूनिमाझेंरूपभिन्न॥ महाकारणाहेंनिरसून॥ आत्मारामवेगळामी॥ ९१॥द्वैताद्वैतमहाद्वैत॥ यांहूनिवेगळामीअतीत॥ सच्चिदानंदजेथतेथ॥ खुंटोनियांराहिला॥ ९२॥जीवशिवदोनपक्ष॥ ध्याताध्यानलयलक्ष॥ यांवेगळामीसर्वसाक्ष॥ अनिंत्यअलक्ष्यश्रीराम॥ ९३॥राजाह्मणेकोसल्येऐकें॥ कोणआईमीमजओळखें॥डोहळेपुसावयामहासुखें॥तुजजवळीबैसलों॥ ९४॥ येरीह्मणेज्ञाताज्ञेयज्ञान॥ हें सर्वगेलेंआटोन॥ नाहींस्त्रीपुरुषनपुंसकपूर्ण॥ मीतूंपणतेथेंकेंचें॥ ९५॥नृप ह्मणेहेमहद्भूतेंघेरिली॥ ओळखीसर्वसोडिली॥ मगपुसेगोष्टमागली॥ धाकुटपणीचीतियेतें॥ ९६॥राजाह्मणेशशांकवदने॥ गुणसरितेपद्मनयने॥ वन्हाडबुडवोनी रावणें॥ नेलेंहोतेंआठवतेंकीं॥ ९७॥ शत्रूचेंनामऐकतांकर्णी॥ हाकफोडिलीभुजाठोकोनी॥ ह्मणेधनुष्यबाणदेआणोनी॥ टाकीनछेदूनदाहीशिरें॥ ९८॥ताटिकामारूनियांआधी॥ ऋषियागपाववीनसिद्धी॥ महाराक्षसवधोनियुद्धीं॥ गाधितनयतोषवीन॥ ९९॥ शिवचापपरमप्रचंड॥ मोडोनिकरीनदुखंड॥ माझीज्ञानशक्तीजेअखंड॥ पणेंजिंकोनिआणितों॥ २००॥जेणेंनिःक्षत्रियकेलीअवनीपूर्ण॥ त्याचागर्वहरीनलागतांक्षण॥ मीएकपत्नीरघुनंदन॥ पितृवचनपाळक॥ १॥मीसेवीनघोरविपिन॥ परिवारेंसींत्रिशिराखरदूषण॥ क्षणमात्रेंटाकीनवधोन॥ अग्नितृणाजाळिजेसा॥ २॥रीसवानरांहातीं॥ लंकाघालीनपालथी॥ माझावज्रदेहीमारुती॥ परमपुरुषार्थीमहावीर॥ ३॥ क्षणेंजाळूनलंकानगर॥ शत्रूंचींशिरेंछेदूनसाचार॥ पाषाणीं-पालाणोनिसमुद्र॥ लंकापुरघेईनमी॥ ४॥ कौसल्याहाकफोडीदारुण॥ लंकेपुढेंमाजवीनरण॥ महाहिंसाळकुंभकर्ण॥ टाकीनछेदूनक्षणार्धें॥ ५॥ सहपरिवारेंछेदूनदशशिर॥ बंदीचेसोडवीनसुरवर॥ माझाबिभीषणप्रियकर॥ छत्रधरीनतयावरी॥ ॥ ६॥स्वपदींस्थापूनिनिजभक्त॥ मीअयोध्येसीयेईनरघुनाथ॥ आधिव्याधिजरामृत्य॥ त्याविरहितकरीनप्रजा॥ ७॥ स्त्रीपुरुषनपुंसकभेद॥ यावेगळामी ब्रह्मानंद॥ मायाचक्रचाळकशुद्ध॥ निष्कलंकअभेदपें॥ ८॥ मीप्रळयकाळासी शासनकर्ता॥ आदिमायेचानिजभर्ता॥ कर्ताहर्तापाळिता॥ मजपरतानसेची॥ ॥ ९॥ मीअजअजितसर्वेश्वर॥ मीचनटलोंचराचर॥ धरूनिनानाअवतार॥ मज

माजीसामावें ॥ १० ॥ ऐसें ऐकतां दशरथ ॥ ह्मणे भूतें घेतली यथार्थ ॥ फांटा फुटला बहुत ॥ बडबडते भलतेंची ॥ ११ ॥ पंचाक्षरी आणा पाचारून ॥ महाराज सद्गुरु ज्ञानघन ॥ तो सरसिजोद्भवनंदन ॥ बोलावून आणा वेगें ॥ १२ ॥ जेणें दर्भावरी धरिली अवनी ॥ कमंडलू ठेविला सूर्यासनीं ॥ इंद्रसभेस नेला वासरमणी ॥ अद्भुत करणी तयाची ॥ १३ ॥ वसिष्ठ आला धांवून ॥ राजा दृढ धरी चरण ॥ कौसल्येसारखें निधान ॥ भूतें संपूर्ण ग्रासिलें ॥ १४ ॥ म्यां याग केला सायासीं ॥ कीं पुत्र होईल कौसल्येसी ॥ तों मध्येंच हे विवसी ॥ उठली ऋषी काय करूं ॥ १५ ॥ मग ह्मणे ब्रह्मसुत ॥ इच्या पोटा येईल रघुनाथ ॥ ती सगोष्टी हे विपरीत ॥ काळत्रयीं घडेना ॥ १६ ॥ अंधकूपीं पडेल तरणी ॥ कोरान्न मागेल चिंतामणी ॥ स्कधारस गेला कडवटोनी ॥ काळत्रयीं घडेना ॥ १७ ॥ क्षुधेनें पीडिला क्षीरसागर ॥ स्करतरू सिये येईल दरिद्र ॥ तीव्र तपेल रोहिणीवर ॥ काळत्रयीं घडेना ॥ १८ ॥ असो वसिष्ठ कौसल्येजवळी ॥ येऊनि विलोकी तेवेळीं ॥ तंव ती श्रीरामरूप झाली ॥ अंतर्बाह्य समूळ ॥ १९ ॥ न दिसे स्त्रियेची आकृती ॥ धनुष्यबाण घेऊनि हातीं ॥ आकर्णनयन विराजती ॥ देखे मूर्ती जगद्वंद्य ॥ २० ॥ पाहतां रूप आनंदघन ॥ सद्गद झाला ब्रह्मनंदन ॥ अष्टभावें दाटला पूर्ण ॥ गेला विरून देहभाव ॥ २१ ॥ वसिष्ठ कौसल्या ते अवसरीं ॥ बुराली ब्रह्मानंदसागरीं ॥ दशरथ परम अंतरीं ॥ घाबरा झाला नेणोनियां ॥ २२ ॥ वसिष्ठासारिखा महामुनी ॥ भूतें झडपिला तये क्षणीं ॥ या भूताची कर्ता झाडणी ॥ कोणी त्रिभुवनीं दिसेना ॥ २३ ॥ मी हतभाग्य संपूर्ण ॥ मज केंचें पुत्रसंतान ॥ कौसल्याही गेली झडपोन ॥ ब्रह्मानंदें मूर्च्छित ॥ २४ ॥ निरपराध वधिला श्रावण ॥ तो दुःख देतो दारुण ॥ ऐसा तो महाराज आनंदघन ॥ जाकळे पूर्ण अंतरीं ॥ २५ ॥ तों स्वानंद लहरी जिरवून ॥ वसिष्ठें उघडिले नयन ॥ राजा धांवोन धरी चरण ॥ आनंद न माये अंतरीं ॥ २६ ॥ रायासी कैशी परी झाली ॥ पूरीं बुडतां नौका आली ॥ अंधकूपीं पडतां तत्काळीं ॥ हस्त सूर्यें दीधला ॥ २७ ॥ सर्प डंखितां गरुड धांवे ॥ गजीं कोंडितां केसरी पावे ॥ क्षुधितापुढें हेलावे ॥ क्षीरसागर येऊनी ॥ २८ ॥ कीं वणव्यांत जळतां घन ॥ कीं हुडहुडी भरतां धांवे कृशान ॥ कीं दरिद्रें पीडितां लक्ष्मी आपण ॥ घरीं येऊन बैसली ॥ २९ ॥ ऐसा आनंदला राजा निश्चित ॥ ह्मणे सद्गुरुस्वामी

तूंसमर्थ॥मजनवलहैंवाटत॥तुजहीभूतेंझडपिती॥३०॥आह्मीअत्यंतभाग्य हीन॥कैंचेंदेखोंपुत्रसंतान॥मगहांसलाब्रह्मनंदन॥कायगजोंनबोलत॥३१ ॥जोनीलग्रीवहृदयरत्न॥जेंकमलोद्भवाचेंदेवतार्चन॥सनकादिककरूनिय ल॥हृदयसांबळींतवाहती॥३२॥जोवैकुंठपुरविळासी॥नोआलाकौसल्ये- च्यागर्भासी॥मारूनसकळदुष्टांसी॥देवसोडवीलबंदींचे॥३३॥जेंजेंकौसल्या बोलिलीसत्य॥तेंपुढेंहोईलयथार्थ॥तुजहोतीलचारसुत॥सत्यवचनराजेंद्रा ॥३४॥शंखचक्रशेषनारायण॥चतुर्थरूपेंप्रगटेलजगज्जीवन॥पुण्यप्रतापहो यजाण॥ज्याचीकथाऐकतां॥३५॥ऐसींवसिष्ठाचींवचनें॥त्यानंदनऋषीचींउडु गणें॥कींसत्यवैरागरीचींरत्नें॥निवडोनिदिधलीं दशरथा॥३६॥माध्यान्हायेईल चंडकिरण॥पुष्यनक्षत्रसाधून॥अवतरेलरघुनंदन॥पूर्णब्रह्मजगद्गुरू॥३७॥ तेणेंकर्णद्वारांतूनिस्वरित॥सांठविलीं हृदयसंदुकेंत॥धांवूनिश्रीगुरुचेपायधरि त॥ह्मणेकृतार्थझालोंमी॥३८॥असोभरलियानवमास॥प्रसूतिसमयकौस- ल्येस॥कवणऋतुकवणदिवस॥सावकाशऐकातें॥३९॥वसंतऋतुचैत्रमास॥शुद्ध पक्षनवमीदिवस॥सूर्यवंशींजगन्निवास॥सूर्यवारींजन्मला॥४०॥माध्यान्हा आलाचंडकीर्ण॥पुष्यनक्षत्रसाधून॥अवतरलारघुनंदन॥पूर्णब्रह्मजगद्गुरू॥ ॥४१॥श्रीरामकेवळपरब्रह्म॥त्यासझालेंह्मणतांजन्म॥संतहांसतीलपरम॥ तत्त्वज्ञानवेत्तेजे॥४२॥ज्याचीलीलाऐकतांअपार॥खंडेजन्ममृत्युदुर्धर॥त्या रामासीजन्मसंसार॥काळत्रयींघडेना॥४३॥दावीलौकिककरणी॥कींकौस- ल्याझालीगर्भिणी॥तोब्रह्मानंदमोक्षदानी॥जन्मकर्मत्याकैंचें॥४४॥क्षीरसा गरींहूनिनारायण॥येवोनिअयोध्येसीझालासगुण॥परीशेषलक्ष्मीसहितज गज्जीवन॥तेसाचितेथेंसंचला॥४५॥जोअनंतकल्याणदायक॥अजअजित निष्कलंक॥भक्ततारावयासिदेख॥जगन्नायकअवतरला॥४६॥असोअयो ध्यापुरींतेवेळीं॥दुंदुभींचीघाईलागली॥विमानांचीदाटीझाली॥पुष्पेंवर्ष- ती अपार॥४७॥देवकरितीजयजयकार॥करीलराक्षससंहार॥अवतरलाहार घुवीर॥बंधमुक्तकरीलआह्मां॥४८॥असोतेकौसल्यासती॥बैसलीअसतांए कांतीं॥तोंआठवर्षांचीमूर्ती॥सन्मुखदेखेअकस्मात॥४९॥निमासुरवदनीं

स्कंदर॥ तेजें भरलें निज मंदिर॥ ज्या तेजा तें शशिमित्र॥ लपोनि जाती विलोकितां॥ ॥५०॥ पदकमल मकरंद सेवना॥ भ्रमरी झाली क्षीराब्धिकन्या॥ कदां न विसंबे चरणां॥ कृपण धना लागीं जैसा॥५१॥ संध्यारांग अरुण बालार्क॥ दिव्य रत्नांचे रंग काढिले देख॥ तळवे तैसे सुरेख॥ श्रीरागाचे वाटती॥५२॥ चंद्र क्षयरोगें कष्टी होऊनी॥ निजांगाचीं दश शकलें करूनी॥ स्फुरवाडला श्रीरामचरणीं॥ स्वानंद धनी घेतसे॥५३॥ रमा पदीं रंगली दिवस निशीं॥ बंधु पाहुणा आला शशी॥ तो राहिला अक्षय व्हावयासी॥ न जाय चीमा घारा॥५४॥ ध्वज वज्रांकुश पद्म॥ ऊर्ध्वरेखादि चिन्हें उत्तम॥ याचा अर्थ ऐकतां परम॥ सुख होय भक्तांसी॥५५॥ सात्विक प्रेमळां देखा॥ ऊर्ध्व संकेत ऊर्ध्व रेखा॥ सत्यशील भाविकां॥ ऊर्ध्व पंथ दावीत॥५६॥ विद्यामदें मत्तगज॥ भाग्यमदें डुल्लत सहज॥ त्यांसि आकर्षावयास तेज॥ पायीं अंकुश झळकत॥५७॥ पायीं झळके दिव्य पद्म॥ जे जगमाउली उत्तम॥ तें पद्मचे राहतें सद्म॥ तये पदीं स्फुरवाडलें॥५८॥ अहंकार जड पर्वत॥ शरणागतां बाधक यथार्थ॥ तो फोडावया झळकत॥ वज्र पायीं रामाचे॥५९॥ भवसागर तरावया गहन॥ जहाज अद्भुत रामचरण॥ त्यावरी ध्वज विराजमान॥ रात्रंदिवस तळपतसे॥६०॥ काम क्रोध दुर्धर असुर॥ त्यांचें छेदावया शिर॥ देदीप्यमान दिव्य चक्र॥ राम तळवीं झळकतसे॥६१॥ मळरहित पद स्फुंदर॥ घोटीं त्रिगुणी पत्राकार॥ इंद्रनीळ उपमा साचार॥ न पुरती ह्मणोनियां॥६२॥ पदतळें आरक्त साजिरीं॥ तेथें वसे सरसिजोद्भव कुमारी॥ विश्रांती घ्यावया अहोरात्रीं॥ रामचरणीं रंगली हो॥६३॥ कितीपापें हरावीं दिवस रजनीं॥ ह्मणोनि श्रमली जन्हुनंदिनी॥ शक्रत्र वांकी रूप होउनी॥ रामचरणीं विराजे॥६४॥ मांड्या स्फकुमार सांवळिया॥ तेथें स्फुरवाडली मित्रतनया॥ कीं यमानुजा अपवाद चुकवावया॥ महदाश्रय धरियेला॥६५॥ ऐसी रामपदीं त्रिवेणी साचार॥ प्रयाग तीर्थराजेश्वर॥ प्रेमें माघमासीं भाग्यवंत नर॥ प्रातःस्नाना धांवती॥६६॥ भक्त मुमुक्षु साधक संत॥ हे चि राजहंस विराजत॥ वांकीवरी रत्नें तळपत॥ ते चि तपस्वी तपताती॥६७॥ चरणरज झळके स्पष्ट॥ तो चि जाणिजे अक्षयवट॥ तेथें सनकादिक वरिष्ठ॥ क्षेत्रसंन्यासी जाहले॥६८॥ प्रयागीं मोक्ष देहत्यागितां॥ येथें मोक्ष श्रवण करितां॥ देहीं असतां विदेहता॥ ये सहाता भ



क्तांच्या ॥ ६९ ॥ प्रयागींकष्टबहुत ॥ येतांजातांभोगितीनित्य ॥ हासूयाध्यानींअ कस्मात ॥ प्रगटेलसत्वरभक्तांच्या ॥ ७० ॥ तोडरवांकीनेपुरें ॥ असुरांवरगर्जतीग जरें ॥ वाटेनभगाळोनीएकसरें ॥ पोटऱ्याजणूंवोतिल्या ॥ ७१ ॥ कींसरळकर्दळीचेस्तं भ ॥ कींगरुडपाचूचेउगवलेकोंभ ॥ इंद्रनीळगाळूनिस्फप्रभ ॥ जानुजंघवोतिले ॥ ७२ ॥ मिळाल्यासहस्रचपळा ॥ तैसाकासेझळकेपिंवळा ॥ वरीतळपेकटिमेखळा ॥ पाहतां डोळांआल्हाद ॥ ७३ ॥ कटीमेखळेवरीमहामणी ॥ कींपंक्तीबैसलेदिनमणी ॥ दाहक ल्सांडोनिजधनीं ॥ श्रीरामाचेलागले ॥ ७४ ॥ वेदांताच्याश्रुतीगर्जोन ॥ अर्थबोलती जेवींशोधून ॥ तैशाक्षुद्रघंटारुणझुण ॥ शब्दकरितीरसाळ ॥ ७५ ॥ देखोनिकटिसुकु मार ॥ लाजोनिवनागेलामृगेंद्र ॥ वाटेत्यादुःखेंशरीर ॥ वाहनकेलेंदुर्गेचें ॥ ७६ ॥ गंभी रावर्तनाभिस्थान ॥ जेथेंजन्मलाचतुरानन ॥ सत्वरजतमगाळून ॥ त्रिवळीवरीवि राजे ॥ ७७ ॥ कौस्तुभतेजअपार ॥ पाहतांभुलतीशशिमित्र ॥ गुणींओंविलीनक्षत्रें समग्र ॥ तैसेमुक्ताहारडोलती ॥ ७८ ॥ कींत्यामुक्तीच्यामाळाबहुत ॥ रघुपतीच्याग ळांडोलत ॥ कींमुक्तरूपेंसमस्त ॥ अनंतब्रह्मांडेंगुंफिलीं ॥ ७९ ॥ मुक्ताफळांच्यामाळा गहन ॥ परीत्यांचापालटलावर्ण ॥ दिसतीइंद्रनीळासमान ॥ श्यामलांगींरघुप- तीच्या ॥ ८० ॥ नीळगगनावरीसुंदर ॥ मंदाकिनीओघदिसेशुभ्र ॥ तैसीमाळाम नोहर ॥ श्यामतनूवरीशोभे ॥ ८१ ॥ कोमलांगअतिनिर्मळ ॥ वरीडोलेवैजयंतीमाळ ॥ पुष्करींशक्रचापस्फदाळ ॥ सुरंगजैसेंविराजे ॥ ८२ ॥ कींमेघींस्थिरावेजैसीप्रभा ॥ तै सीवैजयंतीचीशोभा ॥ सहस्रमुखाचियाजिभा ॥ गुणवर्णितांशीणल्या ॥ ८३ ॥ अ नंतभक्तहृदयींधरिले ॥ तरीचवक्षस्थळरुंदावलें ॥ ब्रह्मानंदमुरोनिओतिलें ॥ हृदय स्थानसत्यपैं ॥ ८४ ॥ श्रीवत्सझळकेसव्यांगीं ॥ श्रीनिकेतनवामभागीं ॥ उटीशोभे श्यामलांगीं ॥ कोणदृष्टांततेऐका ॥ ८५ ॥ मित्रकन्येवरीजान्हवीजळ ॥ कींराकाइंदु प्रभेनिराळ ॥ दैदीप्यमणीइंद्रनीळ ॥ आवरणत्यावरीकाश्मिराचें ॥ ८६ ॥ सूर्यप्र- भेचींचक्रेंतळपती ॥ तैशामुद्रिकाझळकती ॥ औपासकयंत्रेंरेखिती ॥ तेचिगतीये थेंदिसे ॥ ८७ ॥ प्रळयाग्नीनेंउघडिलेनयन ॥ तेविंकीर्तिमुखवीदंडपूर्ण ॥ निष्कलंक रोहिणीरमण ॥ पदकहृदयींडोलतसे ॥ ८८ ॥ कंबुकंठअतिशोभिवंत ॥ नासिकस रळसुकुमारबहुत ॥ मंदस्मितवदनविराजित ॥ कोटिमन्मथशोभामुखीं ॥ ८९ ॥ विद्रु

मवर्णअधरसतेज॥ मर्गजवळीनें झळकतीद्विज॥ त्यातेजेंशशिनक्षत्रेंतेजःपुंज॥ झां कोळतीपाहतां॥ ९०॥ त्रिलोकींचागोठोनिआनंद॥ ओतिलेंश्रीराममुखारविंद॥ आकर्णनयनभ्रुकुटीविशद॥ धनुष्याकृतीशोभती॥ ९१॥ स्वानंदसरोवरींचींक मळदळें॥ तैसेआकर्णनयनविराजले॥ ज्याकृपादृष्टीनेंनिवाले॥ प्रेमळजनस- र्वही॥ ९२॥ कुंडलेंतळपतीमकराकार॥ जोडिलेमित्रआणिरोहिणीवर॥ कींअं गिरापुत्रभृगुपुत्र॥ विचारपुसतीरामातें॥ ९३॥ कींवेदसागरींचीरत्नज्योती॥ पूर्वउत्तरमीमांसानिश्चिती॥ कुंडलरूपेंजाणविती॥ अर्थविशदस्वामीतें॥ ९४॥ श्रीरामतनूसुकुमार॥ तेणेंशोभतीअलंकार॥ पीतवर्णतिलकसुंदर॥ अनुपम्य रेखिला॥ ९५॥ सुवर्णनदीचापूर॥ नीलगिरीवरीनिरंतर॥ तैसातिलकसुंदर॥ विशालभाळींझळकतसे॥ ९६॥ जैसाकल्पांतींचादिनकर॥ तैसामुकुटपरिकर॥ तेजतळपतसेअपार॥ दिक्चक्रींनसमाये॥ ९७॥ दावाग्नीचेकल्लोळभडकत॥ तै सेंउत्तरीयझळकत॥ दशांगुळेंमुक्तेंरुळत॥ कृत्तिकापुंजासारिखीं॥ ९८॥ परम तेजाळक्षीरोदक॥ कींशुभ्रयशाचढलें बीक॥ शक्रद्विपश्वेतमृडानीनायक॥ कर्पू रेंकरूनिऊटिला॥ ९९॥ दिव्यरजतनगटघडलें॥ कींपारिजेंकैलासडवरिलें॥ कीं जान्हवीतोयेंओपविलें॥ दिननाथेंस्वहस्तें॥ ३००॥ सच्चिदानंदतनूसगुण॥ अत सीकुसुमाभासपूर्ण॥ त्याचिरंगेंकरून॥ नीलोत्पलेंरावविलीं॥ १॥ नभासिचढला तोचरंग॥ त्याचियाप्रभेनेंमेघासिरंग॥ इंद्रनीळहीसुरंग॥ त्याचप्रकाशेंजाहले॥ २॥ तेथींचेंसौंदर्यअद्भुत॥ गरुडपाचूचेंतेजदिसत॥ मर्गजासीबीकचढत॥ तनुसांवळी देखोनियां॥ ३॥ जोवैकुंठींचावेल्हाळसुंदर॥ भक्तमंदिरांगणमंदार॥ कुरवंडीक रीवेगींसाचार॥ कोटीमकरध्वजवरूनियां॥ ४॥ ब्रह्मांडोदराबाहेरीं॥ आंगींचासुवा सधांवणेकरी॥ लीलामृतसागरकैटभारी॥ भक्तजनमनवेधकजो॥ ५॥ पूर्णब्रह्मा नंदरघुवीर॥ लीलाविग्रहीश्रीधर॥ हृदयींरेखितीनिरंतर॥ निजभक्तप्रेमबळें॥ ६॥ असोकौसल्याबोलेतेअवसरीं॥ भक्तवत्सलामधुकैटभारी॥ तूंआतांबाळवेषध रीं॥ माझेउदरींअवतरें॥ ७॥ लोकह्मणतीकौसल्यानंदन॥ ऐसाहोईंमनमोहन॥ अमलदलराजीवनयन॥ हास्यवदनविलोकी॥ ८॥ सजलजलदवर्णकोमल॥ कौ सल्येपुढेंजाहलाबाळ॥ तंवतेपरमसकचेल॥ पुष्यार्कयोगअसेपैं॥ ९॥ जोक्षीर

सागरवासीतमालनील॥ तोकौसल्येपुढेंझालाबाळ ॥ चरणांगुष्ठेंधरोनिकोमळ ॥मुखकमळींघालीतसे॥१०॥ भक्तचरणींलागलेबहुत ॥ गोडगोडह्मणोनियां स्वाणित॥ यालागींगोडीरघुनाथ॥ स्वयेंपहातचाखोनी ॥११॥ स्वचरणींची गोडीकांचोखिन॥भक्तांसीलोभलागावयाबहुत॥ ह्मणोनियांकौसल्यासुत॥ कौतुकार्थदाखवीतसे॥१२॥पुत्रझालाकौसल्येस॥लागलावाद्यांचाघोष॥सुरां सहितसुरेश॥जयजयकारनभींकरिती ॥१३॥सुमनसंभारतेअवसरीं॥देव वर्षतीअयोध्येवरी॥दुंदुभीनादअंबरीं॥नसमायेचितेधवां॥१४॥हळदीकुं कुमेंताटींभरूनी ॥बिदोबिदींधांवतीसुवासिनी॥पावल्याकौसल्येच्यासदनीं ॥वेगेंकरूनितेधवां॥१५॥मंगळतुरांचाएकचिनाद॥घरोघरींहोतब्रह्मानंद॥ तेसमर्यांचाआनंद॥भोगींद्रवर्णूशकेना॥१६॥आनंदलाब्रह्मनंदन॥चहूंकडू नधांवलेब्राह्मण॥जैसेक्षीरसागरदेखोन॥क्षुधार्थीवेगेंधांवती॥१७॥कींम हापर्वकाळप्रगटला॥प्रयागासीधांवेभक्तमेळा॥कींगांवासमीपपरिसनिघा- ला॥दुर्बळधांवतीघ्यावया॥१८॥कींतृषाक्रांतगोभारसकळी॥धांवतीजैसेगंगा जळीं॥कींवृक्षदाटलेदेखोनिफळीं॥विहंगमतेथेंझेंपावती॥१९॥तैसीब्राह्मणा चीतेकाळीं॥दाटीझालीराजाजवळी॥पुत्रमुखपाहावयातेवेळीं॥दशरथरावचा लिला॥२०॥दशरथह्मणेयाचकांसी॥जेइच्छाअसेलमानसीं॥तेतेमागामजपा शीं॥येचसमयींदेईन॥२१॥भांडारेंफोडिलींबहुत॥याचकांसीबोलेदशरथ॥मो टबांधोनिअमित॥आवडेतितुकेंन्याआतां॥२२॥मगसमागमेंघेऊनब्राह्मण॥म हाराजतोअजपाळनंदन॥प्रवेशलाआनंदेंकरून॥सदनाप्रतीआपुल्या॥२३॥द शरथेंकरूनियांस्नान॥केलेंआधींपुण्याहवाचन॥पाहावयासीपुत्रवदन॥राजा जवळीपातला॥२४॥श्रीरामवदनतेअवसरीं॥न्याहाळितांतोषलाअंतरीं॥मधु बिंदुघालोनिमुखाभीतरी॥मधुकैटभारीतोषविला॥२५॥श्रीरामाचेंजातक॥ करीतेव्हांनृपनायक॥गोभूरत्नेंअसंख्य॥मगदेतयाचकांसी॥२६॥रत्नजडित सिंहासन॥त्यावरीबैसेश्रीरामाघेऊन॥मृगांकवर्णचामरजाण॥दोघीढाळि- तीदोहींकडे॥२७॥पीकपात्रधरूनिहातीं॥समीपबैसेएकदूती॥कनकांबराची घेऊनिबुंथी॥बैसलीसतीकौसल्या॥२८॥भोंवतेवेष्टिलेविद्वज्जन॥जाणती

जैसाभविष्यज्ञान॥ सातशेंस्त्रियाधांवोन॥ येत्याझाल्यादशरथाच्या॥ २९॥ जैशा केवळविद्युल्लता॥ तैशाअलंकारवस्त्रांसहिता॥ बाळाकौसल्येभोंवत्या॥ शोभ त्याकैशातेवेळीं॥ ३०॥ महामायाआणिभगवती॥ निजभोंवत्यामिळाल्याअ- नंतशक्ती॥ कीसूर्यचंद्रांसीवेष्टिती॥ किरणेंजैसींतयापरी॥ ३१॥ वसिष्ठगुरु होऊनिपुढें॥ विलोकीश्रीरामाचेंरूपडें॥ जेजन्मकर्तृत्वनिवाडें॥ रायापुढेंसांगत ॥ ३२॥ ह्मणेहाक्षीरसागरविहारी॥ जन्मलाकौसल्येच्याउदरीं॥ निजजनतारावया सिनिधारीं॥ अवतरलाआदिपुरुष॥ ३३॥ द्वादशवर्षेंयासभरतां॥ एकद्विजयेईल अवचिता॥ प्रार्थूनियांदशरथा॥ यासीघेऊनजाईल॥ ३४॥ आरंभींसोडूनिएक बाण॥ वधीलराक्षसीदारुण॥ गोब्राह्मणमखपाळण॥ करीलजाणपुत्रतुझा॥ ॥ ३५॥ कृशानप्रवेशेशुष्कविपिनीं॥ तैसाजाळीलराक्षसमखरक्षणीं॥ पुढेंचर णस्पर्शेंकरूनी॥ एकललनाउद्धरील॥ ३६॥ परमप्रचंडकोदंड॥ तेंभुजदंडबळें करीलदुखंड॥ एकपत्नीव्रतअखंड॥ वीरहोईलत्रिभुवनीं॥ ३७॥ महायोद्धाए कब्राह्मण॥ त्यासजिंकीलनलगतांक्षण॥ बंधूसहितपरतोन॥ अयोध्येसीयेई ल॥ ३८॥ राज्यींबैसतांहावरिष्ठ॥ महाएकहोईलअरिष्ट॥ नगरलोकपावतीलकष्ट ॥ खेदउत्कटकरितील॥ ३९॥ हानरवीरपंचानन॥ प्रेमेंपाळीलपितृवचन॥ मग स्त्रीसंमवेतकानन॥ चतुर्दशवर्षेंसेवील॥ ४०॥ हानसतांआश्रमांत॥ एकराक्षस येईलअकस्मात॥ याचेस्त्रियेसीनेईलसत्य॥ षण्मासपर्यंतनिर्धारें॥ ४१॥ मग स्त्रीशोधितांअरण्यांत॥ वानरमिळतीलअकस्मात॥ एकवानरउन्मत्त॥ त्यास मारीलनकळतां॥ ४२॥ ब्रह्मांडनाचवीलनखाग्रीं॥ ऐसाएकवानरकेसरी॥ जाळू- नियांलंकापुरी॥ महाप्रळयकरील॥ ४३॥ शुद्धीआणितांराघवेंद्र॥ पाषाणींपाळाणी लसमुद्र॥ शरणयेईलएकरजनीचर॥ चिरंजीवकरीलत्यासी॥ ४४॥ मारूनिराक्षसां सकळां॥ सोडवीलसुरांच्याबंदिशाळा॥ मागुतीयेईलस्वस्थळा॥ अयोध्यापुरा गजरेंसीं॥ ४५॥ अकरासहस्त्रसंवत्सर॥ राज्यकरीलराजेंद्र॥ पुढेंपुत्रांसींयु द्धथोर॥ करीलकौतुकेंकरूनियां॥ ४६॥ शेवटींअयोध्याविमानींघालोनी॥ नेऊनठेवीलवैकुंठभुवनीं॥ ऐसेंजातकऐकोनकर्णीं॥ रायदशरथतोषला॥ ४७॥ स्तनपानकरितांरघुनंदन॥ पाहेवसिष्ठाकडेपरतोन॥ कींवाल्मीकभाष्यसंपूर्ण॥

कथिलें येणें अवलीलें ॥ ४८ ॥ तों सुमित्रेसी झाला पुत्र ॥ म्हणोनि धांवत आले वि प्र ॥ क्षीराब्धीहूनि श्रीधर ॥ कौसल्येमंदिरीं पावला ॥ ४९ ॥ तंव भोगींद्र पाठ घेत ॥ पाठिराखा पावला त्वरित ॥ सुमित्रेचे शेजे निजत ॥ बाल्यदशा धरूनियां ॥ ३५० ॥ सुमित्रा स्वप्न देखत ॥ कीं मज झाला सुलक्षण सुत ॥ सावध होऊनियां पाहत ॥ पुढें खेळत बाळक तो ॥ ५१ ॥ ऐसा झाला सुमित्रानंदन ॥ विप्रांसह दशरथ तेथें येऊन ॥ तत्काळ केलें पुण्याहवाचन ॥ जातकर्म सर्वही ॥ ५२ ॥ कैकेयीस झाले दोन कुमर ॥ ते विष्णूचे शंखचक्र अवतार ॥ परी कैसे जन्मले तो विचार ॥ कैकेयीस नेणवे ॥ ५३ ॥ सुषुप्तीमाजी कैकेयी निमग्न ॥ जैसा पंकगर्तेंत पाषाण ॥ पुत्र होऊनि दोघेजण ॥ दोहीं बाजूंस खेळती ॥ ५४ ॥ दासी येऊनि कैकेयीप्रती ॥ थापटोनि जागी करिती ॥ दोघे पुत्र झाले निश्चिती ॥ सावध होवोनि पाहें पां ॥ ५५ ॥ कैकेयी पाहे पुत्रमुख ॥ तों मित्र आणि मृगांक ॥ ते विंदो घे खेळती बाळक ॥ देखतां सुख वाटलें ॥ ५६ रायें तेथें हि येऊन ॥ अवलोकिले दोघे नंदन ॥ सुखी केले याचकजन ॥ वस्त्राभरणीं करूनियां ॥ ५७ ॥ बारा दिवसपर्यंत ॥ राव महोत्साह करित ॥ मंगळतुरें गर्जत ॥ रात्रंदिवस राजगृहीं ॥ ५८ ॥ तेरावे दिवसीं वसिष्ठऋषी ॥ नामकरण ठेवी चौघांसी ॥ कौसल्येचा राम तेजोराशी ॥ वैकुंठवासी जगदात्मा ॥ ५९ ॥ सुमित्रेचा जो नंदन ॥ त्याचें नाम ठेविलें लक्ष्मण ॥ जो काद्रवेयकुळभूषण ॥ विष्णु शयन ज्यावरी करी ॥ ३६० ॥ कैकेयीचे जे कां सुत ॥ भरत शत्रुघ्न निश्चित ॥ चौघे दाशरथी विख्यात ॥ ऐका चरित्र तयांचें ॥ ६१ ॥ ज्यांची जन्मकर्मलीला ऐकतां ॥ पळती सर्व दुरितां ॥ जैसा महाप्रभंजन सुटतां ॥ जळदजाळ वितळे पैं ॥ ६२ ॥ श्रीरामकथा मानससरोवर ॥ तुह्मी श्रोते हंस चतुर ॥ साहित्य मुक्तें सुढाळ थोर ॥ सेवा निरंतर आवडीं ॥ ६३ ॥ श्रीरामकथा सुधारस ॥ तुह्मीं पंडित श्रोते त्रिदश ॥ प्राशन करा सावकाश ॥ अति सुरस ग्रंथ हा ॥ ६४ ॥ पुराणपुरुष परात्पर ॥ तो ब्रह्मानंद श्रीधर ॥ अयोध्येंत अवतरला साचार ॥ त्याचें चरित्र परिसा हो ॥ ३६५ ॥ ॥ इति श्रीरामजन्मकथा समाप्ता ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥




## श्रीहनुमंतजन्मकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ ॥ तुह्मीसंतश्रोतेजन॥ऐकाहनुमंतजन्मकथन॥सांग तसेंविस्तारून॥श्रीगुरुकृपेंकरूनियां॥१॥पूर्वीकेसरीनामेंवानर॥ त्याचीस्त्री अंजनीसुंदर॥ऋष्यमूकपर्वतींघोर॥तपकरीतबैसली॥२॥सातसहस्रवर्षेपर्यंत ॥मौनधरोनिशुचिष्मंत॥आराधिलाउमाकांत॥प्रसन्नहोयतपांतीं॥३॥ह्मणेअंज नीमागइच्छित॥येरीह्मणेदेईअक्षय्यसुत॥परमप्रतापीयशवंत॥महाभक्तवज्र देही॥४॥मगबोलेउमावर॥अकरावाजोमहारुद्र॥तुझेउदरींतोअवतार॥ धरील अक्षय्यजाणपां॥५॥ऐकेंशुभवचनअंजनी॥तूंअंजुळीपात्रपसरूनी॥बैसें सावधमाझेध्यानीं॥अंतर्दृष्टीकरोनियां॥६॥स्फटेलअद्भुतप्रभंजन॥ साक्षात् लोकप्राणेशआपण॥प्रसाददेईलआणोन॥ तोतूंभक्षींअविलंबें॥७॥स्वस्थ जाहलाशूलपाणी॥ व्रतस्थबैसलीअंजनी॥नयनझांकोनिनिजमनीं॥ब्रह्मानंदें उंचंबळे॥८॥इकडेअयोध्यानगरांत॥ सूर्यवंशीरावदशरथ॥पुत्रकामेंयज्ञक रीत॥समर्थऋषीमिळवोनी॥९॥यज्ञहोतांचिपरिपूर्ण॥संतोषोनिअग्निनारा यण॥स्वहस्तेंपायसपात्रभरून॥देताझालाशृंगीपासीं॥१०॥ह्मणेराणियांसीं द्यावेंभक्षणा॥पूर्णहोईलमनकामना॥ऐशादेऊनिआशीर्वचना॥त्रिचरणगुप्त जाहला॥११॥वसिष्ठकरूनिविभाग॥राणियांसीदेतसवेग॥कौसल्येसीदेतां

श्रेष्ठभाग ॥ क्रोधआलाकनिष्ठेतें ॥ १२ ॥ ह्मणेमीरायासीप्रियकर ॥ म्यांरथचक्रींघालोनिकर ॥ रणींविजयीकेलानृपवर ॥ इंद्रादिदेवांदेखतां ॥ १३ ॥ मजआधींनदेतांमान ॥ कायकरावाभागमागून ॥ ह्मणोनिकेकेयीरुसोन ॥ अधोवदनबैसली ॥ १४ ॥ मगबोलेवसिष्ठमुनी ॥ विघ्नहोईलयेचक्षणीं ॥ तंवकरींचापिंडझडपोनी ॥ घारीनेंनेला अकस्मात ॥ १५ ॥ मगतीघारगगनपंथें ॥ जातअसतांप्रचंडवातें ॥ आसडुनियांत्यापिंडातें ॥ मुखांतूनिपाडिला ॥ १६ ॥ तोपिंडअंजनीच्याकरांत ॥ येऊनिपडिला अकस्मात ॥ तंवतीतत्काळभाक्षित ॥ शिवस्मरण करूनियां ॥ १७ ॥ घारीतेदेवांगनापहिली ॥ पूर्वींनृत्यकरितांचांचरीगेली ॥ मगविधीनेंशापिली ॥ घारीहोईह्मणोनी ॥ १८ ॥ मगनेसुवर्चस्नानामेंदेवांगना ॥ लागेकमलोद्भवाचेचरणां ॥ विधीह्मणेदशरथराणा ॥ अयोध्येचानृपवर ॥ १९ ॥ मखसमयींपिंड झडपितां ॥ उद्धरसीतूं तत्वतां ॥ अंजनीकरींपिंडपडतां ॥ निजस्थानातूंयेसी ॥ २० ॥ असोघारीब्रह्मवरदेंकरुनी ॥ उद्धरोनिपावलीस्वस्थानीं ॥ इकडे नव मास भरतांअंजनी ॥ प्रसूत झालीतेधवां ॥ २१ ॥ ऋषिपल्यापाहतीतेवेळां ॥ बळियांतोपुत्रजन्मला ॥ कींवासरमणीप्रकटला ॥ वानरवेषेंदेदीप्य ॥ २२ ॥ विद्युत्प्रायकुंडलें झळकती ॥ गंडस्थळींपडलीदीप्ती ॥ दृढकौपीननिश्चिती ॥ कटिप्रदेशींमौंजीझळके ॥ २३ ॥ तळपतसेयज्ञोपवीत ॥ ऐसेंवानररूपअद्भुत ॥ मुखींपुच्छाग्रींआरक्त ॥ वर्णदिसतप्रवाळसम ॥ २४ ॥ क्षुधाक्रांतपरमबाळ ॥ चहूंकडेपाहेचंचळ ॥ तोंअंजनीउतावेळ ॥ फळेंगेलीआणावया ॥ २५ ॥ रुदनकरितक्षुधितबाळ ॥ तोंआरक्तदिसेसूर्यमंडळ ॥ ह्मणेहेंउत्तमदिसेलफळ ॥ उडेचपळमारुती ॥ २६ ॥ पिंजारिल्यारोमावळी ॥ सिंहनादेंगर्जेनिराळीं ॥ दिग्गजांचीबैसलीटाळी ॥ आंदोळलीवसुंधरा ॥ २७ ॥ स्फुरणदाटलेंथोर ॥ गाजवीपुच्छाचाफडत्कार ॥ मागेंअंगवातेंतरुवर ॥ उन्मळोनिजातीआकाशीं ॥ २८ ॥ चपळपदद्वयतसेचहस्त ॥ प्रतापेंझेंपावेगगनांत ॥ उड्डाणावरीउड्डाण घेत ॥ जातआदित्यालक्षूनी ॥ २९ ॥ कींउर्वीवरूनिसुपर्ण ॥ जायवैकुंठपीठलक्षोन ॥ तैसाचअंजनीहृदयरत्न ॥ भूमंडळाआटोपी ॥ ३० ॥ मनोवेगासिमागेंटाकुनी ॥ हनुमंतवेगेंजायगगनीं ॥ तोंलोकप्राणेशधांवुनी ॥ धरीनह्मणेस्वपुत्रा ॥ ३१ ॥ परमतीव्रसूर्यमंडळ ॥ तेजेंआहाळेलमाझेंबाळ ॥ ह्मणोनि

धरूंपाहेअनिळ॥ परीतोचपळनाटोपे॥३२॥ मंगहिमाचळाचेशीतळांबुकण॥ मागू निशिंपीप्रभंजन॥ हनुमंतमुखपसरून॥ सूर्याजवळीपातला॥३३॥ तोंतेदिव्र- सींसूर्यग्रहण॥ राहूआलामुखपसरून॥ मारुतीसक्रोधआलादारुण॥ सिंहिका सुतादेखतां॥३४॥ ह्मणेमीअत्यंतक्षुधित॥ फळभक्षावयाआलोंयेथ॥ हाकोण आलाअकस्मात॥ यासाआडमाझिया॥३५॥ सबळपुच्छघायेंकरून॥ फोडि- लेंराहूचेंवदन॥ भिरकाविलापायींधरून॥ मूर्च्छायेऊनपडिलातो॥३६॥ जैसेशुंडा दंडेंकरूनिदेख॥ जगविदारीबिडालक॥ कीं भुजंगाचेकचेंतमूषक॥ अकस्मातसां पडे॥३७॥ राहूचेकैवारेंकेत॥ कपीवरीआलाधांवत॥ जैसाकेसरीपुढेंजंबुकयेत॥ आपुलेंमरणविसरूनी॥३८॥ केनूदेखतांहनुमंत॥ नयासीओपीमुष्टिघात॥ आं गचुकवोनित्वरित॥ केतूतेथूनिपळाला॥३९॥ मगराहूआणिकेत॥ इंद्रापासींआ- लेधांवत॥ अश्रुढेंनाहाल्लेपर्वत॥ सिंदूरेंकरूनजैसेकां॥४०॥ इंद्रासिवदती दोघे जण॥ हेसुरेशसहस्रनयन॥ आह्मावरीकोपधरून॥ हेंकांविघ्नमांडिलें॥४१॥ पुच्छनामाराहूकरून॥ आह्मावरीदीधलापाठवून॥ आश्चर्यकरीशचीरमण॥ ह्मणेहेंकर्तृत्वकोणाचें॥४२॥ कोणीकेलीविपरीतकरणी॥ त्याससंहारावयावज्र पाणी॥ त्रिदशसमुदायघेउनी॥ वायुवेगेंपातला॥४३॥ राहूपुढेंधांवत॥ मागेंदे वांसहअमरनाथ॥ तोंइकडेअंजनीसुत॥ सूर्यायासूंधांवतसे॥४४॥ चळचळां कांपेमित्र॥ ह्मणेहाकैंचाआलाअमित्र॥ दिनमानसोडोनिदिनकर॥ पळोंनला हेसर्वथा॥४५॥ प्रतापरुद्रमारुती॥ सूर्यमंडळधरिलेंहातीं॥ हेंफळनव्हेनि- श्चितीं॥ ह्मणोनिपुढती टाकिलें॥४६॥ जैसाकेवळवडवानळ॥ तैसेंदेदीप्यमा नसूर्यमंडळ॥ फळनव्हेह्मणोनिअंजनीबाळ॥ टाकिताझालापुढती॥४७॥ मा घाराप हेपरतोन॥ तोंराहूआलाशक्रासघेऊन॥ पुढतीक्रोधआलादारुण॥ ह्म णेआतांनसोडींयासी॥४८॥ साह्यघेऊनअमरपती॥ मजवरीआलापुढती॥ जै सेंशलभमिळोनियेती॥ कल्पांतविजूधरावया॥४९॥ ऐसेंबोलत वायुनंदन॥ राहूवरीलोटलायेऊन॥ इंद्रादेखतांनाडण॥ राहूसिकेलेंबहुसाल॥५०॥ जैसापर्व तपडेअकस्मात॥ तैसाराहूसीदेमुष्टिघात॥ ग्रहपूजायथासांगतेथ॥ वायुसु नेंमांडिली॥५१॥ राहूआक्रोशेंफोडीहांका॥ ह्मणेकायपाहसीअमरनायका॥ म

गशक्रें ऐरावत देख ॥ अकस्मात प्रेरिला ॥ ५२ ॥ निकडे धांवे ऐरावत ॥ तिकडे मारें ऊ र्वीलघत ॥ कीं दुसरा मेरु मूर्तिमंत ॥ शक्राचें वहन पैं झाला ॥ ५३ ॥ तो सबळ लोटला ऐरावती ॥ चपळ धांवला वीर मारुती ॥ जैसा वज्रघात पर्वतीं ॥ तैसा कुंभस्थळीं ताडि ला ॥ ५४ ॥ धाकें ऐरावत तो पळे ॥ मग पाकशासन ते वेळे ॥ हस्ति आकर्षितां नाकळे ॥ रान घेत उंबळें ची ॥ ५५ ॥ जेसी दुर्बळाची स्त्री नष्ट बहुत ॥ तीन मानी त्याचा वचनार्थ ॥ तैसा इंद्रासी ऐरावत ॥ नाटोपेची सर्वथा ॥ ५६ ॥ असो विचार करूनि महंत ॥ कामक्रोध जेसे आवरित ॥ तैसा सहस्राक्षें ऐरावत ॥ पुढती समोर आणिला ॥ ५७ ॥ मागुती धांवे पवनसुत ॥ धरी ऐरावताचे चारी दंत ॥ उलथोनि खालीं पाडित ॥ शक्रासहित ते धवां ॥ ५८ ॥ हस्तचपेटें हाणोनि ते वेळीं ॥ शक्राचा किरीट पाडिला भूतळीं ॥ सकळ देवसेना ते काळीं ॥ झाली पाहीं भयभीत ॥ ५९ ॥ इंद्राची झोंटी मोकळी ॥ मागुती ऐरावत आकळी ॥ हनुमंतावरी बळें चि घाली ॥ गज न घाली पद पुढें ॥ ६० ॥ गज पळे रानोरान ॥ परम घाबरा सहस्रनयन ॥ तों यम हस्तीं दंड घेऊन ॥ हनुमंतावरी उठावला ॥ ६१ ॥ यमें दंड प्रेरिला ते वेळे ॥ मारुतीवरी कोसळे ॥ मुष्टिघात हृदयीं दीधले ॥ यम पाडिला धरणीवरी ॥ ६२ ॥ वक्षस्थळीं बळें घोनि हनुमंत ॥ पुढती मुष्टिघात प्रेरित ॥ हातींचा दंड हिरूनि घेत ॥ तेणें चि ताडित तयासी ॥ ६३ ॥ यमें धरिले मारुतीचे चरण ॥ ह्मणे मी तुजला अनन्य शरण ॥ मग हस्त हृय जोडून ॥ करी स्तुती मारुतीची ॥ ६४ ॥ कुबेर धांवोनि ते समयीं ॥ लागे मारुतीचे पायीं ॥ तों ऐरावतारूढ शक्र पाहीं ॥ लागवेगें पातला ॥ ६५ ॥ ऐसें देखोनि ते अवसरीं ॥ मारुती धांवे शक्रावरी ॥ ऐरावताचें पुच्छ धरी ॥ पृथ्वीवरी आपटावया ॥ ६६ ॥ पुच्छ धरूनि भोवंडी गज ॥ तों कांपती सर्व दिग्गज ॥ अवनीवरी देवराज ॥ वज्रासह पडियेला ॥ ६७ ॥ बळें गज आपटी धरणीं ॥ देवांसहित पळे वज्रपाणी ॥ कडेकपाटीं जाउनी ॥ महायोद्धे लपाले ॥ ६८ ॥ ह्मणती पृथ्वी गेली रसातळा ॥ एकचि हाहाकार झाला ॥ मग अमरेंद्र ते वेळां ॥ अवसान धरी पुढती ॥ ६९ ॥ वज्रबळें अखंडित ॥ मुखावरी ताडितां हनुमंत ॥ तेणें मूर्च्छा दाटली बहुत ॥ पडे वायुसुत पृथ्वीवरी ॥ ७० ॥ कनकाद्रीवरून कोसळला ॥ पर्वतदरीमाजी पडिला ॥ लोकप्राणेश धांविन्नला ॥ सुत धरिला पोटासीं ॥ ७१ ॥ कासावीस या

युनंदन ॥ विकळपडिलाअचेतन ॥ वायुकरीतसेस्फुंदन ॥ पुढें घेऊनहनुमंता ॥ ७२ ॥ ह्मणेदुर्जनहाअमरेंद्र ॥ तान्हयावरीघातलेंवज्र ॥ परमनिर्दयपुरंदर ॥ करीनसंहारतयाचा ॥ ७३ ॥ माझेतान्हयाचाजातांप्राण ॥ आटीनसकळत्रिभुवन ॥ प्रल्हादाकारणेंसंपूर्ण ॥ नृसिंहजैसादैत्यआटी ॥ ७४ ॥ वायुआधीनसकळांचेप्राण ॥ आकर्षितनलगतांक्षण ॥ श्वासोच्छ्वासकोंडून ॥ त्रिभुवनकेलेंकासाविस ॥ ७५ ॥ मगचंद्रविरिंचीसकळनृपवर ॥ रमावरआणिउमावर ॥ सकळप्रजाऋषीश्वर ॥ शरणआलेवायूतें ॥ ७६ ॥ पोटासीधरूनहनुमंत ॥ वायुदीर्घस्वरेंरडत ॥ तोंब्रह्मादिदेवसमस्त ॥ प्राणनाथेंदेखिले ॥ ७७ ॥ हनुमंतासिकडे घेऊनी ॥ उभाराहेतेक्षणीं ॥ तीनीदेवदेखोनिनयनीं ॥ नमस्कारीतेधवां ॥ ७८ ॥ मगबोलेकमळासन ॥ पुत्राचाकेवारघेऊन ॥ अवघीप्रजानिर्दाळून ॥ टाकिसीकायप्राणेशा ॥ ७९ ॥ येरूह्मणेनउठतांमाझासुत ॥ इंद्रादिदेवअवघेसमस्त ॥ निर्दाळीनह्मणतांवैकुंठनाथ ॥ वरदेतसंतोषोनी ॥ ८० ॥ पूर्णपिंडाचाहनुमंत ॥ यासीस्वप्नींहीनाहींमृत्य ॥ ब्रह्मकल्पपर्यंत ॥ चिरंजीवपुत्रतुझा ॥ ८१ ॥ मगबोलेकर्पूरगोर ॥ माझ्यातृतीयनेत्रींचावैश्वानर ॥ सर्वजाळीलसाचार ॥ परीयासीबाधीना ॥ ८२ ॥ माझींत्रिशूळादिआयुधेंतत्वतां ॥ तींनबाधितीयासीआतां ॥ मगविरिंचीझालाबोलता ॥ निजवरदानऐकातें ॥ ८३ ॥ माझाब्रह्मशापआणिपाश ॥ कदा न बाधितीलयास ॥ माझींशस्त्रेंबहुवस ॥ तींहीयातेंनबाधिती ॥ ८४ ॥ मगइंद्रसत्वरदेतवर ॥ माझेंयासीनबाधेवज्र ॥ हावज्रदेहीसाचार ॥ अक्षयअभंगसर्वदा ॥ ८५ ॥ हनुवटीसझळकलेंवज्र ॥ यासहनुमंतनामसाचार ॥ कुबेरह्मणेबहुतअसुर ॥ क्षयपावतीहस्तेंयाच्या ॥ ८६ ॥ यमदेतसेवरदान ॥ यासकाळत्रयींनबाधीदंडपूर्ण ॥ याचेंकरितीजेनामस्मरण ॥ त्यांसीबंधननकरींमी ॥ ८७ ॥ मगबोलेरसाधिपती ॥ अक्षयअसोयासशक्ती ॥ कधींश्रमीनसेमारुती ॥ युद्धकरितांबहुसाल ॥ ८८ ॥ दिव्यकमळांचीसुमनमाळ ॥ नस्केलोटतांबहुकाळ ॥ तीविश्वामित्रेंगळांतत्काळ ॥ घातलीतेव्हांमारुतीचे ॥ ८९ ॥ समस्तीं देऊनिवरदाना ॥ देवगेलेआपुलेस्थाना ॥ वायूनेंहनुमंततेक्षणां ॥ अंजनीजवळआणिला ॥ ९० ॥ मारुतीसहृदयींधरूनी ॥ स्फुंदस्फुंदोनिरडेजननी ॥

सुखामाजीस्तनघालोनी ॥ वदनकुंरवाळीतेवेळां ॥ ९१ ॥ ऐसेंहनुमंतजन्मकथन ॥ अतिरसाळकरितांश्रवण ॥ सकळविघ्नेंजातीपळोन ॥ क्षणमात्रनलगतां ॥ ॥ ९२ ॥ ॥ इतिश्रीहनुमंतजन्मकथासमाप्ता ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥




## श्रीपरशुरामजयंतीकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ओंव्या ॥ श्रीवैकुंठविलासीनारायणा ॥ भवगजविदारकपंचानना ॥ भक्तरक्षकादुष्टदलना ॥ नानाअवतारतूंधरिसी ॥ १ ॥ तूंचिपरशुरामहोसी ॥ संहारूनीक्षत्रियांसी ॥ ब्राह्मणांचासाह्यकारीहोसी ॥ भक्तजनतारावया ॥ २ ॥ तुझेंचरित्रवर्णनकरावें ॥ ऐसेंमनींधरिलेंभावें ॥ परीममसुखेंबोलवावें ॥ हेंचिआतांमागतों ॥ ३ ॥ श्रीनवमस्कंधींभागवतीं ॥ पंचदशाध्यायींरायाप्रती ॥ श्रीशुकाचार्यकथासांगती ॥ तद्भावऐकासज्जनहो ॥ ४ ॥ सावधानकरूनिअंतःकरण ॥ श्रीरामजन्मकथाकरितांश्रवण ॥ चुकेजन्ममरणाचेंभ्रमण ॥ सत्यसत्यत्रिवाचा ॥ ५ ॥ सोमवंशींगाधिनृपती ॥ त्याचीकन्यासत्यवती ॥ तीतेंऋचीकभार्गवमागती ॥ गाधिगृहींयेउनी ॥ ६ ॥ ह्मणतीआह्माविवाहकरणें ॥ हेचिकन्यादानअर्पणें ॥ ऐकोनिगाधीअनमानपणें ॥ विचारकरीमनांत ॥ ७ ॥ आर्या ॥ मत्कन्येलावरहा योग्यनसेयासकायसांगावें ॥ यालाकधींहिनमिळे दुस्तरऐसेंचिशुल्कमागावें ॥ ८ ॥ श्रीभागवत श्लोक ॥ एकतःश्यामकर्णानां हयानांचंद्रवर्चसाम् ॥ सहस्रंदीयतांशुल्कं कन्यायाःकुशिकावयम् ॥ ९ ॥ ओंव्या ॥ एकसारिखेश्या

मकर्ण॥सहस्रअश्वदेतीलतूर्ण॥तरीचतुझांमनोरथपूर्ण॥होईलनिश्चयेंहि जवर्या॥१०॥आह्मीथोरकौशिकधन्य॥इतुकेनहीनसोमान्य॥परंतुतुह्मी. सत्पात्रब्राह्मण॥ह्मणोनिमान्यजाइलों॥११॥इतुकेंऐकोनि तोनपोज्योती॥गेला-सत्वरवरुणाप्रती॥वरुणेंनमोनिअतिप्रीतीं॥उच्चासनींबैसविला॥१२॥पूजाकरू-निविनवीवरुण॥स्वामीयेण्याचेंसांगाकारण॥जेंइच्छितअसेलआपुलें मन॥तेम जआज्ञाकरावी॥१३॥विप्रह्मणेविवाहयोजिला॥सहस्रश्यामकर्णदेई मजला॥ तोशब्दवरुणेंमस्तकींवंदिला॥अश्वसहस्रदीधले॥१४॥ **आर्या** ॥ ज्यांच्या दर्शनयोगें पुण्यघडेपापजायहोपरतें॥हरिलामान्यअसेजे कायउणेंत्याहि जांसइहपरतें॥१५॥ **ओंव्या** ॥भार्गवेंआणूनिरायाप्रती॥ देऊनिवरिलीसत्य वती॥अतिहर्षेविवाहपद्धती॥गौरविलाऋषीरायानें॥१६॥आपुल्याआश्र-मींऋषिवर्ततां॥ सत्यवतीसहसत्यवतीचीमाता॥उभयाह्मणतीऋषिसमर्था ॥पुत्रव्हावेआह्मांतें॥१७॥ऐकोनिभार्गवेंचरूदोनी॥ सिद्धकेलेअभिमंत्रुनी ॥ श्वश्रूचाक्षात्रमंत्रेंकरूनी॥ब्राह्ममंत्रेंस्वस्त्रीचा॥१८॥ ऐसेदोनचरूदोघींसी॥ दावुनीगेलेऋषीस्नानासी॥तंवतेमाताकल्पीमानसीं॥ कन्येचावरिष्ठअसेल ॥१९॥ **आर्या** ॥ याभावेंकन्येला तवचरुमजदेअसेंचितेवदली॥वदलिति परस्परेंमग तीचाहीतीहिचाचरूअदली॥२०॥ **ओंव्या** ॥ बैसंतीप्रसादभ क्षुनी॥तंवऋषीआलेस्नानकरूनी ॥ पाहतीध्यानींविचारूनी॥ ह्मणतीवि परीतकेलेंतगे॥२१॥ स्त्रियेसीह्मणतीदंडधर॥ पुत्रहोईलतुजभयंकर॥भ्राता ब्रह्मज्ञचतुर॥ प्रसवेलतवमाता॥२२॥ऐकोनिप्रार्थीसत्यवती॥मजपुत्रव्हावा महामती॥संतोषोनिऋषीह्मणती ॥दंडधरहोईलतवपुत्र॥२३॥ ब्राह्ममंत्रें चरुजोमंत्रिला॥ तोकन्येचामातेनेंभक्षिला॥ तिलापुत्रविश्वामित्रझाला॥ वेगळीकथातेअसे॥२४॥ नवमासहोतांसत्यवती ॥ झालीपुत्रातेंप्रसवती ॥त्यालाजमदग्नीअसेंह्मणती॥ सप्तऋषींच्यामंडळीं ॥२५॥ सत्यवती झालीसरिता॥कौशिकीनामेंलोकविख्यता॥जीच्याजलेंस्नानपानकरितां ॥पुनर्जन्मनविद्यते॥२६॥ रेणुकारेणूचीदुहिता॥तेजमदग्नीचीहोयकांता॥ तिच्यापुत्रांतकनिष्ठता॥ धरितेझालेभगवान॥२७॥ रेणुकागर्भवतीजा-

हली ॥ तेजें जैसी वीज प्रकटली ॥ अंतरखुणा ऋषी सकळली ॥ डोहळे का
यु विचारिती ॥ २८ ॥ येरी ह्मणे शस्त्र धरूनी ॥ निःक्षत्री करावी सर्व अवनी ॥
गोब्राह्मण प्रतिपाळुनी ॥ मग तपश्चर्या करावी ॥ २९ ॥ ऐसें इच्छी माझें मानस ॥
ऐकोनि ऋषी पावे संतोष ॥ तंव भरले नवमास ॥ प्रसूतिसमयो पातला ॥ ३० ॥
आर्या ॥ प्रगटेल राम येथें ह्मणुनी विधि इंद्र चंद्र सूर्यादी ॥ ऋषिगणाही त्या
समयीं स्तविती येऊनि रेणुका आदी ॥ ३१ ॥ श्लोक ॥ त्यानंतरें स्तवि
ति गर्भ कर हि जाला ॥ त्यानंतरें सगुण गर्भगता अजाला ॥ देव स्तुती करुनि
आपुलिया पदांतें ॥ जाती हरी ळवदती सकलाऽपदांतें ॥ ३२ ॥ ओंव्या ॥ वै
शाख शुद्ध पक्षीं तृतीया ॥ पावतां आदित्य अस्तसमया ॥ रेणुका जमदग्नीची जा
या ॥ पुत्ररत्नातें प्रसवली ॥ ३३ ॥ देव दुंदुभी वाजविती ॥ पुष्पवृष्टी बहु करिती ॥
थैथै या अप्सरा नाचती ॥ संगीत गाती गंधर्व ॥ ३४ ॥ मंद मंद गर्जे सागर ॥ सुगं
धवाहे मंद समीर ॥ सज्जनमनातें आनंद अपार ॥ होता झाला ते काळीं ॥ ३५ ॥ सू
तिकागृहीं तेज फांकलें ॥ जमदग्नीनें पुत्रावण केलें ॥ ऋषिपत्न्यांहीं न्हाणें घातलें ॥
ऐसा उत्साह बहु केला ॥ ३६ ॥ जाता शौच फिटत्यावरी ॥ बालक घालोनि पालखांत
रीं ॥ मंजुळ स्वरें गाती नारी ॥ रामनाम ठेवूनियां ॥ ३७ ॥ आर्या ॥ अवतरला हा-
श्रीपति धरुनी व्यक्ती मनुष्य देहाची ॥ दंडुनि दुष्टजनांतें पद दासां भुक्तिमुक्ति
देहाची ॥ ३८ ॥ ओंव्या ॥ अनंतकोटिब्रह्मांडनायका ॥ पाळण्यांत घालूनि-
बायका ॥ जोजो ह्मणती आश्चर्य ऐका ॥ हे सर्व लीला तयाची ॥ ३९ ॥ वस्त्राभरणें
पूजूनि रामा ॥ सच्चिदानंदा मेघश्यामा ॥ भक्त ह्मणती आत्मारामा ॥ नारायणा
कृपा करीं ॥ ४० ॥ हें परशुरामजन्मचरित्र ॥ श्रोत्या वक्त्यां करी पवित्र ॥ आपुली
लीला विचित्र ॥ नारायण स्वयें वदे ॥ ४१ ॥ ॥ इति श्रीपरशुरामजयंतीक
थासमाप्त ॥ ॥ श्रीपरशुरामार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥




## श्रीनृसिंहजयंतीकथाप्रारंभः

श्रीगंणेशायनमः॥ श्रीनृसिंहायनमः॥जयजयाजीलक्ष्मीपती॥जयजया जीउदारकीर्ती॥अवतारधरूनिसर्वजगती॥निशल्यकरिसीजगदीशा॥१॥ब्र ह्मयाचेहरितांवेद॥क्षीणझालेमानवविबुध॥मत्स्यअवतारतूंगोविंद॥घेऊनिशं खाबधियेलें॥२॥कूर्मअवतारधरूनिसुलभ॥महाकपटीमधुकैटभ॥वधूनिभक्तां फरिसीलोभ॥ब्रह्मांडस्तंभतूंहोसी॥३॥हिरण्याक्षमहाअसुर॥तेणेंसकळांके- लेंजर्जर॥ह्मणोनिवराहअवतार॥धरूनिदंतेंरगडिलें॥४॥हिरण्यकशिपूमदो- न्मत्त॥पुत्रप्रऱ्हादगांजितांभक्त॥स्तंभींप्रकटोनिकेलाअंत॥नरहरिरूपेंजगदीशा ॥५॥वामनावतारधरूनिबळी॥दानमागूनिघातलापाताळीं॥ वरदेऊनितूंवन माळी॥द्वाररक्षिसीतयाचें॥६॥परशुहस्तींघेऊनिक्रूर॥तीनसप्तकेंनिवटिले असुर॥मातृकैवारेंधराभार॥परशुरामाफेडिसी॥७॥श्रीरामअवतारधरूनि सकळ॥समूळनाशिलेंराक्षसकुळ॥रावणवधूनिलंकापाळ॥बिभीषणकेलाकृ पेनें॥८॥कृष्णावतारधरूनिसुरस॥गौळियाघरींभाक्षिसीगोरस॥सेरवींवधिला कपटीकंस॥गोपीउदासभोगिसी॥९॥कलियुगींच्यापापिष्ठजना॥देखूनिकं टाळाउपजेमना॥ह्मणोनिबौद्धनारायणा॥होऊनिभक्तांरक्षिसी॥१०॥पापभ यपावूनिधरा॥शरणजातांसर्वेश्वरा॥तियेचीकरुणालक्ष्मीवरा॥येतांकलंकी

होसीतूं ॥ ११ ॥ नानाचरित्रेंनानारचना ॥ तूंचिदाविशीलक्ष्मीरमणा ॥ शंकर ईश हीकल्पना ॥ भेदकर्तेबोलती ॥ १२ ॥ परीपूर्णरूपीपूर्णानंद ॥ कोणतयासीकल्पी भेद ॥ ममपानसीतूंगोविंद ॥ सर्वदावसेंचिरकाळ ॥ १३ ॥ पद्मपुराणखंडउत्तर ॥ नारदासीसांगेचतुर्वक्त्र ॥ तीहीकथासविस्तर ॥ श्रवणकरींऋषिवर्या ॥ १४ ॥ पूर्वीहिरण्यकशिपूदैत्य ॥ असुरकुळींविख्यात ॥ तपसाधनकरूननित्य ॥ विजयीझालात्रिभुवनीं ॥ १५ ॥ स्वर्गभूपाताळभुवनीं ॥ राज्यचालवीएकासनीं ॥ पुण्यमार्गसमग्रअवनीं ॥ यज्ञयागादिमोडिले ॥ १६ ॥ कयाधूनामेंतयाचीसती ॥ पतिव्रतासुंदरयुवती ॥ ऋतुकाळींगर्भवती ॥ पतिसंयोगेंजाहली ॥ १७ ॥ नवमासभरतांपूर्ण ॥ पोटींउपजलेंपुत्रनिधान ॥ जातकर्मादिसंपादून ॥ प्रल्हादनामठेविलें ॥ १८ ॥ शुक्लपक्षींवाढेशशी ॥ तैसावाढेदिवसमासीं ॥ ऐसींपंचवर्षेंबाळकासी ॥ भरतांपिताविचारी ॥ १९ ॥ दैत्यकुळींआत्मकुमरू ॥ विद्याभ्यासकरण्यासधुरू ॥ ह्मणोनितयायोग्यगुरू ॥ पाहोनिपढूंघातला ॥ २० ॥ गर्भींउपदेशेंप्रल्हादसुगुण ॥ सदावर्णीहरीचेगुण ॥ भक्तिभावाचेंमहिमान ॥ झालानिपुणहरिभक्तीं ॥ २१ ॥ दैत्यगुरुघालूनिपाटी ॥ ओंकारबीजसांगतांओंठीं ॥ प्रल्हादाचियेकर्णपुटीं ॥ पडतांज्ञानजाहलें ॥ २२ ॥ नकारशब्दसांगतांत्याणें ॥ ह्मणे कदापिनबोलेउणें ॥ ओंकारबीजईश्वरभजनें ॥ सार्थकझालेंजन्माचें ॥ २३ ॥ उदारातेंनकारशब्द ॥ परमअंतरींपाववीखेद ॥ सर्वव्यापीश्रीगोविंद ॥ नाहींकोठेंसांगपां ॥ २४ ॥ उत्तरऐकतांदैत्यगुरु ॥ मनींमानीचमत्कारू ॥ ह्मणेकळतांराजे-श्वरू ॥ शिक्षाकरीलमजलागीं ॥ २५ ॥ ह्मणोनिप्रल्हादाधरूनिहातीं ॥ ह्मणेकपटियासांडीमती ॥ शत्रुस्मरणेंकुशलप्राप्ती ॥ कवणाझालीसांगपां ॥ २६ ॥ येरूह्मणेशत्रुकवण ॥ सर्वव्यापीनारायण ॥ तुमचेआमचेहृदयींपूर्ण ॥ भरलाअसेसर्वदा ॥ २७ ॥ गुरुह्मणेनव्हेबरवें ॥ धाकमानिजेमाझेनिजीवें ॥ मगराजयाप्रतीसर्वभावें ॥ झालेंवृत्तनिवेदी ॥ २८ ॥ ह्मणेजीजीतुमचाकुमर ॥ तयासिझालाभूतसंचार ॥ सदासर्वदालक्ष्मीवर ॥ स्मरितोअसेएकभावें ॥ २९ ॥ बोधिल्यानायकेमाझें वचन ॥ शत्रुस्मरणींसदानिमग्न ॥ ह्मणोनिस्वामीतेंवर्तमान ॥ झालेंतेंचिकथिलें ॥ ३० ॥ गुरुउत्तरपडतांकानीं ॥ दैत्यहृदयींपेटलाअग्नी ॥ ह्मणेस्वपुत्रायेचक्षणीं

घधीनमीनिश्चयें॥३१॥दूतधाडूनआणिलासुत॥ह्मणेकांरेबोलसीविपरीत॥माझा शत्रूलक्ष्मीकांत॥तूंकांत्यातेंआठविसी॥३२॥प्रल्हादह्मणेऐकेंवचन॥सर्वव्यापीलक्ष्मीनारायण॥तूंहीत्याचेंकरितांस्मरण॥मुक्तहोसीनिर्धारें॥३३॥केंचाशत्रूकेंचा मित्र॥श्रीहरीआत्माजगींसर्वत्र॥तयावांचूनिअणुमात्र॥रिताठावनसेची॥३४॥ श्रीहरीवांचूनिएकक्षण॥मातेंनगमेगेलियाप्राण॥मातेंरक्षीनारायण॥थोरमहिमानहरीचें॥३५॥हरिनामपडतांश्रवणीं॥दैत्यकोपलाचौगुणी॥जैसाघृतेंशिंपितांअग्नी॥ज्वाळालागतीगगनातें॥३६॥मगअंतर्गृहींजाउनीनृप॥करिताझालाबहुसाक्षेप॥विषदेऊनिस्वकुळदीप॥प्रियेममाज्ञेनें मालवीं॥३७॥अवश्यह्मणूनिपतिव्रता॥अंतर्गृहींनेऊनिसुता॥ह्मणेनाठवींलक्ष्मीकांता॥येणेंतवपिताकोपला॥३८॥माझ्याहस्तेंदेतोविख॥येणेंप्राणामुकसीदेख॥पुत्रप्राप्तीचासमूळहरिख॥जाऊनिशोकमजघडे॥३९॥तरीपुत्रानकरींभजन॥सोडीमनींचेंदुष्करपण॥ह्मणूनिमातास्वकरींवदन॥स्वपुत्राचेंकुरवाळी॥४०॥महाविषभरूनिपात्रीं॥ठेवितांअश्रुलोटलेनेत्रीं॥मोहेंकंपभरलागात्रीं॥ह्मणूनिधरित्रीपडियेली॥४१॥प्रल्हादह्मणेऐकेंजननी॥उगाचखेदकांकरिसीमनीं॥त्रिभुवनींईश्वरविचित्रकरणी॥तारीनिदानींस्वभक्तां॥॥४२॥पतिवचनेंदेसीविष॥मजलावाटेबहुसंतोष॥सर्वकर्ताउत्तमपुरुष॥सर्वांघटींतोनांदे॥४३॥पूर्वींश्रियाळकांचीराजा॥चांगुणातयाचीपवित्रभाजा॥सत्वरक्षणींआपुल्याननुजा॥पतिआज्ञेनेंवधितपां॥४४॥प्रसन्नहोऊनिश्रीशंकर॥अपेक्षितचिदेतवर॥नगरासहितराजेश्वर॥पूर्णपदींस्थापिला॥४५॥तैसेंयेथेंसंकटकोण॥दासांरक्षीलक्ष्मीरमण॥ऐसेंबोलूनिविषघेऊन॥श्रीहरीह्मणूनिप्राशीतो॥४६॥अंतर्गृहींपित्याचेहेर॥देखूनिवदतीसविस्तर॥विषप्राशूनिप्रल्हादकुमर॥हर्षेंडुलेहरिनामें॥४७॥पित्ताह्मणेमत्तहस्ती॥घालूनिकरातयाचीशांती॥दैत्यकुळींस्वपुत्रकुमती॥शत्रुभजनींनिवडला॥४८॥मगदूतींहस्तीमदोन्मत्त॥उपमेऐसाऐरावत॥चौबाराउभाकरूनिसुत॥निकुरेंलोटिलातयावरी॥४९॥तंवनृहरीऐसेंबोलतांवचन॥नृसिंहझालालक्ष्मीरमण॥भक्ताभिमानेंनारायण॥तत्काळहृदयींसंचरला॥५०॥नृसिंहवदनदेखतांक

री॥ भयेंझालाअरण्यभरी॥ नगरगर्भीमहामारी॥ कित्येकअसुररगडिले॥५१॥ बरहरिनामेंप्रऱ्हादभक्त॥ घोषगाजवीब्रह्मांडांत॥ देखूनिपिताहोयचकित॥ ह्मणेविपरीतदिसतसे॥ ५२॥ आतांपर्वतपातकरूनिसुता॥ वेगेंबोळवामृत्युपंथा॥ ऐसीआज्ञाकरितांदूतां॥ आज्ञावंदूनिनिघाले॥५३॥ मगप्रऱ्हादबाळासि धरूनिहातीं॥ वेगेंपावलेदीर्घपर्वतीं॥ विशाळकडानदिसेक्षिती॥ ऐशियाशृंगीं चढविला॥५४॥ तेंसेवकह्मणतीदैत्यकुमरा॥ व्यर्थभजसीलक्ष्मीवरा॥ खालींलोटितांसमग्रचुरा॥ मेदास्थींचाहोईल॥५५॥ कपटेंविषभाक्षिलेंसहज॥ भयें पळविलेउन्मत्तगज॥ आतांकोणरक्षीलतुज॥ सांडींकाजअंतरींचें॥५६॥ इतुकेनें वांचसीक्षेमकुशल॥ तुजअंगींकेंचेंबळ॥ ईश्वरभजनीं दैत्यपाळ॥ सदासंतप्तमानसीं॥५७॥ ऐसीदूतींवदतांगोष्टी॥ कृत्रिममोहेंघातलीमिठी॥ ह्मणेभजलायेसंकटीं॥ रक्षासमग्रसेवकहो॥५८॥ ऐसेंवदतांदैत्यनंदन॥ भोंवतेमिळालेसेवकजन॥ मगजयनरहरिह्मणोनिपतन॥ सकळांसहितपावला॥५९॥ हरिनामाचींदेतां आरोळी॥ पुष्पप्रायपातलातळीं॥ सेवकांचीसकळमंडळी॥ चूर्णझालीअपसऱ्यां॥६०॥ उरलेसांगोंयेतीहेर॥ तोंपुढेंपातलादैत्यकुमर॥ आश्चर्यकरितीनारीनर॥ धाकेंअसुरकांपती॥६१॥ दैत्यकुळभूषणमणी॥ सदाडुलेनामस्मरणीं॥ दैत्यआज्ञापीसेवकांवचनीं॥ समुद्रींयासीबुडवारे॥६२॥ आज्ञाहोतांसमस्तअसुर॥ हातींधरूनिदैत्यकुमर॥ महीवसनमहासागर॥ तेथेंतत्क्षणींपातले॥६३॥ मगह्मणतीउगाचमरसीमूढा॥ कांहींबरवेंनदिसेपुढां॥ दैत्यवंशसमर्थगाढा॥ त्यातेंलांछनलाविलें॥६४॥ पर्वतमस्तकींकपटवृत्ती॥ करूनिउतरसीतळींक्षिती॥ हातोअसेसरितापती॥ जळग्रउत्पत्तीयामाजी॥६५॥ मत्स्यमकरनाडेसावज॥ गांठूनितोडितीविशाळसहज॥ नवलक्षयोनीउत्पत्तीबीज॥ सागरगर्भीविक्राळ॥६६॥ येथेंतुजलोटितांभक्षिती॥ तरीनस्मरेंकमळापती॥ राज्यभोगसकळसंपत्ती॥ चिरकाळभोगींसत्पुत्रा॥६७॥ येरूह्मणेनघडेऐसें॥ सर्वव्यापिलेंजगदीशें॥ होणारतेंचिसुखसंतोषें॥ घडेलपूर्णप्रारब्धें॥६८॥ आकाशआपअग्नीसमीर॥ सर्वत्रभरलाजगदीश्वर॥ भक्तांरक्षीललक्ष्मीवर॥ हानिर्धारमानसीं॥६९॥ ऐकूनिप्रऱ्हादाचीवाणी॥ सेवकह्मणतीनभीहामनीं॥ लोटूनिदेतांते

क्षणीं ॥ श्रीनरहरीस्मरियेला ॥ ७० ॥ उड्डाणकरितांचरणांगुष्ठ ॥ लावितांतारूं झालेंपिष्ट ॥ सागरगर्भीं श्रीवैकुंठ ॥ येऊनप्रल्हादारक्षीपैं ॥ ७१ ॥ कडेकाढिलादैत्य नंदन ॥ समुद्रींबुडालेसेवकजन ॥ उरलेराजयावर्तमान ॥ सांगोंपातलेत्वरेनें ॥ ७२ ॥ करीतहरिनामाचागजर ॥ पुढेंपातलादैत्यकुमर ॥ राजादेखतांवैश्वानर ॥ तयापरीप्रज्वळला ॥ ७३ ॥ ह्मणेकोठेंनमरेस्फुत ॥ येणेंमाझापुरविलाअंत ॥ करकराखाऊनियांदांत ॥ पुत्रावेगेंपाचारी ॥ ७४ ॥ सेवकासिह्मणेआतां ॥ अग्नीमाजीजाळणेंस्फुता ॥ येणेंमाझीआल्हादसरिता ॥ डहुळकेळीनिष्ठुरें ॥ ७५ ॥ जेसेंविशाळदरीचेंतोंड ॥ तैसेंखणूनिप्रचंडकुंड ॥ लाक्षाकर्पूरतेलपेंड ॥ काष्ठेंअपारमेळवा ॥ ७६ ॥ ऐसीआज्ञाकरितांदूतां ॥ क्षणानलागतांनिर्मिलीगर्ता ॥ नगरवासियांसमस्तां ॥ काष्ठेंमाथांवाहविती ॥ ७७ ॥ राजमंत्रीकारभारी ॥ काष्ठभारवाहतीशिरीं ॥ नाहींह्मणतांश्रीमुखावरी ॥ ताडणकरितीसेवक ॥ ७८ ॥ सेनापतीसावकार ॥ श्रेष्ठभाटथेलहानथोर ॥ ग्रामाधिकारीनारीनर ॥ काष्ठेंअपारवाहताती ॥ ७९ ॥ ज्यांहीपाहुणेआलेकोडें ॥ काष्ठेंदेऊनिघालितीपुढें ॥ विहीणयेतांदारापुढें ॥ काष्ठेंदेतीमस्तकीं ॥ ८० ॥ लग्नलावूनिनोवरानोवरी ॥ होमार्थबैसलींबोहल्यावरी ॥ सेवकयेऊनितयांचेशिरीं ॥ काष्ठेंदेतीबलात्कारें ॥ ८१ ॥ राजाश्रयेंसेवकजना ॥ ह्मणेंमीरायाचासखामेहुणा ॥ परीमुखावरीदेऊनिचडकणा ॥ काष्ठेंदेतीमस्तकीं ॥ ८२ ॥ वारांगनाकरितीनृत्य ॥ मस्तकींकाष्ठेंदेतीदैत्य ॥ मांदाळघालूनिगळ्यांत ॥ गुरवमागेंधांवती ॥ ८३ ॥ पाहुणचारकरणेंएक ॥ सोइरेधरिलेग्रामस्थलोक ॥ भोजनींबैसतांयेऊनिसेवक ॥ काष्ठेंदेतीमस्तकीं ॥ ८४ ॥ नग्नगृहींन्हातांनारी ॥ सेवककाष्ठेंदेतीशिरीं ॥ सकळह्मणतीइयेनगरीं ॥ थोरअनर्थदिसताहे ॥ ८५ ॥ काष्ठेंअपारहोमकुंडीं ॥ घालोनित्यावरीसोडितीपेंडी ॥ तैलकर्पूरअग्नितोंडीं ॥ पडतांअपारचेतला ॥ ८६ ॥ प्रळयकाळींचावैश्वानर ॥ तैसाअग्निचेतलाथोर ॥ उल्हाटयंत्रकरूनिकुमर ॥ क्रोधेंबैसवीपारड्यांत ॥ ८७ ॥ नरहरिस्मरणेंहर्षयुक्त ॥ पारड्यांतबैसलाप्रल्हादभक्त ॥ कळालाडितांनव्हेमुक्त ॥ खिळीबैसलीयंत्रानें ॥ ८८ ॥ दैत्यह्मणेकुमरानष्टा ॥ कांरेऐसियाकरिसीचेष्टा ॥ तवभागनेमिलाहव्यनाटा ॥ यंत्रमुखींकांखेळसी ॥ ८९ ॥ येरूह्मणेऐकेंउत्तर ॥ पितृकार्यकरीकु

मर॥ विपरीतझालियापुत्रापितर॥ अधिकारीशास्त्रींनेमिला॥ ९०॥ तरीस्वहस्तें त्याडीकेला॥ तेणेंउडेलयंत्रकांटाला॥ ऐसेंऐकतांआवेशआगळा॥ येऊनियं-त्रनाडिलें॥ ९१॥ आकाशमार्गेंउडालासुत॥ जाऊनिपडिलाअग्निआंत॥ नरह-रिस्मरणेंअग्निगर्भस्थ॥ जनसमस्तदेखती॥ ९२॥ अग्निगर्भीठाणमाण॥ मां-डूनिकरीकथाकीर्तन॥ देखूनिआश्चर्यकरितीजन॥ थोरमहिमानभक्तीचें ९३ तीनदिवसअग्निजठरीं॥ दिवानिशींआठवीहरी॥ चतुर्थदिवसाचेप्रथमप्रहरीं॥ बाहेरआलाहरिभक्त॥ ९४॥ ऐसेंपाहूनकयाधुजानी॥ कोपेंह्मणेसेवकांलागुनी॥ महाकटाहतेलेंभरूनी॥ तळींअग्नीपेटवावा॥ ९५॥ तेलतप्तझालियादेखा. ॥ तयामाजीमत्सुतासिटाका॥ ऐसीआज्ञाहोतांसेवकां॥ प्रल्हादाधरितीधरींते॥ ९६॥ ह्मणतीसांडीमनींचेंगुज॥ क्रोधेंखवळलादैत्यराज॥ येरूह्मणेईश्वरतेज॥ सर्वंपरीसआगळें॥ ९७॥ कवणामृत्युकवणाजय॥ कवणाहर्षकवणाभय॥ अपायतेचिहोतीउपाय॥ ईश्वरभजनेंहरिभक्तां॥ ९८॥ हरिनामपडतांकर्ण कुहरीं॥ क्रोधाग्नीपेटलादैत्येंद्रजठरीं॥ ह्मणेसत्वरमारावैरी॥ तेलकढईंतबु डवारे॥ ९९॥ तीक्ष्णशब्देंताडितांदूतां॥ तेलकढईंतलोटिलेंसुता॥ हरिनाम-स्मरणेंतेलतप्ततां॥ शीतळजाहलेंनयातें॥ १००॥ तेलकढईंतसुंदरवीणा॥ घे ऊनिस्मरेलक्ष्मीरमणा॥ मंत्रीह्मणतीअग्निउणा॥ झालाह्मणोनिवांचला॥ १ ॥ करघालूनिपहातीमूढ॥ सर्वशरीरींनिघालेफोड॥ अग्निसंगेंजैसेपापड॥ तैसें झालेंअसुरांतें॥ २॥ तेलकटाहींहरीचेगुण॥ सर्वदावर्णीभक्तराजसुगुण॥ बाहे रनिघतांसर्वांगपूर्ण॥ दिव्यझालेंहरिकृपें॥ ३॥ कुमरदेखतांदितिकुमरें॥ परमक्रो धेंकांपतीगात्रें॥ ह्मणेखंडविखंडकराशस्त्रें॥ ऐसेंवक्त्रेंआज्ञापिलें॥ ४॥ महामंत्रा च्याशरजाळीं॥ मत्कुपुत्राचीकरारेहोळी॥ वेगेंधांवासकळमंडळी॥ महाबळीपा वावेगें॥ ५॥ वचनऐकतांधांवलेअसुर॥ नानाशस्त्रींमंडितकर॥ महाशस्त्रांचे भडिमार॥ सेवकथोरकरिताती॥ ६॥ कल्पांतविजूचाकडकडाट॥ तैशींशस्त्रें खोंचितीदाट॥ वायूआलियाहोईलपीठ॥ जैशादाटजलधारा॥ ७॥ अचळस्तं भप्रल्हादगुणी॥ सदासादरनामस्मरणीं॥ दासारक्षीचक्रपाणी॥ भक्तवत्सल ह्मणोनियां॥ ८॥ सुदर्शनमेरूनिभक्त॥ सदारक्षीलक्ष्मीकांत॥ महाविघ्नांचाआघात॥

॥लागूंनेदीजगदात्मा॥ ९॥ शस्त्रवर्षावकरितीअसुर॥जैसेवर्षाॠतूचेपूर॥अपसयाशस्त्रेंहोतीचूर॥नाचेनिर्भरहरिभक्त॥११०॥ हरिनामाचाकरितांघोष॥धाकेंअसुरपावलात्रास॥दांतखाऊनिदैत्यकर्कश॥ ह्मणेकोठेंरेतवहरी॥११॥आधींवधीनलक्ष्मीरमण॥पाठींघेईनतुझाप्राण॥मीकोपलिया त्रैलोक्यसंपूर्ण॥आतांनवांचेकदापी॥१२॥ येरूह्मणेव्यापकहरी॥ सर्वभरलासेचराचरीं॥अणुरेणुसकळधात्री॥रितीनाहींहरिवीण॥१३॥ आपधरणीवायुनभ॥मूळभूतहरीआरंभस्तंभ॥ऐकूनिदैत्यापातलाक्षोभ॥हातीं वसबीरवगातें॥१४॥ ह्मणेसर्वत्रअसेतुझाहरी॥ तरीयेथेंप्रगटवीलोकरी॥ शस्त्रघायेंअसुरवैरी॥चूर्णकरीनक्षणार्धें॥१५॥येरूह्मणेस्तंभींप्रगट॥ आतांकायहोईलवैकुंठपीठ॥मगचवताळूनअसुरदुष्ट॥ शस्त्रेंस्तंभतोडित॥ ॥१६॥घायासरसाफुटलातडक॥कांपूंलागलेंब्रह्मांडसकळिक॥ महाकाळाबैसेदचक॥ ऐसीहाकफोडिली॥१७॥अपारमनींधरूनिक्षोभ॥ कडकडाटेंफोडिळास्तंभ॥ महातेजेंधरणीनभ॥त्रैलोक्यसंपूर्णकोंदलें॥१८॥ वैशाखमासपरमपवित्र॥ कृष्णाचतुर्दशीसोमवासर॥सिद्धियोगस्वातीनक्षत्र॥वणिजकर्णयोगजें॥१९॥तयेदिनींप्रदोषकाळीं॥नृसिंहमूर्तीवनमाळी॥ भक्तरक्षणार्थवैकुंठशाली॥स्तंभांतूनिप्रगला॥१२०॥नरशरीरसिंहवदन॥ परमविक्राळदाढादशन॥बाबरझोंटीआरक्तनयन॥जिव्हाविशाळलळलळित॥२१॥ परमावेशेंघालूनिउडी॥ शत्रुधरिलालवडसवडी॥ द्वारप्रवेशींघालूनिमांडी॥अंकींधरिलेंअसुरातें॥२२॥ अस्तमानाजातांसविता॥नखीं विदारीदितिसुता॥ क्रोधनावरेलक्ष्मीकांता॥ ह्मणोनिआंतडींकाढित॥२३॥ प्रल्हादाऐसेंसुगुण॥पोटींअसेलदुसरेंरत्न॥भक्तिप्रियरमारमण॥ह्मणूनिउदरधुंडाळी॥२४॥ क्रोधेंकित्येकवधिलेंअसुरां॥उरलेपळालेदिगंतरा॥ एैसाश्रीहरीभक्तकैवारा॥तयेस्थळींप्रगटला॥२५॥ ऐसाहिरण्यकशिपूमती॥ मारूनिमगतोरमापती॥ शांतकोपनृसिंहमूर्ती॥ अत्यानंदेंडुलतसे॥२६॥ तंव ज्ञानीश्रेष्ठदैत्यकुमर॥बैसोनिदेवाच्याअंकावर॥परमविनयेंजोडूनिकर॥प्रियवचनबोलेपैं॥२७॥ ह्मणेदेवदेवाजगन्निवासा॥ भक्तप्रियाहृषीकेशा॥नृसिं

हरूपीकमलेशा॥नमोस्तुतेपदकमळीं॥२८॥त्वद्भक्तमीअसुरपती॥एकतत्त्वपु सतोंतुजप्रती॥तवचरणींमजअचलभक्ती॥कैशीझालीनानाविध॥२९॥आ णिमीतुजसीप्रियजाण॥जाहलोंयाचेंकायकारण॥तेंसर्वहीमजसीकथन॥क रींनृसिंहरूपिया॥१३०॥ऐसेंतयाचेंवाक्यऐकुनी॥आनंदेंबोलेचक्रपाणी॥ह्मणेव त्सामममचरणीं॥तुझीझालीदृढभक्ती॥३१॥आणितूंझालासिमाझाप्रिय॥याचें कारणअसेकाय॥तेंसांगतोंऐकताहोय॥एकाग्रचित्तेंकरूनी॥३२॥पूर्वीअवं तीपुरामाझारी॥ब्राह्मणएकसदाचारी॥सुशर्मानामकपृथ्वीवरी॥प्रसिद्धऐ साराहतसे॥३३॥वेदवेदांगपारंगत॥आणिसर्वलोकांमाजीविश्रुत॥नित्यहोम- क्रियादिआचरत॥ब्रह्मक्रियासर्वही॥३४॥आणिअग्निष्टोमादियज्ञकरूनं॥सं तुष्टकरीदेवतागण॥तयाचीभार्यापतिव्रताजाण॥सुशीलानामेंविख्यात॥३५॥ तीमनोभावेंअहर्निशीं॥सेवीतसेपतिचरणांसी॥कालांतरेंत्यासुशीलेसी॥पंच पुत्रजाहले॥३६॥त्यांतूनिज्येष्ठचारपुत्र॥सदाचारीपरमपवित्र॥विद्वानआणिख्या तसर्वत्र॥ऐसेजाहलेअसतीपैं॥३७॥त्यांतूनितूंकनिष्ठपंचम॥वासुदेवअसेतुझें नाम॥स्नानसंध्यादिक्रियानेम॥वेदाध्ययनादित्यागिलें॥३८॥आणिसंगतीक रूनिवेश्येसी॥सर्वकालमद्यपानकरिशी॥सुवर्णचोरूनिअहर्निशीं॥देशीनेऊनि वेश्येतें॥३९॥आणिवेश्येसिहोऊनितत्पर॥करिसीनानापापाचार॥ऐसाझालासि तूंअपवित्र॥पूर्वजन्मामाझारी॥१४०॥ऐसेलोटतांबहुतदिवस॥जाइलेंजाणअ- द्भुतविशेष॥शुक्लपक्षवैशाखमास॥चतुर्दशीदिवसपातला॥४१॥तैंदैववशें करूनजाण॥वारांगनेसीतुझेंभांडण॥जाइलेंह्मणोनिउपोषण॥केलेंतुवांरो- षानें॥४२॥आणिनित्यव्रततयेनिशीं॥वारांगनेनेंविहारासी॥नाहींकेलेंह्मणोनि तुजसी॥निद्रानाहींलागली॥४३॥आणितियेनेंप्रियभाषण॥नाहींकेलेंकिंचि- न्नहीजाण॥ह्मणोनिकेलेंसिजागरण॥भक्ष्यभोज्यादिवर्जिलें॥४४॥तोचिमा झाअसेव्रतदिन॥तेंजागरणआणिउपोषण॥झालेंनूतेंअज्ञानेंकरून॥ह्मणो निघडलेंमद्व्रत॥४५॥हेंअत्युत्तमव्रतआचरितां॥हर्षितहोतीस्वर्गींदेवता॥पू र्वींसृष्टीकरावीहीआर्ता॥धरूनिब्रह्माआचरेहें॥४६॥यामद्व्रतप्रभावेंकरून ॥अखिलचराचरनिर्माण॥करितांझालाकमलासन॥ऐसामहिमामद्व्रता

चा॥४७॥ तैसाच पूर्वी पार्वतीकांत॥ त्रिपुरवधाचा धरूनि हेत॥ करिता झाला हें महाव्रत॥ ह्मणोनि त्रिपुर वधियेला॥४८॥ ऐसें महाव्रत हें अलौकिक॥ आचरोनि अनेक लोक॥ सिद्धि प्रती पावले देख॥ अनायासें करूनी॥४९॥ ऐसा प्रभाव महाव्रताचा॥ जाणत असे वेश्या साचा॥ ह्मणोनि विचार तात्पुरचा॥ धूर्त वेश्या करीतसे॥५०॥ कलहयोगें व्रताचरण॥ घडोनि मुक्त होईल जाण॥ ऐसें करूनि विचारण॥ भांडण केलें तुजसंगें॥५१॥ त्या कलहयोगें उपोषण॥ आणि घडलें जागरण॥ ह्मणोनि अवश्य मजलागुन॥ प्रिय झाला सी वत्सा तूं॥५२॥ आणि ती गणिका हें महाव्रत॥ आचरण करीत असे सतत॥ ह्मणोनि अंतीं झाली मुक्त॥ व्रतप्रभावें करूनी॥५३॥ तैसाचि तूंही मुक्त जाण॥ परंतु किंचित्कार्यार्थी कारण॥ मच्छरीरापृथक्कें करून॥ ठेविला असे तुजसी॥५४॥ तरी सर्व कार्यें साधूनि सत्वरी॥ प्रवेश करिसी वैकुंठपुरीं॥ ही सत्य जाण ममवैखरी॥ ममभक्ता प्रल्हादा॥५५॥ ऐसें हें उत्तम माझें व्रत॥ नृसिंहचतुर्दशी नामें विख्यात॥ यथाविधि जे आचरत॥ ते नर होती मुक्त पैं॥५६॥ तयांसी कल्पांतीं ही जाण॥ पुनः नाहीं जन्ममरण॥ इहलोकीं मनोरथ पूर्ण॥ सर्व होती तयांचे॥५७॥ अपुत्रिकांसी पुत्र होती॥ निर्धनासी धनसंपत्ती॥ आणि मुमुक्षूंसी मोक्षप्राप्ती॥ सौख्येच्छूसी सौख्य होय॥५८॥ आणि स्त्रिया अथवा पुरुष॥ जे व्रत आचरती तयांस॥ सौख्यप्राप्ति होय विशेष॥ भुक्तिमुक्तीयुक्त सर्व॥५९॥ ऐसें ऐकूनि नृसिंहाचें वचन॥ प्रल्हाद भक्त हस्त जोडून॥ ह्मणे स्वामी भक्तीचें कारण॥ कथन केलें मजलागीं॥६०॥ आतां करितों एक विनंती॥ या व्रताचा विधी निश्चिती॥ कोण मास कोण तिथी॥ आणि कोण वासर॥६१॥ हें सर्व मज कारणें॥ कृपा करूनि मज निवेदणें॥ ज्याच्या योगें सर्व भुवनें॥ निष्पाप होती प्रभुवर्या॥६२॥ ऐसें ऐकूनि प्रल्हादाचें वचन॥ नृसिंह बोले आनंदें करून॥ उत्तम केला सी वत्सा प्रश्न॥ सर्व सांगतों तुज आतां॥६३॥ वैशाख शुद्ध चतुर्दशी॥ तद्दिनीं आचरावें या व्रतासी॥ मज्जन्मव्रत हें पापनाशी॥ आणि होय पुण्यसंभव॥६४॥ तद्दिनीं प्रभातीं उठून॥ शौचक्रियादि संपादून॥ मुखमार्जन दंतधावन॥ यथाविधी आचरावें॥६५॥ मग जोडूनि उभय करांसी॥ प्रार्थना कीजे देवांपासी॥ निर्विघ्नपणें पूर्ण तैसी॥ व्रत पावावें ह्मणउ-

नी॥६६॥ ॥अथनियममंत्रः॥ ॥श्रीनृसिंहदयांकृत्वामहाविष्णोमम्मोपरि॥अद्याहंतेविधास्यामिव्रतंनिर्विघ्नतांनय॥१॥ ॥इतिनियममंत्रः॥
ऐशियामंत्रेंकरूनी॥प्रार्थनाकीजेहस्तजोडूनी॥आणिकरूनयेतयेदिनीं॥ पापीजनाचीसंगती॥६७॥तैसेचित्यागावेमिथ्यालाप॥दुष्टस्त्रियांसीआलाप॥
आणिचिंतावेंमाझेंरूप॥महूतस्थपुरुषानें॥६८॥ मगदिवसहोतांदोनप्रहर॥
जेथेंसरितादिशुद्धनीर॥तेथेंजाऊनियथाशास्त्र॥स्नानकरावेंभक्तीनें॥६९
॥मृत्तिकागोमयधात्रीफळ॥आणिसर्वपापघ्नउत्तमतिळ॥हींलावूनिअंगासिसकळ॥स्नानकीजेयथाविधी॥७०॥मगनेसूनियांशुद्धवस्त्र॥स्वजातीचेंनित्यकर्मसमग्र॥ तेथेंचसंपादूनिनंतर॥स्वगृहाप्रतीजाइजे॥७१॥गृहींजाऊनिंगोमयेंकरून॥शुद्धभूमीतेंकरावेंलेपन॥आणितेथेंअष्टदळकाढून॥ वरीस्थापावा
ताम्रकलश॥७२॥त्याताम्रकलशामाझार॥पंचपल्लवअव्रणसुंदर॥आणिपंचरत्नेंशुद्धनीर॥घालोनिपूर्णकीजिये॥७३॥त्यावरीतंडुलप्रपूरित॥ वंशपात्रठेवूनित्यांत॥माझीमूर्तीलक्ष्मीसहित॥हेमनिर्मितस्थापावी॥७४॥पलमात्रें
घ्यावेंसुवर्ण॥किंवातदर्धवान्यून॥यथाशक्तिप्रतिमाजाण॥शाठ्यवर्जितकरावी॥७५॥ मंडपघालावास्फविस्तृत॥चित्रवितानेंसींआच्छादित॥पुष्पस्तबकींसुशोभित॥आणितोरणेंबांधावीं॥७६॥मगसदाचारसंपन्न॥शांतदांतजितेंद्रियजाण॥ऐसाबोलावूनब्राह्मण॥आचार्यकीजेतयासी॥७७॥त्या
आचार्याच्यावचनद्वारें॥यथाशास्त्रषोडशोपचारें॥पूजनकीजेअत्यादरें॥पंचामृतेंसहितपैं॥७८॥मगकरोनिपुराणश्रवण॥गीतवाद्यनृत्येंसिजाण॥
करावेंसर्वरात्रजागरण॥मत्प्रीत्यर्थभक्तीनें॥७९॥ नंतरहोतांप्रभातकाळ॥
शौचस्नानादिकर्मेंसकळ॥सारोनिमाझीमूर्तीनिर्मळ॥पूर्ववतपूजावी॥८०
॥आणिस्वस्थमानसेंकरून॥मदग्रींविष्णुमंत्रानेंपठण॥ करूनिमगआचार्याकारण॥पीठदानदीजिये॥८१॥तैसेंचिवेदवेदांगज्ञातेपूर्ण॥ शांतदांतजितेंद्रियजाण॥ऐसेपाचारूनिब्राह्मण॥पूजनकीजेतयांचें॥८२॥आणि-
गोभूमीतिलसुवर्णें॥सोपस्करशय्यामहारत्नें॥सप्तधान्येंनानाभूषणें॥ यथाशक्तीदानकीजे॥८३॥ आणिभोजनघालावेंब्राह्मणांसी॥दक्षिणातांबू

लवस्त्रेंसी ॥ निर्धनपुरुषेंहीयादनासी ॥ शाठ्यवर्जितआचरावें ॥ ८४ ॥ आणि मीनृसिंहव्हावाकीं प्रसन्न ॥ ह्मणोनिप्रतिवर्षीं व्रताचरण ॥ करितीतयांसी जन्ममरण ॥ नव्हेचिजाणकल्पांतीं ॥ ८५ ॥ आणितद्दिनींस्वातीनक्षत्र ॥ वणिज कर्णशनिवासर ॥ तैसाचिसिद्धियोगपवित्र ॥ ऐसायोगअसेजरी ॥ ८६ ॥ तेंकेलिया व्रताचरण ॥ कोटिब्रह्महत्यादिपापेंजाण ॥ नाशपावतीनलगतांक्षण ॥ हेंसांग तोंनिश्चयें ॥ ८७ ॥ जेनरनकरितीहें मद्व्रत ॥ तेमहानरकींपचतीसतत ॥ आणिचं द्रसूर्यजोंजगीं वर्तत ॥ दुःखभोगितीतंवजाण ॥ ८८ ॥ आणिकलियुगामाझारीजा ण ॥ यथायथाहोयपापाचरण ॥ तैसेतैसेधर्मसंपूर्ण ॥ नाशपावतीनिर्धारें ॥ ८९ ॥ परीयाव्रतासीजेआचरती ॥ तयांसीप्राप्तहोयभुक्तिमुक्ती ॥ हेंसांगतोंवत्सानि- श्चिती ॥ संशयकांहींधरूंनको ॥ ९० ॥ यानृसिंहव्रतासमानव्रत ॥ पाहतांनदिसे ब्रह्मांडांत ॥ यथाविधीआचरतांसमस्त ॥ इच्छिलेंफळपावती ॥ ९१ ॥ हीकथा पुण्यपावन ॥ भक्तीनेंनरजेकरितीश्रवण ॥ तयांचींपापेंसर्वहीजाण ॥ नाशपाव तींनिश्चयें ॥ ९२ ॥ आणिश्रवणपठणेंमनोरथ ॥ पूर्णहोतीजनांचेसमस्त ॥ जेंव्रताचरणेंफलयथार्थ ॥ तेंचिप्राप्तकथाश्रवणें ॥ ९३ ॥ जयजयाजीकरुणा करा ॥ नृसिंहमूर्तीदीनोद्धारा ॥ भक्तकैवारियाजगदीश्वरा ॥ नमनमाझेंतव चरणीं ॥ ९४ ॥ इतिश्रीनृसिंहव्रतकथा ॥ नरहरिकृपेंझालीसमाप्ता ॥ यांतअसे लन्यूनाधिकता ॥ तरीसज्जनींक्षमाकीजे ॥ ९५ ॥ ॥ श्रीनृसिंहार्पणमस्तु ॥ ॥



श्रीगणेशायनमः॥ ॥लोमशऋषीपरमचतुर॥बोलकाजेसाअंगिरापुत्र॥ते णेंयाज्ञवल्क्याचेंचरित्र॥ धर्माप्रतीकथियेलें॥१॥तीर्थयात्रापावनपरम॥ त्याहीवरीसंतसमागम॥ मार्गींजातांलोमशउत्तम॥ इतिहाससांगत॥२॥पुण्य श्लोकांच्याकथापावन॥ निर्दोषयशऐकतांपूर्ण॥ चरणींचालतांनिर्भयमन॥ शीणनवाटेकोणासी॥३॥धर्मह्मणेलोमशमुनी॥द्रौपदीसारिखीसद्गुण- खाणी॥ रूपवंतीमधुरवचनी॥पूर्वीकोणहोतीपैं॥४॥लोमशह्मणेसावधा न॥ऐकेंइतिहासपावन॥स्त्रियांऐकतांसौभाग्यवर्धन॥ परमकल्याणपुरुषां सी॥५॥मद्रदेशींचानृपती॥ नामजयाचेंअश्वपती॥ वेदविहितचालेनीतीं॥उ दारधर्मिष्ठसर्वज्ञ॥६॥ त्यासननसेपुत्रसंतान॥ तेणेंबहुतवर्षेंतपकरून॥सावि त्रीचेंआराधन॥ केलेंजाणसाक्षेपें॥७॥करीदहालक्षजपपूर्ण॥ लक्षसंख्या- प्रत्यहींहवन॥ पळीमात्रदुग्धप्राशन॥ दहादिवसांतएकदांकरी॥८॥यारीती अष्टदशवर्षेंभरली॥सावित्रीदेवीप्रसन्नझाली॥ अश्वपतीह्मणेतेवेळीं॥पुत्रसं तानमजद्यावें॥९॥ देवीह्मणेपुत्रसंतान॥तुझेअदृष्टींनसेजाण॥ परीलावण्यखा णीदिव्यरत्न॥कन्याएकहोईल॥१०॥ भूमंडळींविख्यातहोईल॥त्रिभुवनींम हिमावाढेल॥पतिव्रताशिरोमणीसुशील॥ कीर्तीवर्णितीलपुराणीं॥११॥ऐसें बोलूनअर्कनंदिनी॥गुप्तझालीतेचक्षणीं॥ हर्षखेददोनीमनीं॥रावआला- स्वनगरा॥१२॥ नवमासभरतांपूर्ण॥ पट्टराणीगुणनिधान॥ तिचेपोटींचिद्र- त्न॥कन्याएकसुगुणझाली॥१३॥ तेब्रह्मपत्नीसूर्यपुत्री॥नामठेविलेंसावित्री ॥उमारमानिर्जरेंद्रनारी॥ उपमेसरीत्यांचीच॥१४॥तिचेंस्वरूपतेजःपुंज॥देखो निनाचेशफरिध्वज॥कींलावण्यामृताचीसहज॥ निम्नगाभरूनचालली॥१५ ॥बहुतवर्णिल्यानितंबिनी॥सीतासुलोचनानैषधराणी॥ परीअश्वपतीची नंदिनी॥सावित्रीश्रेष्ठसर्वांत॥१६॥ मृगशावाक्षीसुहास्यवदनी॥विद्रुमाध रीद्विजहिरेखाणी॥पिकस्वरीताटंकेंकर्णीं॥मित्रमृगांकसमान॥१७॥हरिम ध्याहंसगमनी॥अंगसुवासनमायेसदनीं॥ सरळघ्राणीमुक्तरूपाणी॥भु- जंगवेणीकोमळांगी॥१८॥चातुर्यसौंदर्यमराळी॥परमसुकुमारशृंगारशाली॥ दिवसेंदिवसथोरजाहली॥तेवेल्हाळीगुणालया॥१९॥कन्याअवंतरतांपरम॥

वृद्धिंगतहोयआश्चर्यद्रुम॥विस्तारलेंसमस्तक्षेम॥रावधांवलावरपहावया॥
॥२०॥तीसवरयोग्यदिसेनाक्षितीं॥मगतोनृपह्मणेकन्येप्रती॥तूंपुरुषरत्न-
शोधूनिनिश्चिती॥वरवरींमानेलतो॥२१॥सवेंदळभारदेउनी॥कन्याबैसवि-
लीदिव्ययानीं॥छपन्नदेशास्वनयनीं॥पाहातसेराजबाळा॥२२॥तोंद्युमत्सेन.
राजेश्वर॥सत्यवान त्याचाकुमर॥विधीचाअंशसाचार॥तिणेंवरआणिला
तो॥२३॥ग्रामासआलीपरतोन॥सांगेबापासवर्तमान॥रावसंतोषलाऐकोन॥
तोंनारदमुनीपातले॥२४॥रायेंबैसवूनउत्तमासनीं॥मुक्ताभिषेककेलातेक्षणीं
॥पूजासंभारसमर्पूनी॥सांगेवर्तमानकन्येचें॥२५॥नारदबोलेवचन॥सत्यवा
नपिताद्युमत्सेन॥त्याचेनयनगेलेदायादींयेऊन॥राज्यहिरोनघेतलें॥२६॥द
रिद्रदुःखेंव्यापुनी॥भार्यापुत्रसंगेंघेउनी॥द्युमत्सेनहिंडेवनीं॥आपदानयनीं
पहावेना॥२७॥कंदमूळेंसेवून॥वृक्षातळींकरीशयन॥पिताह्मणेंदुजावरपाहून
॥लावण्यगंगाहेद्यावी॥२८॥येरीह्मणेप्राणजावोनिर्धारें॥मनींवरिलातोनसां
डींभ्रतार॥प्रत्यक्षघडतोव्यभिचार॥पतिव्रताधर्मबुडे॥२९॥सत्यवानावांचू-
न॥वडीलसमवयलहान॥पिताबंधूकींनंदन॥पुरुषमात्रसर्वमातें॥३०॥शुद्ध
कृष्णपक्षनिश्चित॥तैसेंऐश्वर्यदरिद्रयेतजात॥भाग्याभ्रकाळींवितळत॥प-
रीनिश्चयध्रुवनढळे॥३१॥नारदह्मणेतुझानेमसत्य॥परीतेथेंआहेअनर्थ॥ए
कसंवत्सरभरतांमृत्य॥सत्यवानाअसेहो॥३२॥तोमरणपावलियावरी॥तूंका
यकरिसीलराजकुमरी॥येरीह्मणेमीनिर्धारीं॥प्राणदेईनत्यासवें॥३३॥सुकृ
तपदरींअसेलनिश्चयें॥तरीविषतेंचिअमृतहोये॥मृत्तिकाजेथेंखणोंजाये॥
तेथेंनिधानलागेल॥३४॥हातींधरितांपाषाण॥तोपरीसहोयसुवर्ण॥घर
च्यादासीसिद्धिहोऊन॥कल्पिलेंमात्रपुरविती॥३५॥कृपाकरीलकमलदलाक्ष
॥तरीआंगणींचेतरुहोतीकल्पवृक्ष॥शत्रूचेमित्रहोतीप्रत्यक्ष॥पूजाकरूनवं-
दिती॥३६॥क्षणनलागतांनिर्धारें॥तृणगृहेंहोतीसुवर्णमंदिरें॥येऊनग्रह
आदरें॥राखतीसर्वस्वें॥३७॥नारदम्हणेधन्य॥माझेंतुजआशीर्वचन॥तुझा
हीमनोरथपूर्ण॥ममवरदेंहोईल॥३८॥यावरीविष्णुनाभनंदन॥तत्काळपाव
लेअंतर्धान॥अश्वपतीकन्याघेऊन॥वनाप्रतींगेलाहो॥३९॥त्याच्याआपद्गुदे

रवोनिडोळां॥ अश्वपतीसद्गदझाला॥ द्युमत्सेनह्मणेतयाला॥ मावळलाभाग्यसूर्य॥४०॥ आह्मासअवदशासंपूर्ण॥ तुझेंनबैसेकदामन॥ हेकन्यासकलक्षण॥देईनेऊनएक्यावरा॥४१॥ रावह्मणेकन्येचानिर्धार॥ वरुणदिशेसउगवेलमित्र॥ हेंहीघडेलपरीवर॥दुसरानवरींनिर्धारीं॥४२॥ मगपाहूनियांसुदिन॥रायेंलाविलेंतेथेंलग्न॥ चारदिवससंपादून॥ दीधलेंआंदणबहुतची॥४३॥ कन्याठेवून त्यापासीं॥अश्वपतीगेलास्वनगरासीं॥ सावित्रीभ्रतारसेवेसीं॥ दिवसनिशींसादर॥४४॥सासुसासराभ्रतार॥ त्यांचेसेवेसीतत्पर॥ हेंचतपरवडतर॥आचरेतेव्हांसावित्री॥४५॥ सेवाकरावीसादर॥ स्त्रियांससाधनहेंचथोर॥पतीतोचआपुलाईश्वर॥ दुजाविचारनसावा॥४६॥सकळांचेअन्यायसोसून॥दासदासीचेंराखीमन॥अवघींनिजल्याकरीशयन॥ सर्वांआधींजागीहोय॥४७॥चारप्रहररात्रस्वयें॥ तळहातींभ्रताराचेपाय॥ पतीनेंआग्रहकरितांपाहें॥निद्राकरीतक्षणभरी॥४८॥ दरिद्रहोवृद्धभ्रतार॥ दीर्घरोगीदुःखेंजर्जर॥ द्रव्यनजोडीक्रूर॥ परीनकंटाळेपतिव्रता॥४९॥सेवाकरीघडोघडी॥ जितकीपडेवितकीह्मणेथोडी॥ शरीरपोषणींआवडी॥सर्वहीसोडीसतीते॥५०॥ पितावृद्धदरिद्रीभ्रतार॥अक्षीरगायअनाथप्रेतसंस्कार॥ अंधपांगूळमुकेबधिर॥यांसीपाळितांहरितुष्टे॥५१॥व्यथाभूतगुरूचेंसेवन॥दरिद्रीब्राह्मणाचेंकुटुंबपालन॥दरिद्रीयाचेंकरितांलग्न॥ हरितुष्टेत्याचरी॥५२॥ असोतेपतिव्रतानारी॥भ्रताराआधीभोजनकरी॥षड्रसीउत्तममुळेंनिर्धारी॥ नफक्षीचपतिवीण॥५३॥ ग्रामींजातांभ्रतार॥नलेईउत्तमवस्त्रेंअलंकार॥दर्पणनपाहेअहोरात्र॥चिंताकरीपतीची॥५४॥जारजारणीचासंगनधरी॥परवस्त्रनसेनिर्धारी॥न्याहारदेऊनक्षणभरी॥ परपुरुषनपाहे॥५५॥ एकांतजरीनिःसंग॥ पडदणीवीणनधुवीअंग॥पुरुषार्थीअभंग॥पतीचआपुलाभावित॥५६॥ परघरींनिद्रानकरी॥एकलीमार्गनचालेक्षणभरी॥क्रीडासमयींविनोदकरी॥ पतीचेंमनपाहुनी॥५७॥ गुणसरितापरमचतुर॥निजमनेंमोहीतप्राणेश्वर॥ पतिकार्यादक्षगुणगंभीर॥साध्यसाधनभावजाणे॥५८॥ दूरगेल्याप्राणनाथ॥ सर्वभोगांचेंधरीव्रत॥पांचदिवसापर्यंत॥रजस्वलानपडेदृष्टीसी॥५९॥भ्रता-

राचीप्रीतजेठायीं॥तिचास्नेहतिकडेचपाहीं॥पतिद्वेषीसहसाही॥त्यातेंप्रीती करीना॥६०॥जारजारीणयेऊंनेदीघरा॥आपणनजाईत्यांच्यामंदिरा॥संगें नघेतांभ्रतारा॥विवाहयात्रेनजाय॥६१॥पतीचेअवगुणलपवीत॥कीर्तीसि द्गुणवर्णित॥पतीचेंआयुष्यवित्त॥कळोंनेदीकवणातें॥६२॥भ्रतारासप्रिय निर्धारीं॥त्यात्यागोष्टीचासाक्षेपकरी॥अंतर्बाह्यअहोरात्रीं॥तिरस्कारनसे तीतें॥६३॥पतीच्यामनांतीलसर्वजाणे॥स्वामीवररुसोंकधींनेणे॥भ्रतार मारितांहांसतचिम्हणे॥करतुमचेदुखतील॥६४॥नघेतांभ्रतारआज्ञा॥ कोणएकनेमकरीना॥आचरतआयुष्यवर्धन॥पतीचेंव्हावयानिर्धारें॥ ॥६५॥भ्रतारदूरगेलियाजाण॥त्यासप्रियतेंनभक्षीआपण॥नानावस्त्रें भोगभूषण॥सतीसनगमेकदाही॥६६॥धनधान्यवस्त्रालंकार॥भ्रतारासन वंचीअणुमात्र॥असूननाहींम्हणेतेंनिर्धार॥प्राणांतींहीघडेना॥६७॥कां- हींएकसंकटव्यथा॥कदानघालीप्राणनाथा॥पतीआनंदरूपअसतां॥आ- पणसुखमानित॥६८॥भ्रताराहोयव्यथाभारी॥अन्ननघेउपवासकरी॥ नानावस्तुनिर्धारीं॥मनत्यांवरीनसेतिचें॥६९॥भ्रताराचेंस्वरूपलिहून॥दूर गेलियापाहेविलोकुन॥अन्ननघेतीर्थेंविण॥पादुकापूजनहृदयींधरी॥७० ॥ऐशीउत्तमगुणखाणी॥पतीचावेधलागलामनीं॥जागृतींसुषुप्तींस्वप्नीं॥ नवंचीकांहींतयातें॥७१॥जाईलतरीजावोप्राण॥परीपतीचेंनबोलेन्यून॥ज न्मोजन्मींहाचहोम्हणोन॥सर्वदेवांनमस्कारी॥७२॥भ्रताराचेनकळत॥ कांहींएकनठेवीवस्त॥ब्रह्माविष्णुउमाकांत॥स्वरूपभावीपतीचें॥७३॥प तीचेंमनरंजेजेणें॥तींचबोलेकौतुकवचनें॥मनींम्हणेअहेवपणें॥मीजाई नयाआधीं॥७४॥पूर्वतपाच्याराशीपूर्ण॥तरीऐशीपावेसुलक्षण॥तीसइ हलोकींमान॥परत्रींधन्यम्हणतात॥७५॥स्वर्गींच्यासर्वपतिव्रता॥तीसस मोरयेतीतत्वतां॥अनेकओंवाळून आरत्या॥दिव्यपुष्पवृष्टीकरिती॥७६ ॥यासद्गुणेंमंडितपूर्ण॥सावित्रीदेवीगुणनिधान॥परीनारदगेलासांगोन ॥तोदिवसजवळआला॥७७॥मरणाचेदिवसचारी॥उरलेतेंकळलेंसुंदरी॥ तीनदिवसनिर्धारीं॥सावित्रीकरीउपोषण॥७८॥नघेफळमूळजीवन॥अंध

श्वशुरबोलेवचन ॥ ह्मणेमायेकरिशीउपोषण ॥ कांनिर्वाणमांडिलें ॥ ७९ ॥ पतीचामृत्युदिवसआलाजवळी ॥ कोणानसांगेवेल्हाळी ॥ तोंसत्यवानप्रातः कांळीं ॥ वनाप्रतीचालिला ॥ ८० ॥ साबित्रीदेवीवारित ॥ परीत्यासजवळीआला मृत्य ॥ परशुघेऊननिघत ॥ फळेंमूळें आणावया ॥ ८१ ॥ सवेंनिघेसुकुमार ॥ हिंडतीदोघेंघोरकांतार ॥ पतीचेचरणवारंवार ॥ धुवूनचुरीवृक्षातळीं ॥ ८२ ॥ पर्यटणकरितांतेवेळीं ॥ अस्ताचळागेलाहेळी ॥ निशाघोरप्राप्तझाली ॥ झगमगती उडुगण ॥ ८३ ॥ पतीसवितवीराजबाळा ॥ आश्रमाप्रतीस्वामीचला ॥ तोंवटवृक्षींउभाठेला ॥ शुष्ककाष्ठेंमोडित ॥ ८४ ॥ एककाष्ठबळेंमोडित ॥ तेंआदळलेंमस्तकांत ॥ पाषाणजेवींवर्मीबैसत ॥ पडेमूर्छितसत्यवान ॥ ८५ ॥ देखोनिपतिव्रताधांवली मुखींमस्तकींउदकघाली ॥ मांडीउशादीधली ॥ वाराघालीपल्लवें ॥ ८६ ॥ रात्रएकप्रहरपूर्ण ॥ तेव्हांगेलापतीचाप्राण ॥ लावण्यसागरींचेंनिधान ॥ शोकार्णवींपडियेलें ॥ ८७ ॥ ह्मणेउठाउठाजीप्राणनाथा ॥ वाटपाहतीमातापिता ॥ मजसांडुनिवत्सला ॥ दूरपंथासेविलें ॥ ८८ ॥ पिताअंधमाताअशक्त ॥ प्राणदेतीलएकतांमात ॥ उठाझालांक्षुधाक्रांत ॥ बोलाशब्दएकमजशीं ॥ ८९ ॥ माझेअन्यायबहुत ॥ समर्थेंघालावेपोटांत ॥ रुसणेंसोडोनिमात ॥ मजशींबोलाप्रियकरा ॥ ९० ॥ आपुलीप्रियासोडोन ॥ उचितनव्हेकरितांगमन ॥ तुह्मासफळमूळजीवन ॥ आणूनिकोण देईल ॥ ९१ ॥ अहाकर्मकसेंविचित्र ॥ भंगूनगेलेंमाझेंछत्र ॥ दिसेशून्यत्रिभुवनमात्र ॥ कायकरूंयावरी ॥ ९२ ॥ मजटाकूनकांतारीं ॥ सांगातियाकांगेलांदुरी ॥ शोककरितांसुंदरी ॥ यमतेथेंपातला ॥ ९३ ॥ त्याचालिंगदेहकाढून ॥ चालिलादक्षिणपंथेंघेऊन ॥ मगतीसुंदरीशोकायमान ॥ पाठीधांवेतयाचे ॥ ९४ ॥ मुखेंकरीतस्तवन ॥ क्षणक्षणाघालीलोटांगण ॥ ह्मणेमहाराजातूंकोण ॥ नामरवूणसांगेंकां ॥ ९५ ॥ येरूह्मणेमीयमजाण ॥ तूंपतिव्रताह्मणून ॥ दूतनदिल्हेधाडून ॥ मीचआलोंन्यावया ॥ ९६ ॥ ऋणानुबंधसरलापूर्ण ॥ जाईभ्रताराचेंकरींदहन ॥ येरीह्मणेगेलियाप्राण ॥ तुझेचरणनसोडीं ॥ ९७ ॥ पतिप्राणसंगातेंआतां ॥ मजहीनेईसमर्था ॥ मीतुझीकन्यातत्वतां ॥ उठवींजामाताआपुल्या ॥ ९८ ॥ तुझीकन्यावेल्हाळा ॥ तीसवैधव्य नकोदयाळा ॥ मगमेतननाथबोलिला ॥ सहसानघडेहेगोष्टी ॥ ९९ ॥ पतिप्राणवेगळाकं

रून॥मागतुजझालोंप्रसन्न॥मग्गासीतेंदेईन॥बोलवचनस्फकुमारे॥१००॥येरी म्हणेद्युमत्सेनश्वशुर॥देईत्यामहाराजानेत्र॥यमम्हणेतुझालागंतांकर॥येती जाणनिर्धारें॥१॥यावरीमाघारीजाईंआतां॥म्हणेसांडूनतुजऐसापिता॥कोणी कडेजावेंताता॥मजमाहेरान्यावेंसमागमें॥२॥भ्रतारचरणींअसेलमन॥तरीतूं होसीलदयाघन॥संतमहंतसाधुजन॥भावेंवंदिलेअसतील॥३॥मगबोलेधि श्वहंता॥पतिवेगळाकरूनमागआतां॥पतिव्रताम्हणोनितत्वतां॥प्रसन्नझालों दुसऱ्यानें॥४॥यावरीबोलेसुंदरी॥श्वशुराचेंराज्यदेझडकरी॥तथास्तुम्हणेभास्क री॥आतांमाघारीजाईंकां॥५॥येरीम्हणेदयाळावैवस्वता॥पतिसमागमें मजने आतां॥आम्हांचक्रवाकांतत्वता॥आदित्यात्मजाऐक्यकरीं॥६॥व्रतआणितप दान॥जरीघडलेंअसेलपूर्वींहून॥मातापितालक्ष्मीनारायण॥मानूनिपूजिलींअ सतील॥७॥अनाथप्रेताचेंदहन॥केलेंतरुणादरिद्रीलग्न॥सत्समागमसतत शास्त्रश्रवण॥सद्गुरुसेवनभावार्थें॥८॥तरीतुजदयांउपजेलमनीं॥मगतोबोले संयमिनी॥सत्यवानवेगळाकरूनी॥मागसाजणीअभीष्ट॥९॥माझ्यापित्यासश तपुत्र॥देईअर्कजासत्वर॥धर्मराजदेतउत्तर॥तथास्तुऐसेंत्रिवाचा॥१०॥बाईतु झीभीडफार॥म्हणूनिदिल्हेइतुकेवर॥आतांजाईसत्वर॥अग्नदेईपतिलागीं॥११ बोलेपतिव्रताशिरोरत्न॥दुष्काळामाजीअन्नदान॥तृषार्तासीजलपान॥करवि लेंअसेलउष्णाकाळीं॥१२॥व्याधिग्रस्तदुर्बळक्षीण॥त्याचेंकेलेंअसेलरक्षण॥हरी स्वरूपमानून॥जरीब्राह्मणपूजिलेअसतील॥१३॥हरिहरांअभेदपूर्ण॥मानूनिकेलें असेलभजन॥हरिकथापुराणश्रवण॥केलेंअसेलभावार्थें॥१४॥तरीचमजदेस्वो न॥दयाळूहोयभानूनंदन॥मगबोलेहांसोन॥चतुर्थवरमागेंकां॥१५॥वंध्याश ब्दतत्वतां॥मजनकोदयाळाआतां॥शतपुत्रसफळताता॥उदरलतिकाकरींमा झी॥१६॥पुत्रवंतीगुणवंती॥जन्मसावित्रीसौभाग्यवती॥मंगळमाहेश्वरीम्ह णती॥करींख्यातीत्रिभुवनीं॥१७॥फळेंवीणतरुजाण॥कींवेदघोषेंवीणसदन ॥हरिस्मरणेंवीणवदन॥व्यर्थजैसेंपशुवत॥१८॥तेवींकुळींनसतांपुत्र॥कैसा होईलवंशपवित्र॥मीतुझेंताताकृपापात्र॥करींमाहेरकन्येचें॥१९॥तुजसंगेंपं थक्रमिलाआतां॥नाहींमजऐसीसौभाग्यसरिता॥आतांरिकामीसर्वथा॥दवडू

नको मजलागीं ॥ २० ॥ आह्मदेव होऊंन दयाळ ॥ ह्मणे कन्येतुज दिधलें सकळ ॥ तुझेगुण देखोनि निर्मळ ॥ संतुष्ट झालों सर्वस्वें ॥ २१ ॥ सावित्री ह्मणे सर्वज्ञमूर्ती ॥ सत्यवानास आयुष्य किती ॥ येरू ह्मणे तूं मम कन्या निश्चिती ॥ महासती विख्यात ॥ २२ ॥ चारशत वर्षें पर्यंत ॥ सत्यवान आयुष्यवंत ॥ तुज होती शंभर सुत ॥ पौत्र ही बहुत देखसी ॥ २३ ॥ वैरी नाशती तत्वतां ॥ सकळ राज्य येईल हाता ॥ तूं पती पाशीं जाय आतां ॥ स्पर्शतां प्राण येईल ॥ २४ ॥ मग तो दक्षिण दिशेचा इंद्र ॥ अंतर्धान पावला सत्वर ॥ सावित्रीस आनंद थोर ॥ भ्रतारा जवळी पातली ॥ २५ ॥ हनुवटीस लावून हात ॥ ह्मणे प्राणवल्लभा उठा त्वरित ॥ तंव तो गडबडोन उठत ॥ आलिंगित प्राणप्रिये ॥ २६ ॥ ह्मणे तूं श्रमलीस फार ॥ फळें भक्षीं न करीं निराहार ॥ येरी ह्मणे सासू श्वशुर ॥ त्यांवीण न भक्षीं सर्वथा ॥ २७ ॥ भाग्य येजैसें दरिद्र सरतां ॥ तेवीं उदय पावे य मपिता ॥ स्वर्गींहून सकळ पतिव्रता ॥ सावित्री दर्शना पातल्या ॥ २८ ॥ कुंभिनीवरील सर्व कामिनी ॥ षोडशोपचारें पूजा घेउनी ॥ वटवृक्षातळीं येउनी ॥ पूजिती सावित्री सत्यवानां ॥ २९ ॥ सौभाग्य द्रव्य अर्पून ॥ वटवृक्षास करिती प्रदक्षिण ॥ वटसावित्री तैं पासून ॥ अद्यापपूजिती सर्व वनिता ॥ ३० ॥ जी न पूजितां गर्वे राहे ॥ ती जन्मोजन्मीं विधवा होय ॥ अर्चितां तें च सौभाग्य पाहे ॥ सर्वदा ही वर्धमान ॥ ३१ ॥ असो यावरी सावित्री सती ॥ भ्रतारास धरोनि हातीं ॥ जात आपुलें स्थळा प्रती ॥ बोलें तोषवी पतीतें ॥ ३२ ॥ सिंह व्याघ्र सर्पादि येऊन ॥ सावित्रीचे वंदिती चरण ॥ मातेचें घेतां दर्शन ॥ निःपाप झाले ते ॥ ३३ ॥ सावित्री ह्मणे पतीलागून ॥ तुमचे निजकेशें झाडीन चरण ॥ हळू चला कंटक पाषाण ॥ चरणीं रुतती सुकुमारा ॥ ३४ ॥ काय झाली पुत्रसून ॥ दोघें द्वंद्वें करिती रुदन ॥ त्यांचा शोक ऐकून ॥ समाधान करिती जन सर्व ॥ ३५ ॥ तों अकस्मात येऊन ॥ उभीं ठाकलीं पुत्रसून ॥ सावित्रीनें स्पर्शतां नयन ॥ उघडले तत्काळ तयाचे ॥ ३६ ॥ झाला एक ब्रह्मानंद ॥ गगनीं पाहती निर्जर वृंद ॥ दिव्य सुमनें सुगंध ॥ वर्षताती तेव्हां उल्हासें ॥ ३७ ॥ वृक्षांस फळें अर्पिती तत्वतां ॥ देता झाला मग समस्तां ॥ तों दळ बाधांस हृदयें तां ॥ मंत्री देखिले द्युमत्सेनें ॥ ३८ ॥ वैरी प्रधानें निवटून ॥ सर्वांस चालले घेऊन ॥ रत्नजडित शिबिकें तनिधान ॥ सावित्री देवी बैसविली ॥ ३९ ॥ मार्गे पुढें दळभा

रथेऊन॥ पुत्रस्त्रीसमवेतद्युमत्सेन॥ दिव्यवहनीं बैसवून॥ वाद्यगजरें चालती ॥५०॥ सत्यवानावरी छत्र॥ पित्यानें धरिलें पवित्र॥ सावित्रीस शतपुत्र॥ पितया तुल्य जाहले॥ ५१॥ ऐकोनि कन्येची कीर्ती॥ दर्शनाधांवला अश्वपती॥ सावित्री-च्यावरें नृपती॥ शतपुत्र पावला॥ ५२॥ लोमश ह्मणे धर्मा प्रती॥ ऐशी सावित्री चीकीर्ती॥ तेवी हे द्रौपदी सती॥ श्रीरंगभगिनी पतिव्रता॥ ५३॥ सावित्रीसत्यवा नांचे परी॥ स्वराज्य पावाल झडकरी॥ हें चरित्र ऐकतां नरनारी॥ दीर्घायुषी होतील ॥५४॥ स्त्रियांस सौभाग्यपूर्ण॥ पुरुषांस ऐश्वर्यकल्याण॥ महारोग होय हरण॥ गंडांतर मृत्यु निरसे॥ ५५॥ धर्म मार्गे तीर्थासि जातां॥ लोमशें सांगीतली कथा ॥कथारूपें तत्वतां॥ चंपकमाळा रूवासे॥ ५६॥ मूर्ख जे मतिमंद मिलिंद॥ त्यांसीं नावडे येथींचा सुगंध॥ भाविक जन प्रसिद्ध॥ आमोद सेविती भ्रमरापरी॥ ५७॥ श्रीधर ह्मणे ब्रह्मानंद पिता॥ सावित्री माता गुणसरिता॥ त्यांचे चरणीं मस्तक तत्व ना॥ ठेवोनि ग्रंथ संपविला॥ १५८॥ ॥ इतिश्रीसावित्रीआख्यानं समाप्तम् ॥



## नागपंचमी कथा प्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ जयजयाजी मंमलकरणा ॥ जयजय श्रीमन्मथदहना॥ जयजयाजी पार्वतीरमणा॥ नागभूषणा तुज नमो॥ १॥ जग द्रक्षणा त्रिपुरांतका॥ भक्तजनां निजपददायका॥ मायाविभ्रमसंकटहारका॥ मोक्षदायका तुज नमो॥ २॥ तूं चिराहूनि हृदयसंपुटी॥ ठाविशी आडमायातांटी॥

अलिसपणेंवर्तोंनिसृष्टी ॥ भक्तांसंकटींपाळिशी ॥ ३॥ तूंसर्वात्मापूर्णकाम ॥ सक ळविश्वाचें मंगळधाम ॥ कायावाचामनोधर्म ॥ चरणींसेवातुझिया ॥ ४ ॥ आर्तासंतां सिकरूनिनमन ॥ नागपंचमीव्रतकथाविधान ॥ जेंप्रभासखंडींपंचवदन ॥ स्वमु खेंसांगेअंबेसी ॥ ५ ॥ आणिशौनकादिऋषीप्रत ॥ अत्यादरेंबहुविस्तृत ॥ नैमिषा रण्यामाजीसूत ॥ सांगतेझालेप्रेमेंसी ॥ ६ ॥ तेंचिव्रतकथाविधान ॥ महाराष्ट्रभाषे तवर्णन ॥ करितोंसाक्षेपेंयथाज्ञान ॥ श्रवणकीजेसज्जनीं ॥ ७ ॥ कोणेएकेअवस रीं ॥ शिवबैसलेकैलासशिखरीं ॥ तोंहस्तजोडूनशैलकुमरी ॥ विनंतीकरीनम्रतें ॥ ८ ॥ जगज्जीवनाकैलासनाथा ॥ तुह्मींसांगितल्याबहुतकथा ॥ परीपुरलीनाहीं माझीआर्ता ॥ तरीकथानिरोपींआणिक ॥ ९ ॥ ऐसेंऐकोनिगिरिजेचेंवचन ॥ आनंदें डोलेनागभूषण ॥ आणिह्मणेबरवाप्रश्न ॥ केलातुवांप्राणप्रिये ॥ १० ॥ तरीश्रावण शुक्लपंचमीसी ॥ कीजेनागपंचमीव्रतासी ॥ तत्कथाविधीसांगतोंतुजसी ॥ श्रव णकरींसावचित्तें ॥ ११ ॥ श्रावणशुक्लचतुर्थी ॥ तदिनींराहिजेएकभुक्ती ॥ द्वितीयदि नींपंचमीतिथी ॥ प्रातःकाळींउठावें ॥ १२ ॥ आणितयेदिनींअहर्निशीं ॥ नकीजे धरित्रीखननासी ॥ आणिराहिजेब्रह्मचर्येंसीं ॥ ऐसानियमकरावा ॥ १३ ॥ मग शौचादिक्रियासारून ॥ द्वाराच्याउभयभागींजाण ॥ गोमयेंकरूनिसर्पलेप न ॥ करावेंआनंदेंस्फरेख ॥ १४ ॥ मगस्नानसंध्यादिक्रियासमस्त ॥ सारोनिहैम अथवाराजत ॥ किंवामृन्मयवाकाष्ठनिर्मित ॥ नागकीजेस्फरेख ॥ १५ ॥ हरिद्राचं दनेंकरूनी ॥ पंचसर्पपंचफणी ॥ स्फरेखचांगलेकाढुनी ॥ पूजनकीजेभक्तीनें ॥ ॥ १६ ॥ पंचामृतेंआणिलाजासुंदर ॥ जातीपद्मशतपत्रकण्हेरें ॥ गंधधूपदीपादि समग्र ॥ उपचारेंसीपूजिजे ॥ १७ ॥ ऐसीपूजाझालियावरी ॥ कथाश्रवणकीजेसुं दरी ॥ आणिमृदंगतुर्यादिवाद्यभारी ॥ नृत्यगीतआचरणें ॥ १८ ॥ आणिसत्पा त्रद्विजांकारण ॥ वस्त्रालंकारसुवर्णदान ॥ आणियथाशक्तिगोप्रदान ॥ वत्सास हितदीजिये ॥ १९ ॥ तैसीचहेमभारनिष्पन्न ॥ नागप्रतिमाआचार्याकारण ॥ आ णिअलंकारेंसींवस्त्रदान ॥ दीजेपौराणिकासी ॥ २० ॥ मगअनेकब्राह्मणांस ॥ घृ तमोदकलाडुपायस ॥ इत्यादिपक्वान्नेंसीषड्रस ॥ भोजनघालिजेभक्तीनें ॥ २१ ॥ एवंप्रकारेंयथोशास्त्र ॥ सारोनियांविधीसमग्र ॥ पारणाकीजेंनक्तींसुंदर ॥ आ

असुखंसमृवेन॥२२॥ ऐसाव्रतविधीपार्वतीप्रती॥ शंकरसांगेअतिप्रीती॥ आतांभविष्योत्तरपुराणोक्ती॥ सांगतोंश्रोतींऐकिजे॥२३॥ शतानीकासिह्मणेसुमंत॥ ज्यानरासीसर्पदंशहोत॥ तयासीहोऊनअधोगत॥ निर्विषसर्पहोतकीं॥ ॥२४॥ ऐसेंऐकोनिसुमंताचेंवाक्य॥ मगशतानीकबोलताहोय॥ जरीसर्पदष्टमनुष्यजाय॥ अधोगतीसीनिश्चयें॥२५॥ आणिजयाचेबंधुमातापिता॥ अथवाभगिनीकिंवादुहिता॥ पुत्रभार्याकिंवाजामाता॥ हेनागदष्टमृतझाले॥२६॥ तरीत्यांच्यामुक्तीकारण॥ कायतपअथवादान॥ किंवाकरणेंव्रताचरण॥ तेंमजसांगेंद्विजवर्या॥२७॥ ऐसाशतानीकाचाप्रश्न॥ ऐकूनिमगसुमंतब्राह्मण॥ पूर्वोक्तनागव्रतविधान॥ कथनकरिताजाहला॥२८॥ ह्मणेपूर्वोक्तविधींनागव्रत॥ यथोपचारेंकीजेसमस्त॥ आणिकथाश्रवणकरूनियथार्थ॥ पूजाकीजेव्यासाची॥ ॥२९॥ आणिनानारत्नविचित्रित॥ सुवर्णनागव्यासाप्रत॥ आणिगोप्रदानवत्सासहित॥ सोपस्करेंसीदीजिये॥३०॥ दानकालींभगवत्स्मरण॥ करोनिहस्तींतिलचंदन॥ अक्षतायुक्तघेऊनिजीवन॥ ऐसामंत्रबोलावा॥३१॥ ॥मंत्र, श्लोक॥ ॥येकेचिन्मेकुलेसर्पदष्टाःप्रासाह्यधोगतिं॥ व्रतदानेनगोविंद मुक्तिभाजोभवंतुने॥१॥ ॥ऐसाहामंत्रउच्चारून॥ गंधाक्षताआणिजीवन॥ वासुदेवाग्रींनीरींजाण॥ भगवत्प्रीत्यर्थसोडावें॥३२॥ सुमंतह्मणेशौनकाप्रत॥ जेमानवभुजंगदंशित॥ तयांच्यामुक्त्यर्थहेंमहद्व्रत॥ तत्कुलजेंकरावें॥३३॥ आणिवित्तशाठ्यविहीन॥ जेकरितीहेंव्रताचरण॥ तेस्ववंशजांसहितजाण॥ विष्णुसान्निध्यपावती॥३४॥ आणितयांच्यावंशजांप्रती॥ कदापिनहोयसर्पभीती॥ आणिअंतींपरमगती॥ पावतीजाणनिश्चयें॥३५॥ ऐसेंपवित्रकथानक॥ श्रोतींसावचित्तेंऐकतांदेख॥ प्राप्तहोयउत्तमलोक॥ हेंजाणिजेनिर्धारें॥३६॥ हीनागपंचमीव्रतकथा॥ भविष्योत्तरपुराणोक्ता॥ यथामतीसंक्षेपतः॥ प्राकृतभाषेंवर्णिली॥३७॥ यांतजेंअसेलकांहींन्यून॥ तेंक्षमाकरूनिमानावेंपूर्ण॥ यासाठींपंडितचरण॥ मनोभावेंवंदितों॥३८॥ इतिश्रीनागपंचमीव्रत॥ कथाविधानभविष्योत्तरोक्त॥ प्राकृतभाषेंझालेंसमाप्त॥ ईश्वरकृपेंकरूनी॥३९॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥शुभंभवतु॥ ॥ ॥ ॥ ॥




## मंगलागौरीकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ श्रीविनायकबुद्धिदायक॥ तूंसकळविद्यांचानायक॥ नम
स्कारतुजएक॥ ग्रंथारंभींकरीतसें॥१॥ सकळविघ्नांचातूंईश॥ ह्मणोनिबोलती
तुजविघ्नेश॥ माझियावरीकृपाविशेष॥ करूनित्वांग्रंथबोलवीं॥२॥ ऐसेंकरू
निनमन॥ आतांसांगतोंकथानुसंधान॥ युधिष्ठिरराजाकृष्णालागुन॥ प्रणिपात
करूनिपुसंतसे॥३॥ युधिष्ठिरह्मणेनंदनंदन॥ नवमुखवापासूनकथाश्रवण॥
झालेंअसेमजलागुन॥ ह्मणोनआजीधन्यअसें॥४॥ परीअसेएकमनोरथथो
र॥ व्रतऐकावेंसत्पुत्रायुष्कर॥ तोतूंसफळकरणार॥ असमीश्रीधरसमर्थपें॥५
॥ऐसेंऐकोनिधर्माचेंवचन॥ व्रतसांगेमधुसूदन॥ जेंस्त्रियाआचरतांजाण॥
सौभाग्यवृद्धीपावती॥६॥ येविषयींतूंसावधान॥ होऊनिऐकेंकथापुरातन॥ कुं
डिननामकनगरींजाण॥ प्रसिद्धब्राह्मणतिष्ठतसे॥७॥ तयाचेंनामधर्मपालक॥
ऐसावर्ततांतोमहाधनिक॥ पुत्रनाहींह्मणोनिसपत्निक॥ उद्विग्नअसेगृहकार्यीं
॥८॥ भस्मचर्चिलेंसर्वांगीं॥ रुद्राक्षमाळाधारकचांगी॥ ऐसातयाचेघरींएकयो
गी॥ भिक्षेकारणेंनित्ययेतसे॥९॥ परीतोतयाघरींचेंभिक्षान्न॥ कदापिनघे
तसेजाण॥ ऐसेंपाहूनितेगृहस्वामिण॥ पतीप्रतीबोलतसे॥१०॥ पतीसींह्मणेते
कामिनी॥ आमुचेगृहींहायोगीयेउनी॥ तिष्ठतसेपरीअन्ननघेह्मणोनी॥ आ-

मासहोतसे ॥ ४२ ॥ सर्वतीर्थीकरूनिस्नान ॥ जेंपुण्यफलमासहोतेंसंपूर्ण ॥ आणिजेंसर्वदानेंकरूनिप्राप्तजाण ॥ तेंयाचियाआचरणेंमिळतसे ॥ ४३ ॥ ज्या स्त्रियाहेंव्रतआचरती ॥ त्यांसीहोईलसुखप्राप्ती ॥ रूपलावण्यपुत्रपौत्रादि निश्चिती ॥ याचेआचरणेंलाधतील ॥ ४४ ॥ ह्यालोकींसुखप्राप्ती ॥ स्वर्गलोकं उत्तमगती ॥ ऐसेंव्रतहेंअसेनिगुती ॥ व्रतांमध्येंअतिउत्तम ॥ ४५ ॥ सकलसंप त्तीदायक ॥ स्त्रियांसीअसेपापनाशक ॥ धनयशपुत्रआणिस्वर्गसम्यक ॥ मासहोतीयुधिष्ठिरा ॥ ४६ ॥ ऐसेंहेंऋषिपंचमीआख्यान ॥ जेपठणअथवाक रितीश्रवण ॥ त्यांचेपातकांचेंदहन ॥ होऊनिनिश्चितसद्गतीपावती ॥ ४७ ॥ ॥ इति श्रीभविष्योत्तरपुराणेऋषिपंचमीव्रतकथासंपूर्णा ॥ श्रीशंकरार्पणमस्तु ॥ ॥




## अथवामनद्वादशीकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ ॐनमोजीपुराणपुरुषा ॥ योगीजनमानसहंसा ॥ त्रिगु- णातीतामायाविलासा ॥ सर्वाध्यक्षाकृपाकरीं ॥ १ ॥ तूंचिसर्वजगद्वंद्य ॥ माया तीतस्वसंवेद्य ॥ आणिब्रह्मादिकांतूंआराध्य ॥ म्हणोनिआद्यतुजम्हणती ॥ ॥ २ ॥ जगदुत्पत्तिस्थितिसंहार ॥ तूंचिकरिसीवारंवार ॥ म्हणोनतूंतेभक्तस- मग्र ॥ जगदीश्वरम्हणतीपैं ॥ ३ ॥ जेकांत्वत्पदींकरितीनमन ॥ त्यांसीजगींकं रिशीधन्य ॥ म्हणोनमीतवचरण ॥ मनोभावेंवंदितों ॥ ४ ॥ आतांवामनजयं

तीव्रतकथा ॥ सांगतोंभविष्यपुराणोक्ता ॥ तीचश्रोतींसावधचित्ता ॥ करूनि पांऐकिजे ॥५॥ नैमिषारण्यामाजीसूत ॥ सांगतेझालेशौनकांमत ॥ कींधर्म राजजोकुंतीसुत ॥ तयासांगेश्रीकृष्ण ॥६॥ सर्वदैत्यांमाजीथोर ॥ बलिनामा- विरोचनपुत्र ॥ भगवद्भक्तदानशूर ॥ बलअपारजयाचें ॥७॥ तयानेंपूर्वीसर्वनि र्जर ॥ जिंकूनिकेलेपरमजर्जर ॥ आणिमहारत्नादिधनसमग्र ॥ हिरोनिनेलेंस्व गृहासीं ॥८॥ मगइंद्रादिसर्वदेवगण ॥ जेंक्षीरसागरींचेंनिधान ॥ तयाजाऊनि- यांतूंशरण ॥ प्रार्थितेझालेदीनवाणी ॥९॥ देवम्हणतीजगद्रक्षका ॥ अनंतकोटि ब्रम्हांडनायका ॥ शरणागतवरदायका ॥ भक्तिप्रियादीनबंधू ॥१०॥ जेतुजसीं होतीअनन्यशरण ॥ तयांवरीतूंकृपाकरून ॥ सर्वमनोरथकरिसीपूर्ण ॥ ऐसेंव्र ततुझेंसदा ॥११॥ आणिआपुल्यानानासंकटांसीं ॥ तूंचिसदानिवारणकरिसी ॥ परीआजआम्हांनिर्जरांसीं ॥ महासंकटउद्भवलें ॥१२॥ सर्वदैत्यांमाजीथोर ॥ ब लिनामाविरोचनपुत्र ॥ भगवद्भक्तदानशूर ॥ बलअपारजयाचें ॥१३॥ तयानेंपु र्वीसर्वनिर्जर ॥ जिंकूनिकेलेपरमजर्जर ॥ आणिमहारत्नादिधनसमग्र ॥ हिरो निनेलेंस्वगृहासीं ॥१४॥ इंद्रपदघेतलेंहिरोन ॥ सर्वलोकपालकरितीभ्रमण ॥ रा हावयानाहींकोठेंस्थान ॥ म्हणोनिशरणतुजलागीं ॥१५॥ तरीआतांहेपरमजाव- रा ॥ कृपाकरोनीसर्वनिर्जरां ॥ संकटापासुनशीघ्रउद्धारा ॥ हीचआमुचीप्रार्थना ॥१६॥ तुजवांचोनीआम्हासिगती ॥ कोठेंचिनाहींयाजगतीं ॥ हेंजाणवातूंरमा पती ॥ सर्वांगनीतूंचपैं ॥१७॥ ऐसेंदेवांचेंबहुतकष्ट ॥ ऐकोनियांवैकुंठपीठ ॥ बोल ताझालाउत्कृष्ट ॥ वचनतोवाक्यज्ञ ॥१८॥ म्हणेहोइंद्रादिसर्वनिर्जर ॥ जोतुम्हींक थिलादैत्येंद्र ॥ बलीनामामहावीर ॥ तोमजविदितअसेपैं ॥१९॥ तोसत्यसंधबल वंत ॥ भावितात्माशांतदांत ॥ मद्गतप्राणमद्भक्त ॥ आणिजितेंद्रियसर्वदा ॥२०॥ तोप्रजापतीसमानजाण ॥ सर्वप्रजांचेंकरितोरक्षण ॥ त्याचेवर्णावयासर्वगुण ॥ कोणीसमर्थदिसेना ॥२१॥ तुम्हींपेउर्नामजकारणें ॥ तयाचेंकयिलेंगाऱ्हाणें ॥ प रीतपस्येचेंफलभोगणें ॥ तपस्व्यासींअवश्यपैं ॥२२॥ तोदैत्यांमाजीश्रेष्ठबली ॥ त्याणेंतपस्याबहुतकेली ॥ यास्तवसंपत्तीप्रासझाली ॥ इंद्रपदादितयासी ॥२३ ॥ परीतुम्हीदेवगण ॥ अनन्यभावेंमजसीशरण ॥ म्हणोनितुम्हांझालोंप्रसन्न ॥

संकटनिवारणकरीनमी॥ २४॥ बलीदैत्याच्यातपाचाअंत॥ कांहींकालेंहो-
ईलनिश्चित॥ तेव्हांतयासिजिंकूनियथार्थ॥ संपत्तीदेईनतुम्हासी॥ २५॥ तु
म्हीअसावेंस्वस्थमानसीं॥ ऐसेंऐकतांविष्णुवचनासीं॥ इंद्रादिदेवस्वस्थानासी॥
आनंदेंसींपरतले॥ २६॥ कृष्णाम्हणेरेयुधिष्ठिरा॥ मगपतिव्रतांमाजीअग्रेसरा॥
कश्यपऋषीचीअदितीदारा॥ पतिसेवेतत्पर॥ २७॥ तिच्याशरच्चंद्रशद्बमान-
सीं॥ हेतुझालाकींवैकुंठवासी॥ शेषशायीआपुलेकुशी॥ पुत्रस्वेंव्हावाउत्पन्न
॥ २८॥ ऐसाउपजतांचिहेत॥ उग्रतपस्यार्तीआचरत॥ मगवैकुंठवासीरमाकांत
प्रसन्नहोउनीप्रगटला॥ २९॥ आणिम्हणेगेकश्यपभार्ये॥ सर्वपतिव्रतांमाजी
वर्ये॥ याउग्रतपेंअतिआर्ये॥ झालोंआहेंप्रसन्नमी॥ ३०॥ तरीजोअसेलमनो
रथ॥ तोकथींतूंमजप्रतींत्वरित॥ पूर्णकरीनमींयथार्थ॥ सत्यसत्यजाणपां॥
३१॥ ऐसेंऐकतांभगवद्वचन॥ अदितीहोउनीआनंदपूर्ण॥ करितीझालीसाष्टां
गनमन॥ अतिप्रेमेंकरूनी॥ ३२॥ म्हणेदीननाथालक्ष्मीवरा॥ भक्तमनोरथदाता
रा॥ प्रसन्नझालासीमजसीरवरा॥ तरीतूंहोईमत्पुत्र॥ ३३॥ ममोदरींतूंजन्मा-
सियेणें॥ हाचिमनोरथमजकारणें॥ म्हणोंनिकायावाचाआणिमनें॥ शरण
आलेंतुजलागीं॥ ३४॥ ऐसेंतियेचेंभक्तिपूर्ण॥ श्रवणकरितांउत्तमवचन॥ तथा
स्तुम्हणोनीरमारमण॥ अंतर्धानपावला॥ ३५॥ मगअदितीसानंदचित्त॥ जाती
जाहलीस्वगृहाप्रत॥ आणिकांहींकाललोटतांयथार्थ॥ गर्भिणीजाहलीपति
संगें॥ ३६॥ मगनवमासांनींहोतांप्रसूत॥ बरीसलक्षणींझालासुत॥ सत्पुत्ररू
परमाकांत॥ स्वयेंजाणउद्भवला॥ ३७॥ ऱ्हस्वपादऱ्हस्वशरीर॥ ऱ्हस्वजंघोरूऱ्हस्व
केशर॥ ऱ्हस्वपाणीकृशोदर॥ महाशिरतेंसाची॥ ३८॥ ऐसाझालादेखूनितन-
य॥ हर्षितझालीअदितीमाय॥ सर्वदैत्यांसीसुटलेंभय॥ देवनिर्भयझालेपैं॥
३९॥ मगस्वयेंकश्यपऋषी॥ जातकर्मसंस्कारासी॥ करिताझालात्याविधी
सीं॥ द्रव्यअपारवांटित॥ ४०॥ कश्यपऋषीद्वादशान्हीं॥ नामकरणसंस्कार
करूनी॥ वामनऐसेंनामठेवूनी॥ पालकारोपणकरवीतसे॥ ४१॥ पुढेंदिवसें
दिवसवामन॥ शुक्लपक्षींच्याचंद्रासमान॥ वृद्धीपावतांआनंदेंमन॥ इंद्रा
दिसर्वदेवांचें॥ ४२॥ पुढेंअष्टमवर्षहोतांप्रास॥ स्वयेंविधानेंयेऊनयथार्थ॥ व्रत

बंधकरूनीविधियुक्त ॥ महामंत्रउपदेशिला ॥ ४३ ॥ ब्रम्हचर्यव्रतउत्तम ॥ उपदेशिलेतयाचेधर्म ॥ तैमेखळादंडकौपीनचर्म ॥ कमंडल्वादिधारणकरीतो ॥ ४४ ॥ इकडेबलिदैत्यधर्मनिष्ठ ॥ परमप्रतापीअतितेजिष्ठ ॥ अश्वमेधादियज्ञवरिष्ठ ॥ निरंतरकरीतसे ॥ ४५ ॥ याचकयेउनीकरितीयाचन ॥ तयांसिविपुलदेऊनिधन ॥ सर्वमनोरथकरीतोपूर्ण ॥ विमुखकोणनव्हेची ॥ ४६ ॥ जेंजेंमागतीसदाब्राम्हण ॥ तेंतेंतयांसीदेतसेजाण ॥ नाहींऐसेंकदापिवचन ॥ मुखांतूनीनिघेचिना ॥ ४७ ॥ कित्येकांसीभूमिदानदेई ॥ कित्येकांसीसहस्त्रगाई ॥ आणिअन्नसत्रेंकित्येकठायीं ॥ निरंतरठेवितसे ॥ ४८ ॥ श्रीमदीश्वरप्रीत्यर्थ ॥ नानादानेंकरीसतत ॥ त्यादानोदकांच्यानद्यावाहत ॥ निरंतरपृथ्वीवरी ॥ ४९ ॥ बलिदैत्यमत्तगजेंद्र ॥ नद्दानोदकवाहेनिरंतर ॥ दानगंधार्थविप्रभ्रमर ॥ निरंतरझेंपावती ॥ ५० ॥ ऐसातोदानशूरदैत्यपती ॥ सर्वत्रपसरलीतयाचीकीर्ति ॥ मगदेवयथार्थवामनमूर्ती ॥ बलीप्रतींचालिला ॥ ५१ ॥ दंडकमंडलूकृष्णाजिन ॥ जटामस्तकींउपवीतधारण ॥ कटीमेखळाकुशकोपिन ॥ ब्रम्हचर्यव्रतस्थ ॥ ५२ ॥ ऐसावामनमूर्तीमुरारी ॥ पातलाअसेबलीच्याद्वारीं ॥ तोंतयादेखुनीबळीसत्वरी ॥ अतिप्रेमेंधाविन्नला ॥ ५३ ॥ सन्निधयेउनीधरिलेचरण ॥ भक्तीनेंकेलेंसाष्टांगनमन ॥ आणितयातेंहस्तजोडून उत्तमासनीबैसविलें ॥ ५४ ॥ मगउत्तमसुगंधजलें ॥ त्याबटूचेदोनपायधुतले ॥ तें क्षालनोदकशिरींवंदिलें ॥ ईशादिकांअप्राप्यजें ॥ ५५ ॥ आणिअर्घ्यादिषोडशोपचार ॥ यथाविधीपूजासमग्र ॥ सारोनिपाउभयकर ॥ जोडूनिम्हणेबटूसी ॥ ५६ ॥ भवद्दर्शनेंझालोंमीधन्य ॥ परीकिमर्थझालेंआगमन ॥ तेंसांगिजेयादासाकारण ॥ पूर्णकरीनमनोरथ ॥ ५७ ॥ ऐसेंऐकुनीबलीचेंवाक्य ॥ वामनरूपीकश्यपतनय ॥ हर्षभरितबोलताहोय ॥ त्रिपादभूमीपाहिजे ॥ ५८ ॥ आणिककांहींधनसंपत्ती ॥ राज्यरुद्धीअथवाहस्ती ॥ अश्वरथनकोचिनिश्चितीं ॥ वामनकोदेशनको ॥ ५९ ॥ वेदाभ्यासकरणेंहाहेत ॥ परीस्थलनाहीं कींअभ्यासार्थ ॥ यास्तवदैत्यातुजप्रत ॥ त्रिपादभूमीमागतों ॥ ६० ॥ ऐसेंऐकिलेंवचनबटूचें ॥ परीवर्मनजाणो ... ॥ म्हणोलपुनःसुंदरत्याचे ॥ विनयीतसेबटूसी ॥ ६१ ॥ म्हणेम्यिक ... गी ॥ बटुवातूंयेउनियांव्हजप

ती॥मागतोसीत्रिपादजगती॥ म्हणोनिदुःखवाटतें॥६२॥ क्षुधातुरक स्पतरूसी॥ म्हणेतूंकोंडादेईमजसी॥ तुवांगतीकेलीतैसी॥ म्हणोनिदुःखवाटतें॥६३॥ कामधेनूचीपडलांगांठी॥ म्हणेकांजीदेईप्राशनासाठीं॥ तैसीगतकेलीसरखोटी॥ म्हणोनिदुःखवाटतें॥६४॥ क्षुधातुरासीक्षिरसागर॥भेटतांम्हणेदेईभाकर॥ तैसीगतकेलीसपरिकर॥ म्हणोनिदुःखवाटतें॥६५॥ दरिद्यासिदेतांचिंतामणी॥ दूरचीदेईभिरकाबुनी॥ तैसेंकेलेंसिल्वां-जाणीं॥म्हणोनिदुःखवाटतें॥६६॥ नरीआतांदेशअथवाग्राम॥ घेऊनिचालवींस्वधर्मनेम॥ ऐसेंबोलोनीबलिपादपद्म॥ बलिराजेंवंदिले॥६७॥मगव टुम्हणेरेदैत्यपती॥ मीआहेंब्रम्हचर्यव्रती॥ मद्धर्मभिक्षामागूनिनिश्चिती॥उदरपोषणकरावें॥६८॥ नरीधर्मरीतींभिक्षामागून॥ करीनमीस्वोदरभरण॥ परीनाहींसत्तेचेंरुस्थान॥ म्हणोनचितेंमजदेई॥६९॥ मत्रिपादभूमीव्यतिरिक्त॥आहेतेंमजशिवस्यपयार्थ॥हेंचिमाझेंआहेनिश्चित॥ सत्यजाणबलिराया॥७०॥ ऐसेंबटूचेंऐकतांवचन॥ बलिदैत्यम्हणेदेतोंदान॥ मगपाचारीस्वगुरूकारण॥ दानसंकल्पसांगावया॥७१॥ तेव्हांदैत्यगुरुशुक्राचार्य॥आसनीं बैसोनीबोलेधैर्य॥ रायातुझेंहेंकायधैर्य॥ स्वहस्तेंस्वनाशकरितोसी॥७२ अरेहामुरारीलक्ष्मीजानी॥ इंद्रादिदेवकार्यालागुनी॥ मनुष्यवेषेंबटुहोउनी पातलाअसेसत्यपें॥७३॥ हावामनस्वार्थकामी॥ यातेंदेशीतूंत्रिपादभूमी॥ तरीहातुजकारणेंपाताळधामीं॥ घालीलसत्यदैत्येंद्रा॥७४॥ मगम्हणेतो बलिदैत्य॥ तुम्हींबोलतांहेंसत्य॥ असेलपरीवचनअतीत्य॥ कैसावर्तूंगुरुवर्या॥७५॥ जोमजप्रतीआलाअर्थी॥ त्याचीपुरवितोंमीआर्ती॥ ऐसेंअसोनिहेभूम्यर्थी॥ कैसेंविमुखघालवूं॥७६॥ नकारशब्दहामाझाशत्रु॥तयाचाआश्रयकेसाकरूं॥ हेंचिसांगावेंतुम्हीगुरू॥ शत्रूसंगतीकरावीकीं॥ ७७॥ शत्रूचादूरत्यागकरावा॥ मित्रसन्निधठेवावा॥ ऐसाशास्त्राचाअसे बोलवा॥ म्हणानिशत्रूत्यागिला॥७८॥ आणिदेतोंम्हणोनीआशालावुनी. नदेईजोयाचकालागुनी॥ त[illegible]जअधःपतनीं॥ दुःखभोगितीआकल्प ॥७९॥ आणिजरीहाबटूल[illegible]पती[illegible]तोयाचनामजप्रती॥ तरीमझा-

ग्यउदेलें निश्चिती ॥ पूर्वपुण्येंकरूनी ॥ ८० ॥ जरी हरी होतो मज सीं याचक ॥ तरी अवश्य दान देऊनि देख ॥ करितों या जन्मातें सार्थक ॥ धन्य होतों त्रिजगतीं ॥ ८१ ॥ ऐसें बोलोनि दैत्याधिप ॥ करोनियां दानसंकल्प ॥ त्रिपादभूमिदानार्थ आप ॥ वामनहस्तीं सोडितसे ॥ ८२ ॥ तों शुक्राचार्य दुःखित भारी ॥ नीर न पडावें वामनकरीं ॥ ऐसा हेतु धरोनि अंतरीं ॥ काय करितें ऐका ॥ ८३ ॥ बलीनें भूदानासाठीं ॥ हस्तीं घेतली झारी मोठी ॥ शुक्राचार्य तियेच्या तोटीं ॥ सूक्ष्मरूपें राहिला ॥ ८४ ॥ हें त्रिपादपर्याप्त भूदान ॥ वामनशर्मब्राम्हणा कारण सदक्षिणाक देतों म्हणोन ॥ हस्तीं नीर सोडितसे ॥ ८५ ॥ परी शुक्र बैसला झारीमुखीं ॥ यास्तव नीर न पडे हस्तकीं ॥ तेव्हां बलिराजें शलाका निकी ॥ घातली तोटींत झारीच्या ॥ ८६ ॥ त्या शलाकाग्रें करून ॥ शुक्राचार्यांचा एक नयन ॥ फुटतांचि शुक्र तेथून ॥ निघता झाला निमूटपणें ॥ ८७ ॥ तेव्हां पासून एक नयन शुक्राचा अद्यापि असे हीन ॥ यास्तव उत्तम कार्यासि विघ्न ॥ कोणीच कधीं करूं नये ॥ ८८ ॥ जे पुण्यकर्मासी विघ्न करिती ॥ त्यांची होय ऐसी गती ॥ हें च जाणा तुम्ही निश्चितीं ॥ भाविक श्रोतेजन हो ॥ ८९ ॥ असो मग दैत्यपती ॥ जीवन घालोनि वामहस्तीं ॥ म्हणे स्वत्रिपादपर्याप्त जगती ॥ दान दिधली तुज कारणें ॥ ९० ॥ या त्रिपादभूदानें करून ॥ संतुष्ट असो श्रीभगवान ॥ आणि हें होऊं ब्रम्हार्पण ॥ म्हणोनि नमन केलें पैं ॥ ९१ ॥ भगवान वामनरूपी श्रीहरी ॥ प्रचंड स्वरूप धारण करी ॥ आणि एके पाउलें सर्व धरित्री ॥ व्यापिता झाला तत्काळ ॥ ९२ ॥ आणि म्हणे रे दैत्यपती ॥ एक पाउलें भरली सर्व जगती ॥ आतां द्वितीयचरणाची स्थिती ॥ कोठें करावी सांग पां ॥ ९३ ॥ तेव्हां बलि म्हणे रे ब्राम्हणा ॥ सुरलोकाचा असें मी राणा ॥ द्वितीयपाद स्वर्गभुवना ॥ ठेवीं जाण निश्चयें ॥ ९४ ॥ मग वामन ऐकोनि द्वितीय पाय ॥ स्वर्गलोकीं ठेविता होय ॥ तेणें करूनि त्रिदशालय ॥ व्यापिलें असे तत्काळ ॥ ९५ ॥ पुनः पुसे बलिराजासी ॥ कोठें ठेवूं तृतीय पादासीं ॥ तेव्हां दैत्य म्हणे मम शिरसीं ॥ राहिलें पद ठेयावें ॥ ९६ ॥ मग भक्तवत्सल चक्रपाणी ॥ तृतीय पाद तच्छिरीं ठेवूनी ॥ बलिराजासी पाताळभुवनीं ॥ पखियारेंसीं स्थापित ॥ ९७ ॥ [illegible]वक[illegible] जयजयकार ॥ विमानीं कोंदलें सर्वांबर

॥नानावाद्यांचेहोतीगजर॥ नादनमायत्रिभुवनी॥९८॥ साधुसाधुऐसा शब्द॥ सर्वत्रबोलतीदेवर्षिसिद्ध॥ आणिपुष्पवृष्टीकरूनिविबुध॥ येथेंयेनाचती॥९९॥ असोइकडेश्रीवामन॥ बलिराजाचेंसत्यत्वपाहुन॥ म्हणेदैत्यां-झालोंप्रसन्न॥ इच्छितवरमागमजपासीं॥१००॥ ऐसीऐकोनीप्रभूचीवाणी ॥दैत्याधिपतोनमनकरूनी॥ म्हणेबातूंकैवल्यदानी॥ दीननाथभक्तपाळ॥१॥ तूंचिसर्वसृष्टिकर्ता॥ तूंचिपाळकसंहर्ता॥तूंचिभक्तांचियाआर्ता॥ पूर्णकरिसीक्षणांत॥२॥ जेकांकरितीतुझीभक्ती॥ तयांसींदेसीअक्षयमुक्ती॥ ऐसीअसेतुझीशक्ती॥ कोयासमर्थवर्णावया॥३॥ तुझेगुणवर्णितांदेख॥ शीण-लाअसेसहस्रमुख॥ पितामहादिदेवअनेक॥ स्तब्धझालेतवगुणीं॥४॥ स्वरूपतुझेंवर्णितांश्रुती॥ नानादृष्टांतउत्तमघेती॥ परीशेवटींनेतिनेति॥ शब्दकांहींसुटेना॥५॥ गुणअनंतनामेंअनंत॥ रूपेंअनंतमायाअनंत॥ शक्तिअनंतअंनअनंत॥आदिमध्यानानंततुझे॥६॥ ऐसासर्वानंततूंपूर्ण॥ तुझेंकैसेंकरूंमींवर्णन॥ यास्तवधरोनियांमौन॥ साष्टांगेंसींवंदितों॥७॥जरीहेवामनाहृषीकेशी ॥प्रसन्नझालासीतूंमजसी॥ आणिदेतोसीअभीष्टकामनेसी॥ तरीएकमींप्रार्थितों॥८॥ तवदर्शनव्हावेंसतत॥ हाचआहेअंतरींहेत॥ म्हणोनिमाझ्यानिकेतनांत॥ निरंतरत्वांराहिजे॥९॥ मगतथास्तुऐसेंम्हणोन॥ बलिदैत्यासींबोलेवामन॥ याइंद्राचेंहोतांअवसान॥तुजमिळेलइंद्रपद॥११०॥ ऐसेंसांगोनियांगोविंद॥ मगआलालोकपाळांसन्निध॥ म्हणेतुम्हींआतांस्वस्वपद॥ निर्भयेंसींअधिष्ठावें॥११॥ मगइंद्रादिलोकपाळीं॥ साष्टांगेंसींनमनेंकेलीं॥ आणिस्वस्व-पदेंअधिष्ठिलीं॥ भगवदाज्ञेंकरूनी॥१२॥ ऐसाहाविजयवृत्तांत॥ भाद्रपदशुद्धएकादशीतिथ॥तयेदिनींझालायथार्थ॥ म्हणोनिविजयानामतियेचें॥१३॥ यास्तवनीविष्णुकारणें॥ अतिप्रियझालीऐसेंजाणें॥ आणिद्वादशीअसतांपुनःश्रवणें॥ विजयानामतियेचेंही॥१४॥ ऐसेंकथिलेंसत्पुरुषीं॥ जेकोटिगुणोत्तराऐसीद्वादशी॥ नेंसोपवासएकादशीसीं॥ रात्रौविष्णुपूजनकीजिये ॥१५॥ रौप्यमयकिंवासुवर्णाचें॥ काष्ठमयकिंवावंशाचें॥ ऐसेंकरावेंपात्रसाचें स्वकीयशक्त्यनुसार॥१६॥ मगत्यापात्रावरी[illegible]रूप॥ आच्छादनघालूनियां

पवित्र ॥ त्यामार्जीतिलआढकमात्र ॥ कींशेरमात्रघालावे ॥१७॥ तिळाभावींय वगोधूम ॥ शष्कुतिलवाफलेंउत्तम ॥ घालोनिमगमृगचर्म ॥ तदुपरीजाणठेवि जे ॥ १८ ॥ त्याकृष्णाजिनाउपरी ॥ शिखाकमंडलुआणिछत्री ॥ यज्ञोपवीत धारणकर्त्री ॥ अतसीपुष्पसंकाश ॥ ११ ॥ एवंलक्षणींसुवर्णाची ॥ मूर्तीस्था पूनवामनाची ॥ प्रेमभरेंपूजासाची ॥ यथाविधीकीजिये ॥ १२० ॥ आणिरात्रीं कीजेजागरण ॥ मृदंगकांस्यादियादवादन ॥ आणिनानागीतमंगलगायन ॥ कथाश्रवणकरावी ॥ २१ ॥ प्रातःकालहोतांचिप्रास ॥ पुनःषोडशोपचारांपूजायथार्थ ॥ करोनिमगआचार्याप्रत ॥ पीठदानदीजिये ॥ २२ ॥ आणिश्रीवाम नप्रीतीसाठीं ॥ छत्रीजोडादंडलंगोटी ॥ पंचानांव्याशिंकेंछोटी ॥ विप्रबटूसीदी जिये ॥ २३ ॥ आणित्याविप्रबटूकारण ॥ भक्तीनेंघालावेंदहींभोजन ॥ ऐसेंकरि तांव्रताचरण ॥ सर्वपापेंदग्धहोती ॥ २४ ॥ आणिइहलोकींमनोरथ ॥ सर्वपूर्ण होतीयथार्थ ॥ आणिअंतींहोयमुक्तिप्राप्त ॥ व्रतप्रभावेंकरूनी ॥ २५ ॥ एतद्विष यींपूर्ववृत्तांत ॥ कृष्णसांगेयुधिष्ठिराप्रत ॥ तोचश्रोतींसावधचित्त ॥ होऊनियांग्र- किजे ॥ २६ ॥ श्रीकृष्णम्हणेरेराजाधर्मा ॥ असेदेशदाशार्णकनामा ॥ तयाचीदि शापश्चिमा ॥ मरुनामादेशतेथें ॥ २७ ॥ तोमरुदेशअतिघोर ॥ सर्वसत्वांभयान कथोर ॥ तेंसवालुकाभूमीसमग्र ॥ चहूंकडेपसरली ॥ २८ ॥ अर्कप्रतापबहुउ ग्र ॥ तयानेंसंतसहोतीनर ॥ आणिछायेलागींवृक्षथोर ॥ नदीसतीकोठेंची २९ कच्चित्वृक्षजरीअसले ॥ तरीतेकंटकींसदाभरले ॥ शमीबोरीखैरादिवहिले बाभुळीआणिशेवरी ॥ १३० ॥ तयांच्याजातांछायेसीं ॥ कंटकरुततीपायांसी ॥ कोठेंवृक्षगगनासी ॥ स्पर्शकारकदिसताती ॥ ३१ ॥ परीतयांवरीभयंकर ॥ महा कायअसतीवानर ॥ छायेसिजातांतेनिष्ठुर ॥ मारदेतीफडफडां ॥ ३२ ॥ ऐसियाब हुदुःखेंकरून ॥ व्याकुळहोतीसर्वांचेप्राण ॥ परीशोधिल्याअल्पहीजीवन ॥ न मिळेजाणकोठेंची ॥ ३३ ॥ प्रदीप्तहोतांचिदावाग्नी ॥ सर्वहिवनजायजळोनी ॥ तें सीचतेथींचीसर्वमेदिनी ॥ दग्धऐसीदिसतसे ॥ ३४ ॥ आणिजिकडेपाहावेंतिकडे ॥ मृतप्राणीपडलेचहूंकडे ॥ कित्येकांचातो [illegible] ॥ मत्स्यापरीजीवतेथें ॥ ३५ ॥ आणिकोठेंकोठेंपक्षिबालक ॥ गतप्राणपर [illegible] ॥ तयांच्याशोकेंपक्षिअनेक ॥

तडफडोनीपडतीपैं ॥३६॥ तथापितेथेंकांहींप्राणी ॥ पूर्वकर्मेंसजीवजाणीं ॥ जिकडेपाहावेंतिकडे अग्नि ॥ प्रदीप्तऐसादिसतसे ॥३७॥ ऐसातोमरुदेशभया नक ॥ तेथेंहरिदत्तनामावैश्यएक ॥ निजसार्थपरीभ्रष्टदेख ॥ दैववशेंप्राप्तझाला ॥३८॥ तोंतयादेशींअत्यंतमलीन ॥ अतिरुक्षआणिमांसहीन ॥ आणिजयांचेंभ यंकरदर्शन ॥ ऐसेप्राणीदेखिले ॥३९॥ मग होऊनियांभ्रांतचित्त ॥ क्षुधेनेंअतिक र्शित ॥ दशदिशांमाजीभ्रमणकरीत ॥ अंतःकरणींविचारीपैं ॥१४०॥ म्हणेकोठें आतांमाझेंसद्म ॥ कोठेंजनकोठेंग्राम ॥ कोठेंसोयरेदाराउत्तम ॥ कोठेंधनकोठेंमी ॥ ४१ ॥ आणिकोठेंमित्रकोठेंऐश्वर्य ॥ कोठेंदुहिताकोठेंतनय ॥ आणिकोठेंजावें करावेंकाय ॥ ऐसाविचारकरीतसे ॥४२॥ तोंस्नायुबद्धअस्थिचरण ॥ क्षुत्क्षा मनिर्मांसलंबवृषण ॥ आणिइकडेतिकडेधावमान ॥ ऐसापिशाचदेखिला ॥४३॥ त्यापिशाचासींअवलोकुनीं ॥ भयपावलाअंतःकरणीं ॥ मगत्याच पिशाचासंगेंजाणीं ॥ मार्गक्रमणाकरीवैश्य ॥४४॥ पुढेंकरितीजोंगमन ॥ तोंसी तच्छायासुविस्तीर्ण ॥ वटवृक्षाखालींयेऊन ॥ पिशाचसर्वबैसले ॥४५॥ आ णिवैश्यबसलाएकांतीं ॥ मनींउपजलीअत्यंतभीती ॥ आणिविचारकरीआपु ल्याचित्तीं ॥ मजखातीलकींपिशाचहे ॥४६॥ तोंप्रेतस्कंधींआरुढोन ॥ अतिभ यानकज्याचेंदर्शन ॥ आणिबहुभूतींवेष्टिनजाण ॥ स्तुतिकरितीजयाची ॥४७ ॥ आणिमृतप्राणीशवभक्षक ॥ ऐसामहाकायपिशाचएक ॥ वटवृक्षाखालींदे ख ॥ अकस्मातपातला ॥४८॥ मगतोप्रेताच्यास्कंधावरुनी ॥ मेदिनीवरीउत रोनी ॥ येऊनियांवैश्यांतिकजाणीं ॥ उत्तमवाणीबोलतसे ॥ ४९ ॥ पिशाचम्हणे रेहादेश ॥ महाभयंकरअतिकर्कश ॥ येथेंकेसाझालाप्रवेश ॥ तुजलागींसां गपां ॥१५०॥ ऐसेंपिशाचाचेंवचन ॥ ऐकूनिबोलेवैश्यआपण ॥ म्हणेमाझ्यि यादुर्दैवेंकरून ॥ प्रवेशझालापैंयेथें ॥५१॥ मीहरिदत्तनामावैश्यजाण ॥ मातेंला गलीबहुततहान ॥ क्षुधेनेंझालेव्याकुळप्राण ॥ कांहींवचननबोलवे ॥५२॥ आतां नसुचेकांहींउपाय ॥ प्राणरक्षणकेसेंहोय ॥ एतद्विषयींकांहींसोय ॥ मजकारणें सांगपां ॥५३॥ ऐसेंत्याहरि[illegible] ॥ वैश्याचें ॥ दीनवचनऐकूनिसाचें ॥ अतिगंभीर स्वराचें ॥ बोलताझालापिशाच ॥५४॥ म्हणेहरिदत्तपथिका ॥ यापुण्यागव

क्षीरांहूनिमुका ॥ स्वस्थमानसेंदोनघटिका ॥ वाटपाहातबैसेंपां ॥५५॥ ऐसें वचनऐकतां ॥ तैसेंचिवैश्यझालाकरिता ॥ मगमध्यान्हसमयप्राप्तहोतां ॥ आश्चर्यएकवर्तलें ॥५६॥ त्यापुन्नागवृक्षावरूनी ॥ सीतोदासुंदरवारिधारिनी ॥ दध्योदनसयुक्तमेदिनीं ॥ उतरलीअकस्मात ॥५७॥ मगक्षुधातृषेनेंबहुपीडित ॥ ऐसा अतिथीहरिदत्त ॥ याकारणेंदध्योदनयुक्त ॥ उदकजाणअर्पिलें ॥५८॥ मगत्याहरि दत्तेंदध्योदन ॥ भक्षूनिकरितांउदकपान ॥ तत्कालतयाचेंपंचप्राण ॥ समाधानपा वलेपें ॥५९॥ नंतरसर्वपिशाचांसीं ॥ नीरयुक्तदध्योदनासीं ॥ अर्पितांझालाअनुक्र मेंसीं ॥ भागभागेंसींकरूनी ॥६०॥ मगतोसोदकदधिभक्त ॥ भक्षणकरितांचीं सर्वमेन ॥ पावतेंझालेतृप्तिपर्यंत ॥ क्षुधातृषानिरसली ॥६१॥ एवंप्रकारेंत्याअ- तिथीसीं ॥ आणिकसर्वत्यापिशाचांसीं ॥ तृप्तकरुनीस्वस्थमानसीं ॥ शेषआप णभक्षिलें ॥६२॥ ग्रासमात्रशेषान्नभक्षण ॥ आणिअल्पशेषजलपान ॥ करितां तृप्तझालाजाण ॥ प्रेताधिपतत्कालतो ॥६३॥ ऐसेंपाहुनीहरिदत्त ॥ जोडूनियांउ- भयहस्त ॥ प्रश्नकरीत्यापिशाचाप्रत ॥ तोऐकिजेसादरें ॥६४॥ वैश्यम्हणेहेपिशा चवर्य ॥ ममममानसींमहदाश्चर्य ॥ उद्भवलेंकींसान्नतोय ॥ येथेंकोठोनीप्रगटलें ॥६५ आणिहेमहोदरनिर्मांस ॥ बृहत्कुक्षिपिशाचतामस ॥ अल्पान्नेंकरुनीतृप्तिपांस ॥ केसीझालीसांगपां ॥६६॥ आणियानिर्जलदेशीं ॥ कापकारणपावलासीं ॥ ग्रासमा त्रान्नेंतृप्तीकैसी ॥ झालीतुझीसांगपां ॥६७॥ तैसेंचियाअत्यल्पअन्नानें ॥ आणिवना माजीअल्पजीवनें ॥ रक्षिसीतूंप्रेतांकारणें ॥ कैशापरीसांगपां ॥६८॥ ऐसेंत्याह रिदत्ताचेंवाक्य ॥ ऐकूनिबोलेपिशाच्चवर्य ॥ म्हणेहादुष्कर्माचाउदय ॥ प्राप्तझा लामजलागीं ॥६९॥ मींपूर्वजन्मामाझारी ॥ अतिरम्यशाकलनगरी ॥ वैश्यजा तीदुराचारी ॥ दुर्मतीऐसावर्ततसें ॥१७०॥ तेथेंधनाच्यालोभानें ॥ क्षुधाक्रांत- अतिथींकारणें ॥ तिळमात्रहीभिक्षाजाणें ॥ अर्पिलीनाहींकदांही ॥७१॥ आणि तृषाक्रांतासींजीवन ॥ नाहींदिधलेंकदाजाण ॥ परीवेदशास्त्रज्ञएकब्राम्हण ॥ मा झ्याशेजारींराहातसे ॥७२॥ तोविप्रमातेंसवेंघेउनी ॥ श्रवणद्वादशीयोगलक्षुनी ॥ तापीचंद्रभागासंगमींजाणीं ॥ स्नानालागींइंडफडग ॥७३॥ मगतेथेंत्यासंगम जीवनीं ॥ सोपवासीस्नानकरूनी ॥ एकघटेंदध्यनेंभरूनी ॥ दध्योदनसंयुक्त

॥७४॥ उपानद्युग्मआणिछत्र॥ श्रीविष्णूचीप्रतिमासवस्त्र॥ यथाविधीदान समग्र॥ देताझालाविप्रासिंतो॥७५॥ आणिम्यांहीवित्तरक्षणार्थ॥ नक्षत्रस्थब्राम्हणाप्रत॥ सोपवासेंदध्यन्नयुक्त॥ वारिधानदीधलींपें॥७६॥मग तेथुनीमीसब्राम्हण॥ जाऊनियांस्वगृहाकारण॥ कांहींकाळेंकरूनिजाण॥ पंचत्वासींपावलों॥७७॥ पूर्वींवर्तलोंनास्तिकपणीं॥ यास्तवपावलोंपिशाचयोनी॥ फिरतसेंयाघोरकाननीं॥ रात्रंदिनींदुःखितपां॥७८॥ आणिद्वादशी दिनींसमुपोषित॥ हस्तींशिक्यकलशसहित॥ स्नानकरुनीगृहासियेत॥ ऐसापुरोहितदेखिला॥७९॥ श्रुचिर्भूतत्यापुरोहितें॥ श्रवणद्वादशीकथिलीमातें॥ मगव्रतकेलेंम्यांसुविनतें॥ शास्त्रसंमतेंजाणपें॥१८०॥ पूर्वजन्मामाजीवहिलें॥ एवंप्रकारेंकर्मकेलें॥ त्याचेंफळहेंयेथेंउदेलें॥ जेंपाहिलेंतुवांजाण॥८१॥ आणिपूर्वींब्राम्हणाकारणें॥ दानेंकेलींसजलघटानें॥ म्हणोनचियेथेंमजकारणें॥ पिशाचयोनीमाझारी॥८२॥ मध्यान्हायेतांचिसूर्य॥ प्राप्तहोतेंदध्यन्नतोय॥ ऐसाक्रमचालताहोय॥ प्रतिदिवसींहरिदत्ता॥८३॥ आणिपूर्वींकेलें उपोषण॥ यास्तवपूर्वजातिस्मरण॥ आणिदधिभक्तप्रसादेंजाण॥ अक्षयजलान्नमजझालें॥८४॥ एवंप्रकारेंवृत्तांत॥ आणिजेहेदिसतीमहाप्रेत॥ यांहीं पूर्वजन्मींजाणनिश्चित॥ महापापेंकेलींपें॥८५॥ कोणीकेलेंब्रम्हस्वहरण॥ कोणीकेलेंपरस्त्रीगमन॥ कोणीकेलागुरुद्रोहपूर्ण॥ आणिमित्रद्रोहकोणींकेला॥८६॥ यास्तवपावोनीप्रेतयोनी॥ सेवाकरितीमाझ्याचरणीं॥ अन्नोदकदानेंकेलींम्हणोनी॥ मजसेवकमिळालेहे॥८७॥ जोअक्षय्यश्रीभगवान॥ विष्णुपरमात्मासनातन॥ त्याच्याउद्देशेंकरितांदान॥ अक्षय्यहोयतेंसदा॥८८॥ म्हणोनिअक्षय्यअन्नानें॥ प्रेतेंपावतीतृप्तीजाणें॥ तरीप्रेतभावेंयाकारणें॥ दुर्बलपणासोडीना॥८९॥ येथेंतूंअतिथीझालासिप्रास्त॥ तुझीमींपूजाकेलीयथार्थ॥ आणिअन्नोदकदीधलेंतुजप्रत॥ म्हणोनिमुक्तझालोंमीं॥१९०॥ आतांमीपरमगतीप्रत॥ पावेनजाणहेंनिश्चित॥ तरीहेंप्रेतहोतीलपीडित॥ यादारुणदेशामाझारीं॥९१॥ यास्तववैश्यामाझेंमन॥ पिशाचांवरीगुंततेंजाण॥ तरीमजवरीकृपाकरूनं॥ माझेंकार्यएककरीं॥९२॥ नानाधातूंनींशोभिवंत॥ ऐसाहिमवन्नामाजीपर्व-

त ॥ तयाच्यागुहेमाजीवित्त ॥ अतिशयितअसेपैं ॥ ९३ ॥ तरीत्यांनेंयेंकरूनिगमन ॥ काढ़निघेईतेंसर्वधन ॥ मगगयाशीर्षीजाऊनिजाण ॥ श्राद्धेंकरींपिशाचांचीं ॥ ९४ ॥ पृथक्पृथक्प्रेताभिधानें ॥ विष्णुपदींपिंडप्रदानें ॥ करितांप्रेतस्वर्गीगमनें ॥ करितीजाणतत्काळ ॥ ९५ ॥ ऐसेंबोलोनीपिशाचपती ॥ तत्काळझालाम्वर्णकांती ॥ आणिविमानींबैसोनदेवमूर्ती ॥ स्वर्गाप्रतीपैंगेला ॥ ९६ ॥ स्वर्गीगेलापिशाचवर्य ॥ मगतोवैश्यकरीकाय ॥ सर्वप्रेतांसीबोलताहाय ॥ गोत्रेंनामें तुमचींसांगा ॥ ९७ ॥ ऐसेंत्यावैश्याचेंवचन ॥ सर्वहीपिशाचऐकून ॥ गोत्रेंआणिनामेंकथन ॥ करितेझालेपृथक्पणें ॥ ९८ ॥ तींसर्वप्रेतांचींनामगोत्रें ॥ घेऊनियांवैश्यप्रवरें ॥ हिमाचलासियेऊनित्वरें ॥ गुहेमाजीप्रवेशकेला ॥ ९९ ॥ मगतेथींचें द्रव्यघेऊनिसमस्त ॥ स्वगृहासीआलाहरिदत्त ॥ आणित्याधनांतूनकिंचित ॥ आपणासाठींठेवीपैं ॥ २०० ॥ आणिबाकीसर्वद्रव्यघेऊन ॥ वैश्येंकेलेंगयेसींगमन ॥ मगतेथेंत्याप्रेतांचींजाण ॥ श्राद्धेंकेलींपृथक्पृथक् ॥ १ ॥ ज्याज्याप्रेताचेंनामग्रहण ॥ करोनिश्राद्धकरीपूर्ण ॥ तोतोशत्रौदायोनिस्वप्न ॥ वैश्याप्रतीबोलेकीं ॥ २ ॥ म्हणेरेवैश्याहरिदत्ता ॥ तवप्रसादेंकरूनितत्वतां ॥ प्रेतभावासोडूनिआतां ॥ परमगतीसींपावलों ॥ ३ ॥ एवंप्रकारेंप्रेतसमस्त ॥ श्राद्धेंहोतांचीझालेमुक्त ॥ मगबैसोनिपांविमानांत ॥ वैश्याप्रतीबोलिले ॥ ४ ॥ म्हणतीआम्हांसींत्वांतारिलें ॥ प्रेतत्वापासूनमुक्तकेलें ॥ आतांस्वर्गाप्रतीजाऊंसगळे ॥ तुझ्याप्रसादेंकरून ॥ ५ ॥ अरेसाधुजनाचीजीसंगती ॥ व्यर्थनहोयकदापीनी ॥ ऐसेंबोलोनीगगनपंथीं ॥ स्वर्गाप्रतीपैंगेले ॥ ६ ॥ ऐशाप्रकारेंहरिदत्त ॥ धनलोभेंत्यापिशाचांप्रत ॥ सद्गतीदेऊनियांयथार्थ ॥ स्वगृहाप्रतपावला ॥ ७ ॥ मगपुढेंभाद्रपदमासीं ॥ शुक्लपक्षतिथीद्वादशी ॥ श्रवणनक्षत्रतयेदिवसीं ॥ प्राप्तझालेंअसेपैं ॥ ८ ॥ तेव्हांतोश्रवणद्वादशीयोग ॥ प्राप्तझालादेखोनिवणिग ॥ व्रताचरणतो यथासांग ॥ करिताझालाभक्तीनें ॥ ९ ॥ नदीसंगमींस्नानकरून ॥ सोपवासेंविष्णुपूजन ॥ करोनिमगविप्रांकारण ॥ दानेंअर्पितअपार ॥ २१० ॥ मगऐशाप्रकारेंप्रतिवर्षी ॥ आचरणकरितांमहाव्रतासी ॥ अंतींवैश्यस्वर्गलोकासी ॥ आनंदेंसींपावला ॥ ११ ॥ ऐसेंचपूर्वीहेंमहद्व्रत ॥ धुंधुमारादिराजेबहुत ॥ करितेझा

लेम्हणोनीययार्थी॥ स्वर्गामातयांझाला॥१२॥ शक्लपक्षभाद्रपदमासीं॥ बुधश्रवणद्वादशीदिवशीं॥ आचरोनियांव्रतासी॥ दध्योदंनदेतांदानजे॥ १३॥ तयांचेसर्वहीमनोरथ॥ येथेंचिपूर्णहोतीनिश्चित॥ आणिअंतींपावती स्वर्गाप्रत॥ श्रीविष्णूच्यांप्रसादें॥१४॥ सूतम्हणेशौनकासीं॥ श्रवणद्वादशी कथाऐसी॥ कृष्णेंकथिलीपंडुसुतासीं॥ तीचमीतुम्हांकथियेली॥१५॥ हें वामनजयंतीआख्यान॥ जेभक्तीनेंकरितीश्रवण॥ तयांच्याकामनाहोतीपूर्ण ॥वामनाच्याप्रसादें॥१६॥ इतिश्रीवामनजयंतीकथा॥ भविष्योक्तआलीस- मासा॥ येथेंअसेजीन्यूनाधिकता॥ क्षमाकीजेसज्जनीं॥२१७॥ ॥समाप्त॥




# अथअनंतचतुर्दशीकथा.

श्रीगणेशायनमः॥ श्रीगुरुम्हणतीविप्रासीं॥ याअनंतव्रतासी॥ सांगेनएकापरि येसीं॥ पूर्वीहुनीबहुतीआराधिलें॥१॥ युधिष्ठिरपांडुसुत॥ तयानेंकेलेंहेंव्रत॥रा ज्यलाधलेंत्वरित॥ ऐसेंव्रतउत्तम॥२॥ ऐसेंम्हणतांद्विजवर॥ करिताझालानम- स्कार॥ पूर्वीराजापंडुकुमर॥ आणिकराजेकेविझाले॥३॥ श्रीगुरुम्हणतीद्वि जासीं॥ होतेंराज्यपांडवांसीं॥ द्यूतकर्मकौरवांसीं॥ करूनिराज्यहारविलें॥४॥ म गनिघालेवनांतरा॥ कष्टहोतेवर्षेबारा॥ ऐसेंनयायुधिष्ठिरा॥ राज्यतेंपजिलेंप-

रियेसा ॥५॥ नयाघोरअरण्यांत ॥ युधिष्ठिरबंधूंसहित ॥ असेचिंताव्याकुळित ॥ सदाध्यायंश्रीहरी ॥ ६ ॥ समस्तराज्यसांडोनी ॥ वासकेलातिहींवनीं ॥ कौरवकपटकरोनी ॥ नानापरीविघ्नेंकरिती ॥ ७ ॥ सत्वत्यांचेंढळवावयासी ॥ पाठवीलेंदुर्वासास्वी ॥ त्यांसीसर्वोठायींहृषीकेशी ॥ रक्षितसेपरियेसा ॥ ८ ॥ नानातीर्थेंनानाव्रतें ॥ आचरलेनेथेंबहुतें ॥ कष्टतहोतेवनींते ॥ निर्वाणरूपहोऊनियां ॥ ९ ॥ भक्तवत्सलनारायण ॥ तयांचेकष्टपाहून ॥ आलातेथेंठाकोन ॥ जेथेंहोतेपांडुकुमर ॥ १० ॥ कृष्णयेतांदेखोनी ॥ धर्मजायलोटांगणीं ॥ दंडप्रणामकरूनी ॥ वंदितसेतयेवेळीं ॥ ११ ॥ केशआपुलेमोकळी ॥ झाडीकृष्णाचरणधुळी ॥ सर्वोपस्करपूजातयेवेळीं ॥ करीतसेविनयेंसीं ॥ १२ ॥ अर्घ्यपाद्यदेवोनी ॥ गंधाक्षतालावूनी ॥ जींकांपुष्पेंहोतींरानीं ॥ त्यांणींपूजाकरीतसे ॥ १३ ॥ पूजोनियांभक्तीसीं ॥ विनवीतसेपरियेसीं ॥ जयजयाजीहृषीकेशी ॥ भक्तवत्सलाकृष्णनाथा ॥ १४ ॥ जयजयअनंतनारायणा ॥ भवसागरउद्धारणा ॥ कृपाळुवालक्ष्मीरमणा ॥ क्षीराब्धिवासादेवदेवा ॥ १५ ॥ परमात्मापरंज्योती ॥ तूंचिकरिसिउत्पत्तिस्थिति ॥ लयकरविशीतूंचिअंतीं ॥ त्रिमूर्तीतूंचिदेवा ॥ १६ ॥ विश्वाचातूंजिव्हाळा ॥ होऊनिरक्षिसीसकळां ॥ वासतुम्हांसूक्ष्मस्थळा ॥ अणुरेणूतृणकाष्ठेंसीं ॥ १७ ॥ नमनतुझेचरणासीं ॥ त्रिगुणात्मकहृषीकेशी ॥ रजोगुणेंसृष्टीसीं ॥ तुवांरचियेलेंसंयोगें ॥ १८ ॥ दुष्टांचानिग्रहकरणें ॥ साधुजनांतेंसंरक्षिणें ॥ ऐसेंसामर्थ्यवेदपुराणें ॥ बोलतातीप्रसिद्ध ॥ १९ ॥ फेडावयाभूमिभार ॥ घेतलातुंवांअवतार ॥ जडझालायुधिष्ठिर ॥ तरीकांतुवांठेविलें ॥ २० ॥ आपुलाप्राणआम्हासी ॥ म्हणोनिजगींवानिसी ॥ पाठवूनीअरण्यासी ॥ कष्टविलेंनानापरी ॥ २१ ॥ तुझीकृपाहोयज्यासीं ॥ कष्टकैंचेहोतयांसीं ॥ उपेक्षुनीआम्हासीं ॥ अरण्यांतठेविलें ॥ २२ ॥ तुजवांचोनीकोणआम्हासी ॥ आतांसांगूंकवणापासीं ॥ जरीआम्हांउपेक्षिसी ॥ कायकांक्षाजीवाची ॥ २३ ॥ इतुकेवरीभीमसेन ॥ येऊनिधरीश्रीकृष्णाचरण ॥ स्वामीआमुतेंभहुशीण ॥ कांउपेक्षाकरितोसी ॥ २४ ॥ धनंजयतयेवेळीं ॥ वंदीतसेचरणकमळीं ॥ विनवीतसेकरुणाबहाळीं ॥ कृपाळुवामुरारी ॥ २५ ॥ तुझेकृपादृष्टीसीं ॥ होतोंआम्हीअरण्यवासी ॥ घडलेकष्टसापासीं ॥ उबगलोंस्वामीबहुत ॥ २६ ॥ आतांआमुचेकष्टहरण ॥ पांड-

वांचातूंविप्राण ॥ श्रीदारखेंहेंनारायणा ॥ म्हणतसेंतयेवेळीं ॥ २७ ॥ माईदेवीचे
कुमर ॥ करोनियांनमस्कार ॥ द्रौपदीसहितपंडुकुमर ॥ पांचहीवंदिनीनयेवेळीं ॥
२८ ॥ तूंआमुचाकैवारी ॥ आम्हीअसोंअरण्यचारीं ॥ आमुचावंधूराज्यकरी ॥ का-
यउपायआम्हासीं ॥ २९ ॥ तुजसारिखेंछत्रअसतां ॥ आम्हांकष्टअपरिमिता ॥
कवणेप्रकारींस्वस्थचित्ता ॥ राज्यमासीआम्हासीं ॥ ३० ॥ असाउपायआम्हा
सीं ॥ सांगास्वामीहृषीकेशी ॥ ऐसेंम्हणतांकृष्णासीं ॥ कृपाउपजलीमनांत ॥
३१ ॥ कृष्णम्हणेपंडुसुता ॥ सांगेनतुम्हांएकव्रता ॥ तत्काळींप्रसन्नता ॥ राज्यहो
यतुम्हासीं ॥ ३२ ॥ व्रतांमध्येंउत्तमव्रत ॥ अनंतनामविख्यात ॥ आचरावेंतुम्हीनि
रित ॥ राज्यतुम्हांहोईल ॥ ३३ ॥ आतांसांगेनतुम्हांसी ॥ अनंतकवणम्हणसी ॥ स्व
र्गोठायींआपणवासी ॥ अनंतनामआम्हांअसे ॥ ३४ ॥ कळाकाष्टामुहूर्तआप
ण ॥ दिनरात्रीशरीरजाण ॥ पक्षमासवर्षआपण ॥ युगकल्पआदिकरोनी ॥ ३५
॥ अवतरलोंमीनारायण ॥ भूभारउतरावयालागुन ॥ दानवसर्वनिर्दाळून ॥ जन्म
झालावसुदेवकुळीं ॥ ३६ ॥ अनंतमीचजाणमी ॥ संशयनधरींगांमानसीं ॥ त्रि
मूर्तीअवतरलोंसर्वांशीं ॥ ब्रम्हाविष्णुमहेश्वर ॥ ३७ ॥ आपणसूर्यप्रशीदेखा ॥
चतुर्दशभुवनींमीचएका ॥ अष्टवसूआहेंनिनिका ॥ द्वादशार्कआपणची ॥ ३८ ॥
रुद्रअसतीएकादश ॥ सप्तसमुद्रसप्तलोक ॥ पाताळआणिशेष ॥ पर्वतादिकआ
पणची ॥ ३९ ॥ जितुकेवृक्षआहेतिक्षितीं ॥ आकाशींनक्षत्रेंदिसती ॥ दशदिशा-
आहेतख्याती ॥ भूमीआपणम्हणेदेवा ॥ ४० ॥ आणिअसतीसप्तपाताळ ॥ भू
र्भुवादिलोकसकळ ॥ अणुरेणुतृणकाष्ठसकळ ॥ विश्वात्माआपणची ॥ ४१ ॥
नधरींसंशययुधिष्ठिरा ॥ अनंतम्हणजेमीनिर्धारा ॥ विधिपूर्वकपूजाकरा ॥
व्रततुम्हांसीबरवेंअसे ॥ ४२ ॥ विनवीयुधिष्ठिरकरजोडोनी ॥ स्वामीसांगावि-
स्तारोनी ॥ व्रतअसेकवणविधानीं ॥ कवणदानकवणपूजन ॥ ४३ ॥ करावेंव्रतक
वणेदिवसीं ॥ विस्तारोनिसांगेंआम्हांसीं ॥ निरोपावेंवेगेंसीं ॥ पूर्वींकवणेंआचरि
लें ॥ ४४ ॥ कृष्णम्हणेयुधिष्ठिरासी ॥ तूंवांपुशिलेंआम्हासी ॥ शुक्लपक्षींभाद्र
पदमासीं ॥ चतुर्दशीपरियेसा ॥ ४५ ॥ आराधितांअनंतासीं ॥ त्वरितराज्यपावसी
॥ पूर्वींकवणेंकेलेंम्हणसी ॥ सांगेनएकाग्रतत्पर ॥ ४६ ॥ असेपूर्वींकृतयुगेंसीं ॥ सुमं

तुनामाविप्रपरियेसीं ॥ उत्पन्नझालावसिष्ठगोत्रासी ॥ भृगुकन्यादीक्षानारी ॥ ४७ ॥ तेचिझालीसुमंतूचीभार्या ॥ पतिव्रताऔदार्या ॥ कन्यातिसींझालीसुतन- या ॥ नामीतचेंसुशीला ॥ ४८ ॥ सुशीलाकन्यासुमंतुघरीं ॥ नित्यभक्तीसदाचारी ॥ करीनसेवचित्रपरी ॥ सर्वमंगळस्वरूपें ॥ ४९ ॥ गृहशोभाकरीबहुन ॥ नानापा त्रेंतोरणेंकरित ॥ पंचवर्णचूर्णयुक्त ॥ रंगमाळिकासहितदेखा ॥ ५० ॥ स्वस्तिका दिशंखपद्म ॥ चक्रगदादिउत्तम ॥ नमस्कारादिमनोधर्म ॥ देवनार्चनसोपस्करीं ॥ ५१ ॥ वर्तनांऐसेंएकेदिवसीं ॥ झालीप्राप्तदैववशीं ॥ सुमंतुपत्नीपंचत्वासीं ॥ पाव- तीझालीतयेवेळीं ॥ ५२ ॥ सुमंतूसीभार्याहीनत्वझालें ॥ समस्तकर्मराहिलें ॥ पु नःसंधानपाहिजेकेलें ॥ म्हणोनिनारीआणिककेली ॥ ५३ ॥ तिचेंनांवअसेकर्कशा ॥ दुःशीलाआचरणीपरियेसा ॥ नित्यकलहकरीबहुवसा ॥ कन्यापतीसवेंदेखा ॥ ५४ ॥ सुशीलाकन्याउपवरझाली ॥ सुमंतुचिंतीवेळोवेळीं ॥ ऐसीएखादावरमि ळेलजरी ॥ कन्यादानकरीनम्हणे ॥ ५५ ॥ ऐसेंचिंतितांएकेदिवसीं ॥ तयेंआला कौंडिण्यऋषी ॥ विचारितांकन्येसी ॥ सुमंतूनेंअंगिकारिलें ॥ ५६ ॥ कन्यादान गृह्योक्तेंसीं ॥ देताझालाकौंडिण्यासी ॥ मिळोनीझालेदोनीमासीं ॥ आषाढ- आणिश्रावण ॥ ५७ ॥ माताकरीकन्येसींवैर ॥ सापत्नयाचाहाविचार ॥ कौंडि ण्यपुसेसुमंताविचार ॥ जाऊंआश्रमाआणीकठाया ॥ ५८ ॥ सुमंतुबहुदुःखक री ॥ म्हणेस्त्रीनव्हेहीमाझीवैरी ॥ कन्याझालीआतांदुरी ॥ केंचीपापिणीवरि लीस्यां ॥ ५९ ॥ शांतपत्नीनाहींज्याचेघरीं ॥ तयासीअरण्यनाहींदुरी ॥ एकस्वा मींत्रिपुरारी ॥ संसारसागरींबुडालों ॥ ६० ॥ नचलेमाझेंकर्मतपस ॥ नायकेबोल हीकर्कश ॥ कन्याअसतांसंतोष ॥ नित्यदर्शनजामाता ॥ ६१ ॥ ऐसासुमंतुचिंता करी ॥ कौंडिण्यऋषीत्यासीवारी ॥ दोघेतापसीएकेघरीं ॥ असूंनयेथमहानी ॥ ६२ ॥ जाऊंआम्हीआणिकस्थाना ॥ तपकरोनीअनुष्ठाना ॥ भेटीहोईलपुनःपु नः ॥ जवळीचकरूंआश्रम ॥ ६३ ॥ सुमंतुम्हणेकौंडिण्यास ॥ आणिकराहोबा रादिवस ॥ सर्वसिद्धांतत्रयोदशीस ॥ प्रस्थानतुम्हीकरावें ॥ ६४ ॥ सुमंतूचीवि नंतीऐकून ॥ आणिकराहिलेतेरादिन ॥ सुमुहूर्तबरवापाहोन ॥ येरेदिवसींनिघा ला ॥ ६५ ॥ सुमंतुम्हणेकर्कशेसीं ॥ कन्याजाईलपतीसरसी ॥ भोजनघालावेंजा

मानासी ॥ व्रीहिगोधूमदेम्ह्णे ॥ ६६ ॥ पतीनेंसांगतांकायकरी ॥ धांवतगेली गृहाभीतरी ॥ कवाडाघालीदृढरिवळी ॥ पाषाणलावीद्वारवटा ॥ ६७ ॥ कांहीं केलियानुघडीद्वार ॥ सुमंतुविनवीआर्त्तीशिर ॥ सुशीलाकन्याधरीकर ॥ ह्म णेजाऊंतेसींची ॥ ६८ ॥ पाहूंगेलास्वयंपाकघरा ॥ होताकोंडागोधूमकरा ॥ देता झालाकन्यावरा ॥ निरोपदीधलादोघांसी ॥ ६९ ॥ दोघेबैसूनरथावरी ॥ निघालीं कौंडिण्यसंतोषकरी ॥ मध्यान्हकाळीनदीतीरीं ॥ अनुष्ठानालागींउतरले ॥ ७० ॥ ऋषीबैसलाअनुष्ठाना ॥ सुशीलाहोतीतयस्थाना ॥ तरीपाहातसेरम्यवना ॥ स्त्रीसमुदायबहुअसे ॥ ७१ ॥ रक्तांबरवस्त्रांसीं ॥ परिधानकेलेंन्याबहुवसी ॥ व्रतम्ह्णतीचतुर्दशी ॥ कलशपूजापृथकपृथक् ॥ ७२ ॥ पाहोनिसुशीलाहळू हळू ॥ गेलीतयासुवासिनींजवळू ॥ पुसतीझालीवेल्हाळू ॥ कायव्रतकरितांतु म्हीं ॥ ७३ ॥ स्त्रियाम्हणतीसुशीलेसीं ॥ अनंतव्रतआहेपरियेसीं ॥ पूजितांहोयतत्काळेंसीं ॥ सकळाभीष्टपावती ॥ ७४ ॥ सुशीलाम्हणेनारींसीं ॥ कवणविधानसांगामजसीं ॥ कृपाकरोनीविस्तारेंसीं ॥ निरोपावेंअह्मामातें ॥ ७५ ॥ समस्तनारीमिळोनी ॥ सांगतातीविस्तारोनी ॥ ऐकसुशीलेबैसम्ह्णोनी ॥ व्रतआद्यंतनिरोपिती ॥ ७६ ॥ भाद्रपदशुक्लचतुर्दशीसी ॥ व्रतकरावेंपरियेसीं ॥ सांगूंतूजविस्तारेंसीं ॥ ऐकसुशीलेम्हणतातीं ॥ ७७ ॥ रक्तपटसूत्रेंसीं ॥ अनंतकरावापरियेसीं ॥ घेऊनिजावेंनदीसीं ॥ स्नानकरावेंविधानें ॥ ७८ ॥ दिव्यांबरपरिधानुनी ॥ हळदीकुंकुमलावुनी ॥ आणावेकलशनूतनदोनी ॥ गंगायमुनाम्ह्णूनियां ॥ ७९ ॥ उदकभरोनीतयांत ॥ पंचपल्लवरत्नसहित ॥ घालोनिपूजावेत्वरित ॥ षोडशोपचारेंकरूनी ॥ ८० ॥ नानाप्रकारेंआरती ॥ कराव्यागंगायमुनांप्रती ॥ मगपूजावादर्भग्रंथी ॥ शेषशायीकरोनियां ॥ ८१ ॥ दोनीकलशांवरीदेखा ॥ दोनीवस्त्रेंठेवूनिनिका ॥ पद्मलिहूनअष्टदलिका ॥ कलशावरूनीठेवावे ॥ ८२ ॥ तयाकलशांपुढेंदेखा ॥ पंचवर्णीचूर्णरेखा ॥ शंखपद्मादिअनेका ॥ रंगमाळिकाघालाव्या ॥ ८३ ॥ शेषपूजावादर्भांचा ॥ षोडशोपचारींबरवासाचा ॥ ध्यानींध्यासविष्णूचा ॥ शेषशायीम्ह्णोनियां ॥ ८४ ॥ सप्तफणीशेषासीं ॥ सदांविष्णुत्यापाशीं ॥ याचिकारणेंनामतयासीं ॥ अनंतऐसेंकरावेंध्यान ॥ ८५

॥ पिंगलाक्षचतुर्भुजेंसीं ॥ शंखपद्मसव्यकरेंसीं ॥ चक्रगदावामहस्तेंसीं ॥ ऐसी मूर्तीतुवांध्यावी ॥ ८६ ॥ ॐनमोभगवतमंत्रेंसीं ॥ षोडशोपचारेंदभ्रंग्रंथीसीं ॥ आणोनिनव्यादोरकासीं ॥ ध्यानकरावेंमगतेथें ॥ ८७ ॥ अनंतगुणरत्नायमंत्रेंसीं ॥ नवेदोरकठेवावेकलशासीं ॥ पूजाकरावीपुरुषसूक्तेंसीं ॥ अतोदेवामंत्रसहितेंसीं ॥ ८८ ॥ षोडशोपचारेंपूजोन ॥ संसारेतिमंत्रेंदक्षिणकरींबांधोन ॥ नमस्तेवासुदेवमंत्रेंकरून ॥ जीर्णदोरकाविसर्जावा ॥ ८९ ॥ दानाचविष्णुर्भगवानम्ह्णात ॥ वायनद्यावेंगोधूमघृत ॥ प्रस्थगोधूमाचेंसघृत ॥ फळासहवायनद्यावें ॥ ९० ॥ अपूपादिपायसेंसीं ॥ सदक्षिणातांबूलेंसीं ॥ अर्धेंद्यावेंब्राम्हणासीं ॥ अर्धेंआपणभक्षावें ॥ ९१ ॥ ऐसेंचौदावर्षेंदेखा ॥ व्रतआचरावेंविशेखा ॥ उद्यापनकरावेंनिका ॥ चतुर्दशकलशद्यावे ॥ ९२ ॥ ब्राम्हणभोजनकरून ॥ भक्तीनेंकरावेंउद्यापन ॥ कामनाहोईलसंपूर्ण ॥ चतुर्विधपुरुषार्थ ॥ ९३ ॥ ऐसेंसांगतीसुशीलेसीं ॥ व्रतआचरावेंत्वरितेंसीं ॥ आजचिअसेचतुर्दशी ॥ व्रतकरींआम्हांसवें ॥ ९४ ॥ समस्तनारीमिळोनितिसीं ॥ तंतूदेतीअनंतासीं ॥ ग्रंथीचांधोनीचतुर्दशी ॥ पूजाकरविलीआपणासवें ॥ ९५ ॥ कौंडाहोतागोधूमाचा ॥ आणोनदेतअर्धमाचा ॥ वाणदेउनीसुवाचा ॥ निरोपस्त्रियांचाघेतला ॥ ९६ ॥ समस्तास्त्रियांवंदिलें ॥ आलीआपुलेरथाजवळें ॥ अनुष्ठानसारुनी ऋषीतयेवेळे ॥ आलाआपुलेस्त्रियेपासीं ॥ ९७ ॥ चलाम्हणोनीपुढेंजाती ॥ दोघेंबैसोनीगोरथी ॥ जातांपुढेंदेखती ॥ अमरावतीऐसेंनगर ॥ ९८ ॥ नगरलोकसामोरेयेती ॥ चलास्वामीऐसेंम्हणती ॥ तुम्हीयानगरीचेअधिपती ॥ तपोनिधीऐसेंम्हणती ॥ ९९ ॥ नानासमारंभेंदेखा ॥ नगरप्रवेशलेदंपतीऐका ॥ ऐश्वर्यभोगिलेंबहुसुखा ॥ श्रीमदनंतप्रसादें ॥ १०० ॥ ऐसेंकितीदिवसांवरी ॥ होताकौंडिन्यसहनारी ॥ बैसलेअसतांसंतोषेंकरीं ॥ देखताझालाअनंत ॥ १ ॥ ऋषीपुसतीस्त्रियेसीं ॥ कायबांधिलेंहस्तासीं ॥ वशाकरणेंआम्हांसीं ॥ रक्तदोराबांधिला ॥ २ ॥ सुशीलाबोलेव्रतारासीं ॥ अनंतदेवपरियेसीं ॥ याचियाप्रसादेंतुम्हांसीं ॥ ऐश्वर्यप्राप्तझालें ॥ ३ ॥ ज्यांजेदिवसींव्रतकेलें ॥ तेणेंकरूनदेवतुम्हांआलें ॥ पाहाअनंतदेवप्रसन्नझाले ॥ म्हणोनिसांगितलेंतुम्हां

सीं ॥ ४ ॥ ऐसेंवचनऐकूनी ॥ ऋषीकोपलाबहुमनीं ॥ दोरकघेतलाहिरोनी ॥ अग्नीमध्येंटाकियेला ॥ ५ ॥ मगम्हणेकेंचाअनंत ॥ आपणाकेलेंअसेंतपबहुत तेणेंकरोनीऐश्वर्यप्राप्त ॥ झालेंअसेंआम्हांसी ॥ ६ ॥ वशीकरणाकेलेंआम्हा सीं ॥ दोराबांधिलाअनंतम्हणसी ॥ रागेंभरोनीकौंडिण्येंतीसीं ॥ हिरोनीअ-ग्नींतटाकिला ॥ ७ ॥ हाह्मासुशीलाम्हणोनी ॥ अग्नीभीतरीजाउनी ॥ तत्काळ काढोनीस्तपनीं ॥ केलीपूजाअनंताची ॥ ८ ॥ अनंतटाकिलाअग्नीसीं ॥ हानी-झालीऐश्वर्यासी ॥ दरिद्रीझालापरियेसीं ॥ कौंडिण्यतत्क्षणींद्विजवर ॥ ९ ॥ नगरींझालेसर्वशत्रू ॥ गोधनादिकआभरणवस्तु ॥ समस्तनेतेजाहलेतस्करु ॥ दरिद्रआलेंतत्काळ ॥ १० ॥ गृहदग्धझालेंदेख ॥ उरलेंनाहींवस्त्रएक ॥ अवकृपाहोतांश्रीमदनंत ॥ सर्वगेलेंतत्क्षणीं ॥ ११ ॥ मगविचारीमानसीं ॥ म्हणेअनंतारुसलासी ॥ वायांघातलेंअग्नीसीं ॥ मदांधकारेंवेष्टिलों ॥ १२ ॥ आतांकरीन नेमएक ॥ जंवभेटेलक्ष्मीनायक ॥ श्रीमदनंतदर्शनसुख ॥ अन्नोदकनघेई ॥ १३ ॥ म्हणोनिनिर्वाणकरोन ॥ रिघताझालाअरण्यभुवन ॥ भार्येसहितकौंडिण्य सत्वरगतीपरियेसा ॥ १४ ॥ हाहाअनंतम्हणत ॥ जातअसेअरण्यांत ॥ तंवदेखिलावृक्षचूत ॥ पुष्पींफळींभरलासे ॥ १५ ॥ कीटकादिपक्षिजाती ॥ कोणी त्यासींनातळती ॥ कौंडिण्यपुसेतयांप्रती ॥ अनंतासींदेखिलेंका ॥ १६ ॥ वृक्षम्हणेब्राम्हणासी ॥ दृष्टीनपडेचीआम्हासी ॥ तुवांजरीदेखिलासी ॥ आम्हांनिमित्तसांगावें ॥ १७ ॥ ऐसेंऐकोनीपुढेंजात ॥ धेनूदेखिलीवत्सासहित ॥ हिंडतसेतृणांत ॥ तोंडेंनयेपक्षावया ॥ १८ ॥ द्विजम्हणेतियेसीं ॥ जरीतुवांअनंतदेखिलासी ॥ कृपाकरीवोआम्हासीं ॥ धेनूम्हणेतयालागीं ॥ १९ ॥ नाहींदेखिलेंअनंतासीं ॥ तुम्हीभेटलांजरीतयासीं ॥ मजविषयींसांगाव्या सीं ॥ धेनुम्हणेतयासीं ॥ २० ॥ ऐसेंऐकोनिद्विजवर ॥ पुढेंजातांदेखिलावृषभघोर ॥ तयातेंपुसेद्विजवर ॥ अनंतादेखिलेंकींसांगा ॥ २१ ॥ वृषभम्हणेतयासीं ॥ नेणोंआम्हीअनंतासीं ॥ जरीतुम्हीदेखिलेंत्यासी ॥ आम्हांविषयींविनवावें ॥ २२ ॥ पुढेंजातांकौंडिण्य ॥ सरोवरेंदेखनेत्रींदोन ॥ उदकमिळालेंअन्योन्य ॥ हंसादिपक्षीनसेविती ॥ २३ ॥ कमळकुमुदादिपुष्पेंसी ॥ मिरवतीसरोवरें

ऐसीं ॥ द्विजपुसेतयांसीं ॥ अनंतातेदेखिलें ॥ २४ ॥ सरोवरेंम्ह्णतीतयासी ॥ तेणों केंव्हाअनंतासीं ॥ भेटीहोइलजरीतुम्हासीं ॥ आम्हांविषयींसांगावें ॥ २५ ॥ पुढें जातांद्विजवर ॥ देखिलेगर्दभकुंजर ॥ पुसतसेनयांविचार ॥ तेनबोलतीतयासी ॥ २६ ॥ निर्वाणझालातोब्राम्हण ॥ त्यजूंपाहेआपुलाप्राण ॥ अनंतअनंतम्ह्णोन ॥ धरणीवरीपडियेला ॥ २७ ॥ इतुकियाअवसरीं ॥ वृद्धब्राम्हणवेषधारी ॥ जवळीयेउनीव्हाकामारी ॥ उठींउठींम्हणतसे ॥ २८ ॥ कायनिमाकायपुससी ॥ मदनंतकोठेंअसेंविचारिसी ॥ दाखवींनचालआम्हासरिसीं ॥ म्ह्णोनिधरिलेंउजवेकरीं ॥ २९ ॥ उठवूनियांकौंडिण्यासी ॥ घेऊनिजातांअरण्यासीं ॥ नगरीपाहेअपूर्वऐसी ॥ महदाश्चर्यपाहातसे ॥ १३० ॥ घेउनिगेलानगरांत ॥ सिंहासनरत्नखचित ॥ नेऊनि तेथेंबैसवीत ॥ आपणदाखवीनिजस्वरूप ॥ ३१ ॥ रूपदेखोनीतोकौंडिण्य ॥ स्तोत्रकरीअतिगहन ॥ चरणांवरीमाथाठेवून ॥ विनवीतसेकरजोडूनी ॥ ३२ ॥ नमोनमस्तेगोविंदा ॥ श्रीवत्सलासच्चिदानंदा ॥ तुझेंदर्शनमात्रेंदुःखमदा ॥ ह्रोनिजाती सर्वपापें ॥ ३३ ॥ तूंचरेण्यपरतपुरुष ॥ ब्रम्हाविष्णुमहेश ॥ तुझेंदर्शनमात्रेंदोषसमस्त ॥ हरोनिजातीतत्काळीं ॥ ३४ ॥ नमोनमस्तेवैकुंठवासी ॥ नारायणालक्ष्मीविलासी ॥ जगद्व्यापिप्रतिपाळिसी ॥ अनंतकोटिब्रम्हांडनायका ॥ ३५ ॥ पापीआपणपापकर्मी ॥ तेणोंतुझीभक्तिधर्मी ॥ पापात्मापापसंभवम्हणोनी ॥ क्षमाकरींदेवराया ॥ ३६ ॥ तुजवांचोनीआपण ॥ तेणेंअन्यदेवताकोण ॥ याचिकारणेंधरिलेचरण ॥ शरणागतमीतुम्हासी ॥ ३७ ॥ आजिमाझाजन्मसफळ ॥ धन्यमाझेंजिणेंसकळ ॥ तुझेंदेखिलेंचरणकमळ ॥ भ्रमरहोउनीवासघेतों ॥ ३८ ॥ ऐसें स्तविलेंकौंडिण्यानीं ॥ ऐकोनिप्रसन्नझालातत्क्षणीं ॥ भक्तजनचिंतामणी ॥ वरअभयदेताझाला ॥ ३९ ॥ धर्मबुद्धीदरिद्रनाशन ॥ शाश्वतवैकुंठभुवन ॥ ऐसेंदेतश्रीनारायणें ॥ ऐकयुधिष्ठिराम्हणेकृष्ण ॥ १४० ॥ पुनरपीद्विजविनवीनिका ॥ म्यांदेखिलेंआश्चर्यऐका ॥ अरण्यांतवृक्षएका ॥ महाफळितआम्रदेखिला ॥ ४१ ॥ त्याचींफळेंपक्षीजाती ॥ कोणीत्यासीनानळती ॥ पुढेंयेतांमागुती ॥ देखिलीधेनूसवत्सेंसीं ॥ ४२ ॥ तृणतेथेंअसेसबळ ॥ तिचेंतोंडानयेएकवेळ ॥ आणिकदेखिलींनिर्मळ ॥ सरोवरेंदोन्हीतेथें ॥ ४३ ॥ तींअन्योन्यएकमेकां ॥ मि

ळाळींहोतीतेथेंउदका॥ पुढेंपाहिलाअपूर्वऐका॥ वृषभएकमहाथोर॥४४ ॥त्यानेंमुखानघेग्रास॥सर्वकाळींउपवास॥पुढेंदेखिलासुरस॥ कुंजरएक मदोन्मत्त॥४५॥ ऐसेंचिएकागर्दभासी॥ देखिलेंस्वामीमार्गेसीं॥ पुढेंयेतां संबंधेंसीं॥देखिलादिव्यब्राम्हण॥४६॥ नेणोंयांच्याअभिप्राया॥ विस्ता रोनीभजसांगावा॥ जगन्नाथाकेशवा॥ म्हणोनिचरणीलागला॥४७॥ रू पानिधीनारायण॥सांगतसेविस्तारोन॥ ऐकेंभक्ताकौंडिण्य॥ वृक्षतुवांदे खिला॥४८॥ पूर्वीहोताद्विजवर॥ त्यासीयेतीवेदशास्त्र॥ उन्मत्तपणेंगर्वेथो र॥ शिष्यवर्गानसांगेची॥४९॥ तेणेंपापेंवृक्षझाला॥ तुवांदेखिलेंधेनुवत्सा ला॥ पूर्वींभूमिधेनुनिष्फळा॥ दिल्हीहोतीब्राम्हणासी॥१५०॥ देखिलातु वांवृषभएक॥ पूर्वींविप्रमहाधनिक॥ केलेंनाहींदानादिक॥ तेणेंपापेंऐसी गती॥५१॥ सरोवरेंतुवांदोनी॥ म्हणसीदेखिलींम्हणोनी॥ पूर्वीहोत्यादोघी बहिणी॥ घेतलेंदानआपआपसांत॥५२॥खरम्हणजेतुझाक्रोध॥ कुंजर तोजाणमदांध॥ झालेंतुझेंमनशब्द॥ भेटलोंब्राम्हणआपणची॥५३॥जें जेंतुवांदेखिलें॥ त्यात्यासमस्तांमुक्तकेलें॥ अखिलऐश्वर्यभोगींवाहिलें॥ अं तींजाईस्वर्गास॥५४॥ तुवांकरावातेथेंवास॥ नक्षत्रांमाजीपुनर्वसु॥ ऐसाव रदेतांचहर्ष॥ झालातयाकौंडिण्या॥५५॥ ऐसावरलाधोनी॥ राज्यकेलें बहुदिनीं॥ अंतींगेलास्वर्गभुवनीं॥ ऐकराया युधिष्ठिरा॥५६॥ ऐसीकथा धर्मासीं॥ सांगताझालाहृषीकेशी॥ आचरिलेंभक्तीसीं॥अनंतव्रततयेवेळे ॥५७॥ युधिष्ठिरदंपत्येंसीं॥ व्रतआचरलाभक्तीसीं॥ श्रीमदनंतप्रसादेंपरिये सीं॥ पांडवराज्यपदपावले॥५८॥ आणिकहेंचिभूमीवरी॥ व्रतकेलेंऋषी श्वरीं॥ आचरितानरनारी॥ लाधतीचारीपुरुषार्थ॥५९॥ इतिश्रीअनंतचतु र्दशीव्रत॥ श्रीकृष्णसांगेधर्माप्रत॥ तेंचहेंभाकूनभाषेन॥ श्रोतेतुम्हीपरि सावें॥१६०॥ ॥इतिश्रीअनंतचतुर्दशीव्रतकथासमाप्ता॥ ॥श्रीकृष्णार्पण मस्तु॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु॥ ॥छ॥ ॥ छ॥



# अथगयासुरआख्यानप्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ पार्वतीसम्ह्मणेशंकर॥ पूर्वीगयासुरनामेंअसुर॥ तोरुद्राचा क्रोधघोर॥ उत्पन्नझालातेथोनी॥१॥ केशजयाचेऊर्ध्वआरक्तवर्ण॥ महाभया- नककराळवदन॥ तेणेंब्रम्हादिदेवगण॥ भ्रमणचक्रींपाडिले॥२॥ जैसेआका शींपक्षीहिंडती॥ तैसेंदेवचहूंकडेफिरती॥ इंद्रभ्रांतझालाचित्तीं॥ म्हणेराहाव यासींथारनाहीं॥३॥ मगब्रम्हदेवासींगेलेशरण॥ इंद्रादिसकळदेवगण॥ गया सुरेंगांजिलेंम्हणोन॥ सांगतीगाऱ्हाणेंत्यापासीं॥४॥ झडकरींयत्नकरींआतां॥ मगसंगेंघेउनीसमस्तां॥ शरणगेलेवैकुंठनाथा॥ सकळदेवांसहितपैं॥५॥ जयजयाजीवैकुंठदातारा॥ जगन्निवासाकमळावरा॥ गयासुरेंसकळसुरवरां॥ त्रासदेउनीपळविलें॥६॥ कमलोद्भवासींम्हणेहरी॥ कांहींभयनधरावेंअंतरीं॥ तो असुरकोठेंकायकरी॥ मजझडकरीदावाकां॥७॥ ब्रम्हदेवम्हणेतपदारुण॥ करीत- बैसलानिर्वाण॥ मगसांगातीघेऊनचतुरानन॥ हरीआपणऊठिला॥८॥ ब्रम्हा- आणिहरी॥ जेथेंगयासुरतपकरी॥ तेथेंयेउनीझडकरी॥ पुढेंउभेठाकले॥९॥ ब्र म्हाम्हणेगयासुरा॥ महातपस्विपाचतुरा॥ तुजप्रसन्नझालोंवीरा॥ वरमागेंअ पेक्षित॥१०॥ गयासुरम्हणेतेवेळां॥ तुम्हीदोघेप्रसन्नझालेनिमला॥ तरीपा- हिजेवरदीधला॥ मींमागेनतोतुम्हातें॥११॥ सकळतीर्थेंदेवयत्न॥ गंगापृथ्वीस

येभुवन॥ त्याहुनीमाझेंशरीरपावन॥ करावेंआतांयेवेळीं॥१२॥मगब्रम्हाआ-
णिनारायण॥ बोलतेझालेसंतोषोन॥तुझादेहहोईलपावन॥सर्वोपकाराकार
णें॥१३॥तत्काळशरीरझालेंपवित्र॥मगम्हणतीब्रम्हार्श्रीधर॥तुझियाशरीरा
वरीसाचार॥यज्ञकरावयाठावदेईं॥१४॥गयासुराअवधारीं॥ इतुकेंस्थळनसेधरि
त्रीं॥ तरीतुझियाशरीरावरी॥यज्ञआम्हीकरितोंआतां॥१५॥वचनऐकतांचगया
सुर॥ संतोषलातेणेंअसुर॥म्हणेजन्मसफळआजिसाचार॥नयनसमग्रफळाआ
लें॥१६॥ धन्यधन्यचतुरानन॥ठावमागसीकरावयायज्ञ॥हेंलोकरक्षणाकारण॥हें
मजकळोंआलें॥१७॥ब्रम्हाम्हणेतूंउदार॥तुझेंशरीरहेंपवित्र॥ पृथ्वीउच्छिष्टसम
ग्र॥ म्हणोनिआलोंतुजपासीं॥१८॥गयासुरम्हणेधन्यमाझेंजिणें॥ मजप्रार्थिलें
चतुराननें॥धन्यम्हणोनितेकाळींतेणें॥ शरीरटाकिलेंधरणीवरी॥१९॥जेव्हांगया
सुरखालींपडला॥ पृथ्वीदणाणिलीतेवेळां॥ शेषाचामाथादडपला॥समपातालें
हडबडिलीं॥१२०॥ दिग्गजझालेभयभीत॥ म्हणतीपृथ्वीरसातळाजात॥ कूर्मपा
ठीसरसावित॥वराहदंतसरसावी॥२१॥ दिंडीरवनींउभाहोता॥तेथोनपडिला
पालथा॥ईशान्यकोणींगेलामाथा॥वाराणशीपलीकडे॥२२॥त्याचाकटिप्रदेशस
मस्त॥ दिंडीरवनींपडिलासत्य॥ गोमतीपर्वतापर्यंत॥पायतेथेंलागले॥२३॥म
गशरीरावरीमहायज्ञ॥करिताझालाचतुरानन॥ एकसंवत्सरांतपूर्ण॥पूर्णाहुतीपैं
झाली॥२४॥द्रव्याचेपर्वतलोटले॥ ब्राम्हणसर्वसुखीकेले॥ मगअवभृथस्नानतये
वेळे॥ करिताझालाब्रम्हदेव॥२५॥सकळब्राम्हणींकरूनिस्नाना॥ करितांयज्ञा
सीप्रदक्षिणा॥ तंवशरीरहालविलेंजाणा॥गयासुरेंतधवां॥२६॥तेंदेखोनीऋषी
श्वर॥ म्हणतीउठतोकींअसुर॥ पुढतीआतांभयथोर॥ अनिवारमांडिला॥२७
॥म्हणतीनउरेत्रिभुवन॥ मगहरीचाधांवाकरीचतुरानन॥ करितेझालेसंपूर्ण॥
धांववेगींगोविंदा॥२८॥हाउठतोकींअसुर॥ तूंभक्तवत्सलउदार॥चालचालस
त्वर॥त्रिभुवनहेंबुडवीलहा॥२९॥ गुरांचेपाळजैसेंबहुत॥एकलागुराखीपि
टित॥तैसेदेवसमस्त॥पळतीतयासीदेखतां॥३०॥कींबहिरीससाणाउडतां॥भ
यहोयपक्षीयांसमस्तां॥ कींएकव्याघ्रदेखतां॥अजापळतीचहूंकडे॥३१॥तैं
संचहोईलआतां॥ धांवधांववैकुंठनाथा॥ तोभक्तवत्सलनत्पता॥ मकटलान

त्काळनेथेंची ॥३२॥ हरीम्हणेसकळजेकांपर्वत ॥ धांवोनियारेसमस्त ॥ गयासुराचेपायहस्त ॥ दडपावरीबैसोनी ॥३३॥ ऐसीआज्ञाहोतांतेवेळां ॥ विंध्याचळवेगेंधांवला ॥ तोपृष्ठीवरीबैसला ॥ स्कंधदोनीव्यापुनी ॥३४॥ जोत्र्यंबकब्रम्हगिरीसत्य ॥ तेणेंदडपिलावामहस्त ॥ श्रीशैल्यशेषाद्रिपर्वत ॥ तेणेंसव्यहस्तरगडिला ॥३५॥ पायांवरीगोमंताचळ ॥ दडपोनिबैसलाअढळ ॥ आतांकरिमदेशसकळ ॥ दिंडीरवनामध्येंअसे ॥३६॥ तेंपंढरीसमीपजाण ॥ पुष्पवतीसंगमींपूर्ण ॥ दोनीपायजोडूनिनारायण ॥ कटींहस्तउभाअसे ॥३७॥ द्वारकेहुनीआलावनमाळी ॥ तेव्हांपुष्पवतीसंगमस्थळीं ॥ गाईगोपाळतेवेळीं ॥ उभेकेलेतेठायीं ॥३८॥ तेथेंवाजविलावेणुशब्द ॥ म्हणोनिनामवेणूनाद ॥ गयासुराच्याकटीवरीपद ॥ देउनीउभाठाकला ॥३९॥ सत्यायशींयोजनेंरुंदमाज ॥ गयासुराचाआहेसहज ॥ तयावरीअधोक्षज ॥ पदजोडुनीउभाठाके ॥४०॥ तेथेंसकळहीदेवआले ॥ तेहीभोंवतेउभेराहिले ॥ अद्यापिआहेतपाउलें ॥ वेणुनादीस्वयंभ ॥४१॥ जोडिलेदोन्हीसमपद ॥ तेंचिविष्णुपदसत्यप्रसिद्ध ॥ वरकडपदेंदेवांचींशुद्ध ॥ भोंवतालींउमटलीं ॥४२॥ तेथेंगोपाळवेणुवाजविती ॥ भक्तभाविककांनींऐकती ॥ अद्यापवेणूघेउनरमापती ॥ उभाअसेत्याठायीं ॥४३॥ जेथेंउभेहोतेगाईंचेभार ॥ तेंअद्यापीदिसतीपरिकर ॥ गोपाळांचींपदेंसमग्र ॥ ठायींठायींउमटलीं ॥४४॥ आदींहरीतेथेंआला ॥ मगलक्ष्मीपुढेंठाकला ॥ यावरीपुंडलिकासीवरदीधला ॥ उभाराहिलासमपदीं ॥४५॥ गयासुराचामाजतेथें ॥ म्हणूनिपदजोडिलेपंढरीनाथें ॥ यावरीकाळेंबहुतें ॥ गयासुरेंशिरउचलिलें ॥४६॥ श्वेतकीटकल्पींमागुत्यान ॥ गयासुरेंशिरउचलिलेंपूर्ण ॥ मगमागुतायत्नकरावयाचतुरानन ॥ आरंभीतशिरावरी ॥४७॥ शिरावरीदडपोन ॥ सकळबैसलेसुरगण ॥ इंद्रब्रम्हाउमारमण ॥ ऋषीहीवरीबैसले ॥४८॥ सागरसरितासमस्त ॥ आणिकहीगिरीवरीबैसत ॥ परीमागुतेंशिरउचलितन ॥ नमानीदैत्यतितुक्यांसीं ॥४९॥ मगयमपुरीचीशिळा ॥ यमेंआणिलीतेवेळां ॥ तितुकीशिळाविशाळा ॥ शिरावरीठेविली ॥५०॥ वैवस्वतमनूचेवेळे ॥ मागुतीशिरहालविलें ॥ मगभगवंतेंकायकेलें ॥ मस्तकींपदठेविला ॥५१

॥ ब्रम्हांडाचाभारसमग्र ॥ वरीघालीथोंधर ॥ मगम्हणेतोअसुर ॥ मजठकवि-
लेंदेवांनीं ॥ ५२ ॥ हळूचगयासुरासिमागीतला ॥ माझेमस्तकावरीभारघातला
वेकुंठनायकउभाठाकला ॥ पायदीधलामस्तकीं ॥ ५३ ॥ म्यांवेळोक्यार्पादिलें ॥
॥ देवानींमस्तकींरगडिलें ॥ आतांमाझेंकांहींचनचाले ॥ हरीनेंठेविलापायवरी ॥
५४ ॥ बरेंजन्माचेंसार्थकझालें ॥ परोपकारींशिरवेंचिलें ॥ सकळदेवउभेठाक
ले ॥ यज्ञकेलाचतुराननें ॥ ५५ ॥ मगम्हणेदेवांसमस्तां ॥ जोंवरीसृष्टींसींस्थी-
रता ॥ ह्मांचिवरधामजआतां ॥ चंद्रसूर्यजंवअसती ॥ ५६ ॥ तोंवरीहरीचाचरण
॥ मस्तकींअसोमाझेपूर्ण ॥ सकळसरितादेवगण ॥ असेअसावेंनिरंतर ॥ ५७
॥ माझेशरीरींहरिपदपूर्ण ॥ तेथेंकरावेंगयावर्जन ॥ तेणेंफेडिलेंपितृऋण ॥ तो
झालाधन्यसंसारीं ॥ ५८ ॥ आणिदिंडीरवनांत ॥ स्त्रीरूपेंराहिलाभगवंत ॥ वे
णुनादींसमपदसमस्त ॥ तैसाचियेथेंअसेपें ॥ ५९ ॥ तेथेंजेकरितीगयावर्ज-
न ॥ त्यांचेतृप्तहोतीपितृगण ॥ ब्रम्हहत्यादिपापेंसंपूर्ण ॥ नासतीस्नानमा
त्रें ॥ ६० ॥ तेंगयेसींएकपदा ॥ वेणुनादींसमपदप्रसिद्ध ॥ तेथेंकरितांजेगयाश्राद्ध
॥ दोहींठायींप्रसिद्धफळएक ॥ ६१ ॥ भास्करक्षेत्रप्रयाग ॥ पंढरीवाराणसीसांग
॥ वेणुनादेंगयासमग्र ॥ प्रसादप्रसिद्धजोडिलेजे ॥ ६२ ॥ सुरापानीअभक्षभ
क्षक ॥ महाचांडाळहीसकळिक ॥ तेथेंस्नानकरितांदेख ॥ उद्धरोनीजातीपैं ॥
६३ ॥ अद्यापीगयासुरतेथ ॥ अंगहालवीनिश्चित ॥ तेव्हांपृथ्वीकंपहोत ॥ धन्य
तोगयासुरउदार ॥ ६४ ॥ ब्रम्हादिकदेवआले ॥ ज्याचेपुढेंयाचकझाले ॥ तेणें
नाहींकृपणत्वकेलें ॥ देहदीधलापरोपकारा ॥ ६५ ॥ अद्यापितोआहेजिवंत ॥
उठावयातोसमर्थ ॥ परीनउठेचीसत्यवंत ॥ परोपकारींदेहदीधला ॥ ६६ ॥ गया-
सुरेंथोरकेलीकीर्ती ॥ तरीचपुराणेंमहिमावर्णिती ॥ ज्याचेदेहावरीरमापती ॥
देवांसमवेतउभाअसे ॥ ६७ ॥ ऐसेउदारभक्त ॥ तेचिझालेजीवन्मुक्त ॥ कृपणाते-
चीनिश्चित ॥ बुडोनिगेलेनरकपुरीं ॥ ६८ ॥ कोरडीदावितीभक्ती ॥ आम्हीभक्त
ह्मणोनीमिरविती ॥ गाजराचीतुळणाकरिती ॥ वादपाहतीविमानाची ॥ ६९ ॥
अडक्यासाठींप्राणजात ॥ ह्मणतीआम्हीउदारभक्त ॥ ऐशियादांभिकांभग
वंत ॥ दूरअसेनिश्चयें ॥ ७० ॥ असोहेंगयाख्यान ॥ त्रिकाळकरितांपठण ॥ त्या

त्वेमुक्तहोतीपितृगण॥ श्रवणमात्रेंकरूनियां॥७१॥पावोनियांपितृनिर्थी॥ तेदिवशीजंगयाख्यानऐकती॥ त्यांचेपितृगणउत्तमगती॥ पावतीलसत्यपें॥ ७२॥शिवम्हणेभवानी॥ धन्यकथाहेत्रिभुवनीं॥ नारदसांगेशेषालागुनी॥ मुनींप्रतीसूतसांगे॥७३॥ब्रम्हानंदश्रीधर॥ श्रोतयांविनवीवारंवार॥ हेंगया-ख्यानसुंदर॥ परिसाचतुरभावार्थे॥७४॥ इतिश्रीपांडुरंगमाहात्म्यसुंदर॥ पद्म पुराणींचेंपरिकर॥ अपर्णेसिसांगेत्रिनेत्र॥अष्टमोऽध्यायगोडहा॥७५॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ऐकेंमृडानीकथापवित्र॥ प्रयागतीर्थराजभास्कर॥ वाराण सीपांडुरंगनगर॥ गयासाचारवेणुनादीं॥१॥ नमस्कारुनीपांडुरंगचरणां॥म गनिघावेंगयावर्जना॥ धूतश्राद्धकरूनिजाणा॥ नगरप्रदक्षिणाकरावी॥ २॥ गृहाहूनिनिघावेंहर्षयुक्त॥ जितुकींपाउलेंमार्गींपडत॥ तितुक्यापायन्यांबांधि त॥ पितृगणांसींचदावया॥३॥ अश्वमेधाचेंफळ॥ एकदांकितापाउल॥ पितृ तीर्थीं पिंडदानकेवळ॥ अतिउत्तमजरीघडे॥४॥ अथवापितृपक्षभाद्रपदसमस्त ॥तोहीविशेषअत्यंत॥ कींनिर्दोषमार्गेश्वर॥ कृष्णपक्षसत्य॥५॥ आंवळिया येवढापिंड॥ देतांघडेपुण्यउदंड॥ नाहींतरीनपडेअवघड॥ शमीपत्राप्रमाणें ॥६॥द्रव्यअसलियासिद्ध॥ विधियुक्तकरावेंश्राद्ध॥ किंवाशाखाफलमूलकं द॥ तयांचेंपिंडकरावे॥७॥जरीअसेलसंन्यासी॥ तरीहेंसमर्पावेंपदासी॥ ते- णेंआपुल्याकोटिकुळांसी॥उद्धरिलेंएकदां॥८॥ पदेंविष्णूचींअसती॥ तेथूनप्र वेवाहेभागिरथी॥ तेथेंस्नानकरूनिनिश्चिती॥ ब्रम्हयज्ञकरावा॥९॥ दोनप्रहर झालियातत्वतां॥जावेंगोपाळपर्वता॥ कुंडासमीपस्नानकरितां॥ पितृगणउ ल्हासती॥१०॥ तेथूनिपरतोनियांजावें॥समपदींपिंडदानकरावें॥ मुष्टिभरी तिळटाकावे॥पुण्यवंतसंगमीं॥११॥जेजेनिपुत्रिकमेले॥ अधोगतीएकपड ले॥ त्यांचेंक्रियाकर्मनसेंझालें॥ तेउद्धरतीनिर्वाणीं॥१२॥ सकळझालियाश्राद्ध विधयुक्ती॥मगपूजावीपांडुरंगमूर्ती॥ तेणेंपितृगणपावतीतृप्ती॥ प्रसन्नहोतो भगवंत॥१३॥ मगपुष्पवतीसंगमींजाण॥स्नानकरावेंआवडीकरून॥तेणेंकरू- नीपितृगण॥उल्हासतीसर्वही॥१४॥मगशारावतीसंगमींस्नान॥ तेथेंकरावें पितृतर्पण॥ धर्मलिंगाचेंपूजन॥ करावेंतेथेंसाक्षेपें॥१५॥ धर्मराजेंपूर्वीपेळून॥

तेथेंकेलेंलिंगस्थापन॥ मागुतींसमपदींजाऊन॥ साष्टांगनमस्कारकरावा॥
१६॥ करावेंब्राम्हणसंतर्पण॥ तेणेंतृप्तनारायण॥ पूर्वींगोपासमवेतआपण॥
श्रीकृष्णातेथेंक्रीडले॥१७॥तेथेंबैसोनीमुरारी॥ गोपाळांसींवांटीशिदोरी॥ अ
न्नाचामोटानिर्धारीं॥ अद्यापतेथेंसाक्षीअसे॥१८॥ दहींभातधिरडलाचहूंक
डे॥ सूक्ष्मदिसतीतेखडे॥हुतूतूवडजावांकडे॥ खेळलेतेथेंहरिसवें॥१९॥
वाद्येंवाजतीगंभीर॥ धुमान्याहूमन्यापांवेसुस्वर॥ टाळमृदंगांचे झणत्कार॥
टाळियागजरेंहरिनाम॥२०॥तेथेंमृदंगाचींचामरें॥ झळकतीदोहींकडेसुंदरें॥
हरीवरीपल्लवछत्रें॥ धिमणेगोपाळधरितातीं॥२१॥ मूर्तीसांवळीगोमटी॥ अं
गींकेशराचीउटी॥ तिलकरेखिलाललाटीं॥ रत्नेंमुकुटींझळकती॥२२॥ क
र्णींकुंडलेंमकराकार॥नेत्रआकर्णअतिसुकुमार॥ मंदस्मितवदनसुंदर॥रमा
वरवेणुनादीं॥२३॥वेणूनादींश्रीधरें॥कालावांटिलानिजकरें॥ विमानींबैसो
नीएकसरें॥देवतेथेंपाहती॥२४॥ कमळाकारगोपाळ॥ मध्येंभ्रमरतमा
ळनीळ॥ निधनाभोंवतेसाधकसकळ॥साधावयाजेविबैसले॥२५॥ कीं अ
नर्घ्यरत्नाजवळी॥ बैसेजेसीपरीक्षकमंडळी॥ कनकाद्रीभोंवतीपाळी॥
कुळाचळाचीविराजे॥२६॥ कींमानससरोवरनिर्मळ॥ त्याभोंवतेजेंसेम
रांळ॥ कींवेष्ठूनियांजान्हवीनीळ॥ तपस्वीजेंसेबैसले॥२६॥ श्रीकृष्णासूर्य-
नारायण॥ गोपतेकीरणेंप्रकाशघन॥ कींचंद्रासीवेष्टून॥ उडुगणेंजेसीं
बैसलीं॥२८॥आपल्याशिदोऱ्यासंपूर्ण॥ हरीपुढेंठेविती आणून॥एकींमां
डेआणिलेजाण॥ अंतर्बाह्यगोडजे॥२९॥ एकींआणिलीगुळवरी॥ एका
चीदहींभातभाकरी॥ एकाचीशिळीशिदोरी॥ सोडुनियांबैसले॥३०॥
कोंड्याचीभाकरएकसोडित॥एकाचाताकभातझिरपत॥ एकाचीशिदो
रीविटलीसमस्त॥ चवीनलागेजेवितां॥३१॥सकळांहरीम्हणेतेधवां॥आ
पुलालेवांटेउगेचिजेवा॥ दुसऱ्याचानकाकरूंहेवा॥ मनोभावापासुनी॥३२
॥आपुलेंपूर्वकर्मनीटनाहीं॥दुसऱ्याचाहेवाकरूनकाई॥ जेंपेरिलेंलवलाहीं
॥ बाहेरउगवोनीठसावे॥३३॥ ऐसाकरितांमुरारी॥ तोसोहळादेवपाहतीअं
बरीं॥ तेसमस्तअद्यापीवरी॥ वेणुनादींअसतीपैं॥३४॥ वेणुनादींचासोह-

कापाहून ॥ नेथेंअगत्यऋषिजेदध्योदन ॥ आम्हांसीदीधलेंभोजन ॥ नेणेंकृष्णा संतोषे ॥ ३५ ॥ असोपंढरीसीयेउन ॥ विठ्ठलासीघालावेंलोटांगण ॥ म्हणजेफिटेल पितृऋण ॥ कमलनयनापाहतां ॥ ३६ ॥ नफावेवेणुनादींजावया ॥ तरीहेंत्रिवार पठणकेलिया ॥ नेणेंकेलीअवघीगया ॥ भावेंपूर्णऐकतां ॥ ३७ ॥ धरितांविठ्ठला च्चेचरण ॥ नोसकळफेडीपितृऋण ॥ भक्तकैवारीजगज्जीवन ॥ तारीपूर्णभवा ब्धी ॥ ३८ ॥ अंबऋषीचेंजन्ममरण ॥ आपणफेडीश्रीभगवान ॥ भक्तांसीअ- णुमात्रन्यून ॥ पडोंनेदीमहाराज ॥ ३९ ॥ ब्रम्हानंदपंढरीराणा ॥ शरणरिघजो त्याचियाचरणा ॥ तोमुक्तझालाजाणा ॥ सकळऋणापासुनी ॥ ४० ॥ इति श्रीगयासुरआख्यानसमाप्त ॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥




# अथकोजागरीकथाप्रारंभः

श्रीगणेशायनमः ॥ पूर्वीकोणेएकेदिवसीं ॥ ऋषीपुसतीवालखिल्यांसी ॥ सां

गा व्रतें कार्तिकमासीं ॥ जेणें जंतू सुखावती ॥ १ ॥ ऐकून बाळखिल्य बोलत ॥ को जागरनामें मुख्य व्रत ॥ त्यातें आचरतां प्रणत ॥ उत्तम लोकातें पावती ॥ २ ॥ आश्वि नमासीं जे पौर्णिमा ॥ तेथें रात्रौ पूजिजे रमा ॥ ऐरावतसह इंद्र नामा ॥ नृत्यगीत जागरणें ॥ ३ ॥ द्यावीं दीपदानें बहुत ॥ लक्ष लक्षार्द्ध वा अयुत ॥ सहस्त्र अथवा एकशत ॥ यथाशक्त्या घृतनेलें ॥ ४ ॥ तेसे ग्रामीं पथीं वनीं ॥ गृहीं आरामीं देवा यतनीं ॥ दीप लावुनी विप्रां भोजनीं ॥ तोषवावें क्षीरान्नें ॥ ५ ॥ उपवासी राहोन आपण ॥ करावें नारिकेलोदक प्राशन ॥ रात्रौ करोनी जागरण ॥ अक्षक्रीडा करावी ॥ ६ ॥ मध्यरात्रीसमयीं कमला ॥ कोण जागृत असे त्याला ॥ प्रसन्न होउनी आपुला ॥ वित्तकोश समर्पी ॥ ७ ॥ या करितां दरिद्रीयाणें ॥ हें व्रत कीजे अवश्यपणें ॥ या व्रताच्या सहज आचरणें ॥ वलित ही झाला धनवंत ॥ ८ ॥ हें ऐकुनी ऋषीश्वर ॥ म्हणती वालखिल्यांस सांगा सत्वर ॥ वलित हा कोण थोर ॥ दरिद्री संपत्ती पावे केसा ॥ ९ ॥ वालखिल्य सांगती उत्तर ॥ वलित नामा विप्रवर ॥ पवित्र जाणतो सदाचार ॥ मगधदेशीं वसत से ॥ १० ॥ यान्व नाम रणा समान मानी ॥ देईल ति तुकें ची असे घेउनी ॥ त्याची भार्या नामें चंडिनी ॥ सदा कल्ह माजवतें ॥ ११ ॥ म्हणे माझ्या सर्व बहिणी ॥ देवांगना शा सुवसनी ॥ दिव्य माल्य दिव्याभरणीं ॥ श्रेष्ठ सदा शोभती ॥ १२ ॥ मेल्या दरिद्र्या तुझ्या घरीं ॥ येऊनि पडल्यें मी पदरीं ॥ लज्जा वाटे मला थोरी ॥ लोकां मुख दाखवाया ॥ १३ ॥ जळो जळो रे तुझें घर ॥ निर्धनाचें कुल हें अवर ॥ ऐसें लोकीं ही वारंवार ॥ सांगोनि पति प्रिय न करीती ॥ १४ ॥ मग संकल्प करी दारुण ॥ भर्ता करील जें निरूपण ॥ तें मी विपरीत करीन ॥ लक्ष्मी पावे तों वरी ॥ १५ ॥ ऐसा संकल्प करूनी मनीं ॥ मग ते विप्रास वदे कामिनी ॥ अरे पाषाण बुद्धे नृपसदनीं ॥ चोरी करूनि धन आणीं ॥ १६ ॥ न एकसी तरी तुज ताडीन ॥ ऐसें बोले कठोर वचन ॥ थरथरां कांपे तो ब्राम्हण ॥ काय करील बापुडा ॥ १७ ॥ क्षणे कर्तरी रडे कपाळ ताडी ॥ एके दिवसीं उपास मांडी ॥ एके समयीं पारणें सोडी ॥ सर्व ही भक्ष्य गृहांतील ॥ १८ ॥ पती या गे जरी पाणी ॥ धांवे घेउनी केर सुणी ॥ तापवूनि पांडा हाणी ॥ उगा वया धांवत से ॥ १९ ॥ या प्रकारें कष्टवी ब्राम्हणा ॥ परी तो सोसी तिची यातना ॥ कांहीं न बोले अधि

कचवना ॥ यथालाभें संतुष्ट जो ॥ २० ॥ ॥ **आर्या** ॥ ॥ जीच्या शब्द ध्वनिनें, धीर हि हरण होकि तीक रील पती ॥ ते स्त्री कलह हा येतां, वारण वेडा कि ती करी ल पती ॥ ५ ॥ ॥ **ओवी** ॥ ॥ एवं एकदा श्राद्ध तिथी ॥ पितृपक्षीं आली होती ॥ लक्षूनि तो मंदमती ॥ म्हणे आतां काय करूं ॥ २१ ॥ सामग्री कांहीं घरीं असे ॥ परी श्राद्ध संपादे कैसें ॥ वदतां न ये करितां ऐसें ॥ अनर्थ करील हे दुष्टा ॥ २२ ॥ ऐसा संकटीं पडिला ब्राम्हण ॥ भार्येसन वदे कांहीं भाषण ॥ तंव एक मित्र त्याचा पूर्ण गणेशशर्मा पातला ॥ २३ ॥ त्यासी ही पूर्व वार्ता निवदे ॥ परी उद्विग्न पाहुनी तो न्विवदे ॥ वलिनाम जसंकर कष्टें कूंदे ॥ तुझी चिंता हरीन ॥ २४ ॥ ऐकोनि सांगे हकूंच त्यास ॥ तो म्हणे उपाय असे यास ॥ कथितां विपरीतार्थास ॥ सुपरीत सहजें करील ही ॥ २५ ॥ ऐसी भार्या तुज असतां ॥ मग करिसी किमर्थ चिंता ॥ संसारीं कामिनी या परी मिळतां ॥ हो सी कृतकृत्य धन्य तूं ॥ २६ ॥ ऐकोनि तुष्टला द्विज ॥ - भार्येप्रती बोले गुज ॥ अनर्थकारिके चंडी मज ॥ श्राद्ध करावें न वाटे ॥ २७ ॥ परवां येतसे श्राद्धतिथी ॥ परी वडिलीं जोडिली न संपत्ती ॥ या कारणें माझी मती ॥ श्राद्धाविषयीं न ओढे ॥ २८ ॥ कदाचित् तुला करणें ॥ तरी पाक अकाळीं सारणें ॥ कुत्सित विप्रां आमंत्रणें ॥ देऊनि कदान्नें अर्पावीं ॥ २९ ॥ एवं ऐकोनि पतिवचन ॥ आमंत्रिले श्रेष्ठ ब्राम्हण ॥ यथाकाळीं पाकसाधन ॥ करूनि म्हणे श्राद्ध करा ॥ ३० ॥ ॥ **आर्या** ॥ ॥ ऐकुनि विप्र सुखावे, तत्सौख्याला घडे तदानंत ॥ बोलुनि विपरीतार्थें, संपादी श्राद्ध पिंडदानांत ॥ ३१ ॥ करुनी पिंड विसर्जन, विस्मृतिनें विप्र तो वदे जाये ॥ हे पिंड नेउनी तूं, सत्वर गंगाजलांत दे जाये ॥ ३२ ॥ **ओवी** ॥ तें वांडाली दुष्ट दारा ॥ उचलोनि पिंड समुदाय सारा ॥ रोषें नेउनी सत्वरा ॥ गोचरूपीं टाकिला ॥ ३३ ॥ पाहोनि वलित झाला दुःखी ॥ वचन न बोले कांहीं मुखीं ॥ क्रोधावेशें रुखरुखी ॥ निघता झाला गृहांतुनी ॥ ३४ ॥ संकल्प करी तो ब्राम्हण ॥ लक्ष्मी प्रसन्न झाल्याविण ॥ न करीन मी अन्नप्राशन ॥ फलाहारीं वनीं वसें ॥ ३५ ॥ एवं संकल्प करूनि मनीं ॥ जाता झाला महत्काननीं ॥ फिरे वल्कलें नेसोनी ॥ तंव नदीतीर आढळलें ॥ ३६ ॥ तेथें राहिला दिवस वीस ॥ आश्विन पौर्णिमेचा जो दिवस ॥ कोजागर करणें ज्यास ॥ तो चि आला ते काळीं ॥ ३७ ॥ का

लागलातुझेपाईं ॥ ॥ अभंग ॥ ॥ नामगाऊंनामध्याऊं ॥ नामविठोबाल्लावाहूं ॥१॥ आम्हीदैवाचेदैवाचे ॥ दासपंढरीरायाचे ॥२॥ टाळविणाघेऊंहातीं ॥ विठुरा जगाऊंगीतीं ॥३॥ नामाम्हणेलारवोलिसदा ॥ नित्यवाहातसेगोविंदा ॥ ४ ॥ ॥ भजन ॥ ॥ जयजयरामकृष्णारामराम ॥ सीतारामरामराम ॥ ॥ अभंग ॥ आपुलियाबळेंनाहींबोलवत ॥ सखाभगवंतवाचात्याची ॥१॥ साळुंखीतेंके सीबोलेमंजुळवाणी ॥ शीकवीताधणीवेगळाची ॥२॥ कायम्यांपामरेंबोला वींउत्तरें ॥ परित्याविश्वंभरेंबोलवीलें ॥३॥ तुकाम्हणेत्याचीकोणजाणेकळा ॥ वागवीपांगुळापायांवीण ॥४॥ ॥ भजन ॥ ॥ जयजयनारायणहरी ॥ ॥ अभंग ॥ ॥ पंढरीपंढरी ॥ विठूरायाचीनगरी ॥१॥ भंवताभींवरेचावेढा ॥ मध्यें पंढरीचाहुडा ॥२॥ गरुडफीरेचहूंकोनीं ॥ टाळमृदंगाचीध्वनी ॥३॥ ऐसेंस्थळ- आहेकोठें ॥ तुकयालाविठ्ठलभेटे ॥४॥ ॥ भजन ॥ ॥ मारुतिरायाबलभी- मा ॥ शरणआलोंमजद्याप्रेमा ॥ ॥ अभंग ॥ ॥ सुंदरतेंध्यानउभेंविटेवरी ॥ करकटावरीठेवोनियां ॥१॥ मकरकुंडलेंतळपतीश्रवणीं ॥ कंठींकौस्तुभमणि वीराजित ॥२॥ गळांतुळसीहार कासेपीतांबर ॥ आवडेनिरंतरहेंचिध्यान ॥ ३॥ तुकाम्हणेमाझेंहेंचिसर्वसुख ॥ पाहीनश्रीमुखआवडीनें ॥४॥ ॥ भजन ॥ हरिरेरामरामराम ॥ सीतारामरामराम ॥ ॥ अभंग ॥ ॥ एकप्रहररात्रझाली फेरीविठ्ठलाचीआली ॥१॥ नामाम्हणेजनीपाहे ॥ द्वारींउभाकोणआहे ॥२॥ म- भाघरांतदाटली ॥ एकसराईलूटली ॥३॥ पदकवैजयंतीगळां ॥ उभाविठ्ठलसां- वळा ॥४॥ एकमेकांआलिंगन ॥ नामाम्हणेजनीधन्य ॥५॥ ॥ पद ॥ ॥ धावें पावेंबापाविश्वाच्याराया ॥ हरिरेपंढरिच्याराया ॥ तुलावंदूंआम्हींलागूनियांपा यां ॥ धु० ॥ कोठेंगुंतलासीअर्जूनीनायेसी ॥ हरिरेअर्जुनीनायेशी ॥ आम्हांदर्श- नरामाकेंसेनीन देशी ॥ धांवें० ॥१॥ यावेंयावेंसत्वररुक्मिणिच्यारमणा ॥ हरि रेरुक्मिणिच्यार० ॥ द्यावेंद्यावेंदर्शनवनमाळाभरणा ॥ धांवें० ॥२॥ तुजवांचुनिवि- श्वाचानकोणीपाळक ॥ हरिरेनकोणीपा० ॥ सर्वहिअंतर्यामीवससीचाळक ॥ धां वें० ॥३॥ अर्जुनभक्ताविश्वस्वरूपदावुनी ॥ हरिरेस्वरुप० ॥ केलानिर्मळबुद्धीभक्ती- तेंदउनी ॥ धांवें० ॥४॥ उद्धवभक्तादर्शीसुपूर्णबोधातें ॥ हरिरेसुपूर्णबोधातें ॥ केलें

कृष्णानूंविनम्रयशोधातें॥ धांवें०॥५॥ भगिनीकृष्णास्तवनींपावसिलवला
हीं॥हरिरेपावसि०॥ आम्हांभेटीदेतांसंकटसेंकायी॥ धांवें॥६॥ येईयेईवि
ठोकरुणासागरा॥ हरिरेकरुणा०॥ भक्तीसजीवनशिंपींनिजजनआगरा॥
धांवें॥७॥ ध्रुवबाळासीदेवापावसिलवलाही॥ हरिरेपावसि०॥ आम्हींअभ-
क्तम्हणुनीकंटाळाकांहीं॥ धांवें॥८॥ दंतीळाहीसंकटपडतांबहुतफार॥ हरि
रेपड०॥ धांवोनीयांपेशीबापासत्वर॥ धांवें०॥९॥ आम्हीपतीतपावनम्हणती
तुजलागा॥ हरिरेम्हणती०॥ म्हणुनीभजतोंबापामुक्तीच्यालागा॥ धांवें०॥१०
॥नकळेभक्तीकांहींआम्हांपापीयां॥ हरिरेपा०॥ पारत्नवदीनानाथवंदीतोंपायां
धांवें॥११॥ आतांआळसनकरींसत्वरपावावें॥ हरिरेसत्वरपा०॥ देऊनिदर्शनना
थावैकुंठान्यावें॥ धांवें०॥१२॥ जातांवेदब्रम्हाझालाघाबरा॥ हरिरेझालाघा०
॥शफरीहोऊनिविष्णोकेलेंउद्धारा॥ धांवें०॥१३॥ होसीकूर्मसागरमंथनाचेवेळीं
हरिरेमंथना०॥ मंदरबुडालापृष्ठीधारकनेवेळीं॥ धांवें०॥१४॥ अवनीउद्धरणा
ळावराहतूंहोसी॥हरिरेवराह०॥ मारुनिकनकाक्षातेंभक्तांसुखदेसी॥ धांवें
पावें०॥१५॥ प्रल्हादाच्यास्तवनेंनरहरीअवतरसी॥ हरिरेनरहरि०॥ हिरण्यक
शिपूमारुनिअभयप्रदहोसी॥ धांवें०॥१६॥ इंद्राच्याऐश्वर्याबळिदैत्येंघेतां॥
हरिरेबळिदैत्यें०॥ प्रार्थीतुजलाब्रम्हाजोडुनियांहातां॥ धांवें०॥१७॥ वामनरू
पाधरुनिदंडुनिबळिराजा॥ हरिरेदंडुनिब०॥ इंद्रातेंमागुतीकेलादिविराजा॥
धांवें०॥१८॥ परशुरामनामेंव्यक्तीघेऊनी॥ हरिरेव्यक्ती०॥ दशशतकरधरअर्जु
नराजामारूनी॥ धांवेंपावें०॥१९॥ निःक्षत्रीनिर्वैराकेलीत्वांअवनी॥ हरिरे
केली०॥ एकविंशतिवेळाख्यातीहेभुवनीं॥ धांवें०॥२०॥ सुग्रीवालाशरणाग
तसाजाणोनी॥ हरिरेशरणा०॥ दिधलेंराज्यह्निवानरवाळीमारूनी॥ धांवें०
॥२१॥ लंकेशाचानाशवानरांच्याहातीं॥ हरिरेवान०॥ करुनीआपंगीळीवैदेही
सती॥ धांवें०॥२२॥ साधूद्वेषेराक्षसनलगतांक्षणा॥ हरिरेनलगतां०॥ वधु
नीलंकादिधलीभक्ताबिभिषणा॥ धांवें०॥२३॥ कृष्णावतारधरुनीहरिला
भूभार॥ हरिरेहरि०॥ भक्तांदीननाथारक्षीलेंफार॥ धांवेंपावें०॥२४॥ आ-
तांप्रस्तनकाळींकलिकालामाजीं॥ हरिरेकलिका०॥ बौद्धअवतारधरुनीतूं०

भक्तांलाजी ॥ धांवें०॥२५॥ कीर्तनयोगेंसत्वरसांपडसीदेवा ॥ हरिरेसांपड०॥ म्हणुनीगातोंकरितोंतुझीचीसेवा ॥ धांवें०॥२६॥ नकळेगायनभजनभक्तीहि नूमजे॥ हरिरे भक्ति०॥ हरिहरिम्हणोनितुजलाओरडतोंसहजें ॥ धांवें०॥ २७॥ अल्पानेंसंतुष्टभगवंतानूंहोसी॥ हरिरेभ०॥ आम्हांदीनांसत्वरदर्शनमगदेशी ॥ धांवें०॥२८॥ जेसेंतैसेंप्रेमळमानूनीयांघ्यावें ॥ हरिरेप्रेम०॥ आणिकनसुचे कांहींसत्वरापावावें ॥ धांवेंपावें०॥२९॥ नारायणापावेंकरुणेच्यारासी ॥ हरिरेकरु०॥ देउनिभक्तीमोडीपापाच्याराशी ॥ धांवेंपावेंबापाविश्वाच्यारा-या ॥ हरिरेपंढरीच्याराया ॥ तुजलावंदूंआम्हींलागूनियांपायां ॥३२॥ ॥

**पददत्तात्रेयाचें॥** ॥ गुरुदत्तात्रय दत्तात्रयअवधूता जनार्दनस्वामिएक-नाथा ॥ गुरुद०॥ ध्रु०॥ दत्तअवधूत अवधूतनिराकारस्मरणींबावेसत्वर॥ ध्रुवअविनाश॥ अविनाशसुंदरस्वरूपहेंदिसेमनोहर॥ पतितमींपापी ॥पापी दुर्धरनेइतूंभवसिंधूपार॥ मागणेंहेंची ॥ हेंचीसत्वरमस्तकींठेविअभयकर॥ स गुणहेंरूप॥ रूपदाविंआतां॥ जनार्दनस्वामिएकनाथा॥१॥ भस्मभूषित भूषीतदिव्यकांती॥ माळात्रिशूळडमरुहातीं॥ गळांवनमाळा माळारुजय तीकर्णिंकुंडलेंसूर्यदीप्ती ॥ माथांमुगुट मुगुटचंद्रज्योती पाहतांवेधलीमनो वृत्ती॥ आकर्णनयन, नयनमदनमूर्तीवर्णितांस्तब्धवेदश्रुती॥ नेथेंमींपामर, कायवर्णुंआतां॥ जनार्दन०॥२॥ मुख्यनीवास, नीवासमेरुशिखरीं ॥ समाधि निद्रामाहोरीं ॥ स्नानसारिलें॥ सारिलेंगंगातीरीं ॥ टिळकरेखिलापंढरी॥ माध्यान्हींभीक्षा॥ भिक्षाकरवीरीं भोजनकेलेंकावेरी ॥ सायंसंध्या,संध्या सागरीं ; मुख्यआसनकेदारीं॥ जाउनीचरणीं॥ चरणिंठेवुंमाथा जनार्दन ०॥३॥ अत्रिअनुसूयाअनुसुयात्मजदत्त त्रिगुणअवतारमूर्तिमंत ॥ कटिंमेख-ळा, मेखळारत्नजडित॥ चरणिंनूपुरेंरुणझुणित॥ प्रसन्नवदन वदनहर्षयुक्त नारिलेपनितअसंख्यात॥ अखंडहेंनाम नामवदनांत मूर्तिममबिंबोहृद-यांत॥ अभयवरदेई देईगुरुनाथा जनार्दनस्वामीएकनाथा॥४॥ लक्षचौ-ऱ्याशीं चौऱ्याशींजन्मवाया॥ म्यांपयोगिळेगुरूराया॥ भक्तवत्सला वत्स लादत्तरायाकरवीकृपेचीछाया॥ इच्छितोंहेंची हेंचीगुरुसदया न्याहेंमातें

निजठाया॥ कृष्णात्मजातें आत्मजातेंतारिंआतां॥जनार्दनस्वामीएकनाथा ॥गुरुदत्तात्रय दत्तात्रयअवधूता०॥५॥ ॥अभंग॥ ॥हेंनिदानदेगादेवा॥ तूझावीसरनव्हावा॥१॥ गुणगाईनआवडी॥ हेचिमाझीसर्वजोडी॥२॥नलगे-मुक्तिधनसंपदा॥संतसंगमदेगासदा॥३॥तुकाम्हणेगर्भवासीं॥ सुखेंघालावें आम्हासीं॥४॥ ॥अभंग॥ ॥कथेचीसामग्री॥देहअवसानावरी॥१॥नकोजा ऊंदेऊंभंगा॥ गात्रेंमाझींपांडुरंगा॥२॥ आयुष्यमाझेंकरींउन॥ परिमजआवडो कीर्तन॥३॥ तुकाम्हणेहानी॥ यावेगळीमनानाणीं॥४॥ ॥भजन॥ ॥राम रायाराघोबा॥रामारामाहोरामा॥ ॥अभंग॥ ॥आतांदेहतूझेपाईं॥ ठेउनिझालोंऊतराई॥१॥ हरिरेआतांमाझ्याजीवा॥ करणेंतेंकरींदेवा॥२॥ रामावहूअपराधी॥ मतिमंदहीनबुद्धी॥३॥ तुकाम्हणेनेणें॥ भावभक्तीचींलक्ष णें॥४॥ ॥भजन॥ ॥ज्ञानराजमाऊली॥ गुरुज्ञानेश्वरमाऊली॥ ॥अभं ग॥ ॥ सांडियेलीकाया॥वरीओवाळूनीपांयां॥१॥ शरणशरणनारायणा ॥मजअंगीकारींदीना॥२॥भावेंआलोंलोटांगणीं॥ लोळेंतूमच्याचरणीं॥३॥ तुकाम्हणेशिर॥ ठेवियेलेंपायांवर॥४॥ ॥भजन॥ ॥रामदासगुरुमाझे-आई॥मजलाठावद्यावापाईं॥ ॥अभंग॥ ॥झणीदृष्टीलागोतुझियास गुणपणा॥जेणेंमाझ्यामनाबोधकेला॥१॥योगियांचेध्यानींध्यातांनातुळ-सी॥ तोतूंआम्हापासींनिरंतर॥२॥अनंतजन्मींचेंविसरलोंदुःख॥ पहातां-तूझेंमूखपांडुरंगा॥३॥नामाम्हणेजीवेंकरींनिंबलोण॥ विटेसहितचरणवो-वाळीन॥४॥ ॥नमन॥ ॥तवकथामृतंतप्तजीवनं॥ कविभिरीडितंकल्म षापहं॥श्रवणमंगलंश्रीमदाततं॥ भुविगृणंतितेभूरिदाजनाः॥१॥अभंग ॥ करोनीआरती॥चक्रपाणीओंवाळिती॥१॥ आजीपूरलेनवस॥धन्यकाळह दीवस॥२॥पाहापाहाहोसकळ॥पुण्यवंततुम्हींबाळ॥३॥ तुकाबाहेयाळी॥हो कांसन्निधजवळी॥४॥ ॥भजन॥ ॥गोविंदागोपाळारामा॥कृष्णाविं-ष्णोमेघश्यामा॥ ॥अभंग॥ ॥कायमागोंविठ्ठलझरे॥आम्हांतुळसीपत्र पुरे॥१॥मागोंमुगुटमाथ्यांचा॥तोतरआणीलाइंद्राचा॥२॥ मागोंकुंडलेंकानीं चीं॥तीतरआणीलींकर्णाचीं॥३॥ मागोंवैजयंतीमाळा॥तीतरतुमचेवक्षस्थ-

ळा ॥ ४ ॥ मागोंपीतांबरपीवळा ॥ तोतरकासेसीकशियेला ॥ ५ ॥ मागोंनोडर चरणींचा ॥ धाकजाइलअसुरांचा ॥ ६ ॥ नामाम्हणेकांहींनमागों ॥ तुझिपाव रणींलक्षलागो ॥ ७ ॥ ॥ भजन ॥ ॥ गोपाळकृष्णगोपाळ ॥ ॥ अभंग ॥ ॥ येईंगातूंपेईंगातूंपंढरीच्यारापा ॥ तुजवीणशीणवाटेझालीहीनकाया ॥ १ ॥ यातीहीनमतीहीनकर्महीनमाझें ॥ सर्वलज्जासांडुनिबापाशरणमीआलोंतूज ॥ २ ॥ दीनानाथादीनबंधूनामतुम्हांसाजे ॥ पतीतपावननामऐसीब्रीदावळी गाजे ॥ ३ ॥ विटेवरीनीटउभाकरेंबरीकर ॥ तुकाम्हणेहेंचिआम्हांध्याननिरंतर ॥ ४ ॥ ॥ भजन ॥ ॥ रामरामसीतारामरामराम ॥ ॥ इतिदेवाचेंभजनस-मास ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥

---

# अथआरत्याप्रारंभः

## आरतीगणपतीची.

॥ श्रीगणेशायनमः ॥ सुखकर्तादुखहर्तावार्ताविघ्नाची ॥ नुरवीपुरवीप्रेमकृपा जयाची ॥ सर्वांगींसुंदरउटिशेंदूराची ॥ कंठींशोभेमाळमुक्ताफळांची ॥ जयदेव जयदेवजयमंगळमूर्ती ॥ दर्शनमात्रेंमनकामनापुरती ॥ धृ० ॥ १ ॥ रत्नखचितफ रातुजगोरीकुमरा ॥ चंदनाचीउटीकुंकुमकेशरा ॥ हीरेजडितमुकुटशोभतो बरा ॥ रुणझुणतीनेपूरेंचरणींघागरिया ॥ २ ॥ लंबोदरपीतांबरफणिवरबंध ना ॥ सरळसोंडवक्रतुंडत्रिनयना ॥ दासरामाचावाटपाहेसदना ॥ संकष्टींपा वावेंनिर्वाणींरक्षावेंसुरवरवंदना ॥ जयदेवजयदेवजयमंगळमूर्ती० ॥ ३ ॥

## आरतीगणपतीची.

शेंदुरलालचढायोअच्छागजमुखको ॥ दोंदिललालविराजितसुतगौरीहरको ॥ हाथलियेगुडलड्डूसांईसुरवरको ॥ महिमाकहीनजायलागतहूंमपदको ॥ १ ॥ जयजयजीगणराजविद्यासुखदाता ॥ धन्यतुमारोदर्शनमेरामनरमता ॥ धृ० ॥ अष्टोसिद्धीदासीसंकटकोबेरी ॥ विघ्नविनाशनमंगळमूर्तीअधिकारी ॥ कोटी सूरजप्रकाशऐसीछबतेरी ॥ गंडस्थलमदमस्तकशोभेशाशिबहारी ॥ २ ॥ भाव

भगनसंकोईशरणागतआवे ॥ संतनसंपतसबहीभरपूरलपावे ॥ ऐसेतुममहाराजमोकोंअतिभावे ॥ गोसावीनंदननिसिदिनिंगुणगावे ॥३॥ ॥७॥

## आरतीविष्णूची.

आरतीविश्वंभरा ॥ पूर्णसाक्षीओंकारा ॥ सदयनव्यापुनीयां ॥ योगिहृदयमाहेरा ॥ ध्रु० ॥ निर्गुणनिरामया ॥ निर्विकाराअद्वया ॥ सच्चिदानंदरूपा ॥ निरंजनाअव्यया ॥ आर० ॥१॥ अन्वयपळाशारवना ॥ निर्मळाअच्युता ॥ सोज्वळाशुद्धबुद्धा ॥ नित्यसत्यअनंता ॥२॥ ब्रम्हादिदेववंद्या ॥ परमवेदांतवेद्या ॥ अपाररूपतुझें ॥ शंकरासहितआद्या ॥३॥ सहस्त्रमुखिशेषें ॥ वर्णिपेलाविशेषें ॥ नकळेपरिपार ॥ गातीनारदादिघोषें ॥४॥ उद्दालकानापितीर ॥ व्यासभिन्नअवतार ॥ भक्तलोनीधर्मासीतूं ॥ पापिनारियेलेथोर ॥५॥ शरणमीतूजआलों ॥ पायिठेविपेलामाथा ॥ संतोषेंसुतरक्षीं ॥ गुरुविश्वंभरनाथा ॥ आरतीविश्वंभरा० ॥६॥ ॥

## आरतीविष्णूची.

आरतीअनंतभूजा ॥ विठोपंढरीराजा ॥ नचलतीउपचार ॥ मनेंसारिलीपूजा ॥ ध्रु० ॥ परेसपारनाहीं ॥ नपडेनिगमाठाई ॥ भुललाभक्तिभावें ॥ ठाहोयेतलादेहीं ॥१॥ अनिर्वाच्यशुद्धबुद्ध ॥ उभाराहिलानीट ॥ रामाजनार्दनीं ॥ पायींजोडलीवीट ॥२॥

## आरतीरामचंद्राची.

उत्कटसाधुनिशिळासेतूबांधोनी ॥ लिंगदेहलंकापुरिविध्वंसूनी ॥ कामक्रोधादिकराक्षसमर्दोनी ॥ देहअहंकाररावणनिवटोनी ॥ जयदेवजयदेवजयनिजबोधारामा ॥ परमार्थेंआरतीपरिपूर्णकामा ॥ ध्रु० ॥१॥ प्रथमसीताशुद्धीहनुमंतगेला ॥ लंकादहनकरूनीअखयामारीला ॥ मारीलाजंबुमाळीभुवनींत्राहारिला ॥ आनंदाचीगुढीघेउनियांआला ॥२॥ निजबळेंनिजशक्तीसोडविलीसीता ॥ सहजपणेंझालेंअयोध्येरघुनाथा ॥ आनंदेंवोसंडेवैराग्यभरता ॥ आरतपेउनआलीकौसल्यामाता ॥३॥ अनुहतध्वनींगर्जतिअपार ॥ अठरापद्मेंवानरकरितीभुभुःकार ॥ अयोध्येसीआलेदशरथकुमर ॥ नगरींहोताआहेआनंदथोर ॥४॥ सहजसिंहासनींराजारघुवीर ॥ सोहंभावेंतयापूजाउपचार ॥ सहजांचीआरतीवाद्याचागजर ॥ माधवदासास्वामीआठवनाविसर ॥ जयदेवजयदेवजयनिजबोधारामा ॥ परमार्थें० ॥५॥

## आरतीविठ्ठलाची.

यूगेंअठ्ठावीसविटेवरीउभा ॥ वामांगींरखुमाईदिसेदिव्यशोभा ॥ पुंडलिकाचेभे-टीपरब्रम्ह आलेगा ॥ चरणींवाहेभीमाउद्धरीजगा ॥ १ ॥ जयदेवजयदेवजयपांडुरंगा ॥ रखुमाईवल्लभाराईच्यावल्लभापावेंजिवलगा ॥ ध्रु० ॥ तुळसीमाळागळांकरठेवुनिकटीं ॥ कांसेपीतांबरकस्तुरिल्लल्लाटीं ॥ देवसुरवरनित्ययेतीभेटी ॥ गरुडहनूमंतपुढेंउभेराहती ॥ २ ॥ धन्यवेणूनादअनुक्षेत्रपाळा ॥ सुवर्णाचीकमळेंपदमाळागळां ॥ राईरखुमोबाईराणीयासकळां ॥ ओंवाळीतेराधाविठोबासांवळा ॥ ३ ॥ ओंवाळूंआरत्याकुरवंड्यायेती ॥ चंद्रभागेमाजीसोडुनियांदेती ॥ दिंडीपताकावैष्णवनाचती ॥ पंढरीचामहिमावर्णावाकिती ॥ ४ ॥ आषाढीकार्तीकीभक्तजन-येती ॥ चंद्रभागेमाजीस्नानेंजेकरिती ॥ दर्शनहेळामात्रेंतयांहोयमुक्ती ॥ केशवासीनामदेवभावेंओंवाळीती ॥ ४ ॥ जयदेव० ॥ ॥ ॥ ॥

## आरतीदेवीची.

दुर्गेदुर्घटभारीतुजविणसंसारीं ॥ अनाथनाथेअंबेकरुणाविस्तारीं ॥ वारीं-वारींजन्ममरणातेंवारीं ॥ ह्मारींपडलोंआतांसंकटनीवारीं ॥ १ ॥ जयदेवीजयदेवीजयमहिषासुरमथनी ॥ सुरवरईश्वरवरदेतारकसंजिवनी ॥ ध्रु० ॥ त्रिभुवनभुवनींपाहतांतुजऐसीनाहीं ॥ चारीश्रमलेपरंतुनबोलवेकांहीं ॥ साहीविवादकरितांपडिलीप्रवाहीं ॥ तेतूंभक्तांलागीपावसिलवलाहीं ॥ २ ॥ प्रसन्नव-दनेंप्रसन्नहोसीनिजदासां ॥ क्लेशांपासुनिसोडींतोडींभवपाशा ॥ अंबेतुजवां-चूनकोणपुरविलआशा ॥ नरहरितल्हिनझालापदपंकजलेशा ॥ जय० ॥ ३ ॥

## आरतीज्ञानदेवाची.

आरतीज्ञानराजा ॥ महाकैवल्यतेजा ॥ सेवितीसाधुसंत ॥ मनुवेधलामाझा ॥ ध्रु० लोपलेंज्ञानजगीं ॥ हितनेणतीकोणी ॥ अवतारपांडुरंग ॥ नामठेविलेंज्ञानी ॥ १ ॥ कनकाचेंताटकरीं ॥ उभ्यागोपिकानारी ॥ नारदतुंबरहो ॥ सामगायनकरी ॥ २ ॥ प्रकटगुह्यबोले ॥ विश्वब्रम्हचीकेलें ॥ रामाजनार्दनीं ॥ पायींठकचीठे-लें ॥ आरतीज्ञानराजा० ॥ ३ ॥ ॥ ५ ॥ ॥ ५ ॥

## आरतीजगदंबेची.

आश्विनशुद्धपक्षींअंबाबैसलीसिंहासनींहो ॥ प्रतीपदेपासुनी घटस्थापना-
तीकरुनीहो ॥ मूलमंत्रेंजपकरुनीभंवतेरक्षकठेउनीहो ॥ ब्रम्हाविष्णुरुद्रआइचेंपू
जनकरुनीहो ॥ उदोबोलाउदोअंबाबाईमाउलीचाहो ॥ उदोकारेंगर्जतीकायम-
हिमावर्णूतिच्याहो ॥ ध्रु० ॥ १ ॥ द्वितीयेच्येदिवसींमिळतीचोसष्टयोगिनीहो ॥
सकळांमध्येंश्रेष्ठपरशुरामाचीजननीहो ॥ कस्तूरीमळवटभांगींशेंदुरभरुनीहो ॥
उदोकारेंगर्जतीसकळचामुंडामिळुनीहो ॥ उदोबोला० ॥ २ ॥ तृतीयेचेदिवशींअंबेशृं
गारमांडिलाहो ॥ मळवटपातळचोळीकंठींहारमुक्ताफळाहो ॥ कंठींचीपदकेंकां-
सेपीतांबरकसिलाहो ॥ अष्टभुजामिरवतीअंबेसुंदरदिसेलीलाहो ॥ उदोबो० ॥ ३ ॥
चतुर्थीच्यादिवशींविश्वव्यापकजननीहो ॥ उपासकांपाहसीअंबेप्रसन्नअंतःकर-
णींहो ॥ पूर्णकृपेंपाहसीजगन्मातेमनमोहिनीहो ॥ भक्तांच्यामाउलीसुरतेयेती
लोटांगणींहो ॥ उदोबोला० ॥ ४ ॥ पंचमीच्यादिवसींव्रतउपांगललिताहो ॥ अर्घ्य
पाद्यपूजनेंतुजलाभवानीस्तवितीहो ॥ रात्रीच्यासमयींकरितीजागरणहरिक-
थाहो ॥ आनंदेंप्रेमतेंआलें सद्भावेंक्रीडतांहो ॥ उदोबोला० ॥ ५ ॥ षष्ठीचेदिवसीं
भक्तांआनंदवर्तलाहो ॥ घेउनिदिवट्याहस्तींहर्षेंगोंधळघातलाहो ॥ कवडीएक
अर्पितांदेसीहारमुक्ताफळाहो ॥ जोगवामागतांप्रसन्नझालीभक्तकुळाहो ॥
उदोबोला० ॥ ६ ॥ सप्तमीच्यादिवशींसप्तशृंगगडावरीहो ॥ तेथेंतूंनांदसीभं-
वतीपुष्पेंनानापरीहो ॥ जाईजुईसेवंतीपूजारेखिघलीबरीहो ॥ भक्तसंकटींप
डतांझेलुनघेसीवरच्यावरीहो ॥ उदोबोलाउदो० ॥ ७ ॥ अष्टमीच्यादिवशींअ
ष्टभुजानारायणीहो ॥ सह्याद्रीपर्वतींपाहिलीउभीजगज्जननीहो ॥ मनमाझें
मोहिलेंशरणआलोंतुजलागुनीहो ॥ स्तनपानदेउनीकेलेंसुखिअंतःकरणींहो
उदोबोलाउदो० ॥ ८ ॥ नवमीचेदिवसींनवदिवसांचेंपारणेंहो ॥ सप्तशतीजपहोम
हवनेंसद्भक्तीकरुनिहो ॥ षड्रसअन्नेंनैवेद्यासींअर्पिलींभोजनींहो ॥ आचार्यब्रा
म्हणांतृप्तीकेलीत्वांकृपेनेंहने ॥ उदोबोलाउदो० ॥ ९ ॥ दशमीच्यादिवशींनिघे
अंबासीमोल्लंघनींहो ॥ सिंहारूढकरींसबळतीं शस्त्रेंअंबेत्वांघेउनीहो ॥ शुंभ
निशुंभादिकराक्षसांकितीमारसीरणींहो ॥ विप्रारामदासाआश्रयंदिधलानव

चरणींहो ॥ उदोबोलाउदोअंबाबाईमाउलीचाहो ॥१०॥ ॥६७॥ ॥

## आरतीकृष्णाची.

हरिनामगोडझालें ॥ कायसांगुंगेमाते ॥ गोपाळवाहताती ॥ वेणुआरतीपावे ॥ ध्रु० ॥ गेलेंहोतेंवृंदावना ॥ तेथेंभेटलाकान्हा ॥ गोपाळांसींवेधमाझा ॥ छंदलागलामना ॥१॥ आणिकएकनवलकैसें ॥ ब्रम्हादिकांलागिंपीसें ॥ उच्छिष्टालागुनीयां ॥ देवझालेजळींमासे ॥२॥ आणिकएकनवलचोज ॥ गोपाळांसीं सांगेंगूज ॥ आंबवूंजलिचोजवेना ॥ पाहतांनेत्रतेंअसूज ॥३॥ आणिकएकनवलपरी ॥ करिंधरिलीशिदोरी ॥ गोपाळांसींवाटीतसे ॥ नामयाचास्वामीहरी ॥ह०॥४॥

## आरतीतुळसीची.

जयदेवीजयदेवीजयमायतुळसी ॥ निजपत्राहुनिलघुतरत्रिभुवनहेंतुळसी ॥ ध्रु० ॥ ब्रम्हाकेवलमूळींमध्येंतोशौरी ॥ अग्रींशंकरतीर्थेंशाखापरिवारी ॥ सेवा करितीभावेंसकळहिनरनारी ॥ दर्शनमात्रेंपापेंहरतीनिर्धारीं ॥१॥ शीतळछाया भूतळव्यापकतूंकैशी ॥ मंजीरीचीआवडकमळारमणासीं ॥ तवदलविरहित विष्णूराहेउपवासी ॥ विशेषमहिमातूझाशुभकार्तिकमासीं ॥२॥ अच्युतमाधवकेशवपीतांबरधारी ॥ तूझेपूजनकाळींजोहेंउच्चारी ॥ त्यासींदेसीसंतति संपतिसुखकारी ॥ गोसावीसुतविनवीमजलातूंतारीं ॥ जयदेवी० ॥३॥ ॥

## आरतीगणपतीची.

नानापरिमळदुर्वाशेंदुरशमिपत्रें ॥ लाडूमोदकअन्नेंपरिपूरितपात्रें ॥ ऐसेंपूजनकेलेंबीजाक्षरमंत्रें ॥ अष्टौसिद्धीनवनिधिदेसीक्षणमात्रें ॥१॥ जयदेवजयदेवजयमंगळमूर्ती ॥ तूझेगुणवर्णायामजकेंचीस्फूर्ती ॥ ध्रु० ॥ तूझेंध्याननिरंतरजेकोणीकरिती ॥ त्यांचींसकळहिपापेंविघ्नेंहोहरती ॥ वाजीवारणशिबिकासिद्धीहेप्रामी ॥ सर्वहिपावनअंतींभवसागरतरती ॥२॥ शरणागतसर्वस्वेंभजतीतवचरणीं ॥ कीर्तितयाचीराहेशशिजोंवरतरणी ॥ त्रैलोक्यांतांविजयीअद्भुतहेकरणी ॥ गोसावीनंदनतवनामस्मरणीं ॥३॥ जयदेवजयदेव० ॥ ॥

## आरतीकृष्णाची.

अवतारगोकुळींहो ॥ जनतारावयासी ॥ लावण्यरूपडेंहो ॥ तेजःपुंजाळराशी ॥

उगवला कोटि रविबिंब ॥ रविलोपला शशी ॥ उत्साह सुरवरां ॥ महि थोर मानसीं ॥१॥ जयदेवा कृष्णनाथा ॥ राइरखुमाइकांता ॥ आरती ओंवाळीन ॥ तुम्हां देवकीसूता ॥ ध्रु० ॥ कौतुक पहावया ॥ मांव ब्रम्ह्यानें केली ॥ वत्सें हीं चोरुनीयां ॥ सत्यलोका सीनेली ॥ गोपाळ गाइ वत्सें ॥ दोहिंगंई रक्षियेली ॥ सुखाचा प्रेमसिंधू ॥ अनाथाची माउली ॥२॥ चारितां गोधनें हो ॥ इंद्रकोपला भारी ॥ मेघ जो कडाईला ॥ शिळावर्षल्या धारीं ॥ रक्षिलें गोकुळ हो ॥ नखीं धरीला गीरी ॥ निर्भय लोकपाळ ॥ अवतरला हरी ॥३॥ वसुदेव देवकीचे ॥ बंद फोडिली शाळा ॥ होउनियां विश्वजनिता ॥ तयां पोटिंचा बाळ ॥ दैत्य हे त्रासियेले ॥ समुळ कंसासी काळ ॥ राज्य हें उग्रसेना ॥ केला मथुरापाळ ॥४॥ तारिले भक्तजन ॥ दैत्य सर्व निर्दळून ॥ पांडवांसा हाकारी ॥ अडली यानिर्वाण ॥ गुण मी काय वर्णूं ॥ मति केवढी वानी ॥ विनवितो दास तूका ॥ ठाव मागे चरणीं ॥ जयदेव० ॥५॥

## आरती पंचायतनाची.

जयदेव जयदेव जय सुखकर मूर्ती ॥ गणपति शिव हरि भास्कर अंबा सुखमूर्ती ॥ध्रु०॥ अघसंकट भयनाशन सुखदा विघ्नेशा ॥ अघासुर वरं वयानर धारण वेषा ॥ पाशांकुश धर सुंदर पुरवीसी आशा ॥ निज वर देउनि हरिसी भ्रांतीच्या पाशा ॥१॥ नंदीवहना गहना पार्वतिच्या रमणा ॥ मन्मथदहना बाभो वातात्मज नयना ॥ सर्पोपाय विवर्जित तापत्रय शमना ॥ कैलासावर वासा करिते मुनिजन मना ॥२॥ पयसागरजा कांता धरणीधर शयना ॥ करुणालय वारिसि भय वारिज दळनयना ॥ गरुडध्वज भजनप्रिय प्रभु पीतवसना ॥ अनुदिन तव कीर्तन रस चाखो हे रसना ॥३॥ पद्मप्रबोधकरणा नेत्रभ्रमहरणा ॥ गोधन बंधन हर्ता द्योतक आचरणा ॥ कीर्णस्पर्शे वारिसि यातम आवरणा ॥ शरणागत भयनाशन सुखवर्धनकरणा ॥४॥ त्रिभुवन उत्पत्ति पालन करिसी तूं माया ॥ नाहीं तूझ्या स्वरुपीं दुसरी उपमा या ॥ तूझा गुणगण महिमा न कळे निगमा या ॥ करुणा करिसी कुंथां मज विश्रामा या ॥५॥ जयदेव जयदेव जय सुखकर मूर्ती ॥ गणपति० ॥ ॥

## आरती दत्तात्रयाची.

त्रिगुणत्रय मूर्ती दत्त हा जाणा ॥ त्रिभुवनीं अवतार त्रैलोक्य राणा ॥ नेति नेति शब्द

नयेअनुमाना॥अखंडसमाधीध्यानमुनिजना॥१॥जयदेवजयदेवजयजय श्रीदत्ता॥आरतीओंवाळूंहरिंसर्वव्यथा॥ध्रु०॥सबाह्यअभ्यंतरींतूंएकदत्त॥ अभाग्यासींकैसीनकळेहीमात॥पराहीपरतलीतेथेंकैंचाहेत॥जन्ममरणाचा- हीपुरलासेअंत॥२॥दत्तदत्तऐसेंलागलेंध्यान॥हरपलेंमनजाहलेंउन्मन॥मीतूं पणयासींझालीबोळवण॥एकाजनार्दनींश्रीदत्तध्यान॥जयदेवजयदेव०॥३॥

## आरतीमहालक्ष्मीची.

जयदेवीजयदेवीजयमहालक्ष्मी॥वससीकरवीरींतूंविश्वाच्यापक्ष्मी॥ध्रु०॥श्री पतितुझियायोगेंश्रीहरिलानाम॥ब्रम्हादिकहीध्यातीपुरविसीतत्काम॥नि- ष्कामेंजेभजतीपावतिनिजधाम॥योगीध्यानेंपावतिपदआत्माराम॥जयदे वी०॥१॥जपतपसिद्धीतुजविणकांहींसाधेना॥प्रसन्नहोतांभक्तांभवभयबाधेना ॥तुजवांचुनियांअंवेशांतीळाधेना॥वेदांतींचेंसारहिशिष्याबोधेना॥जयदेवी०॥२ गर्जतिनिगमागमपरियाणिलागोप्य॥जेंजेंवर्णितितेंतेंमायेतवरूप॥कोणाक रीमगतुझ्यासगुणत्वामाप॥स्तवितांसहस्त्रवदनेंश्रमलाकींसाप॥जय०॥३॥ दंभेंदर्पेमानेंक्रोधेंजेरहित॥भजतीतवचरणांत्यांसाधेआत्महित॥उद्धरतीतेपा पीपरिवारासहित॥देवीत्यालाकरिसीश्रीपतिसन्निहित॥जयदेवीजय०॥४॥ बाधाभवभीतीचीतवदासांनाहीं॥मायेनकरिसीमोहानंचळतेकांहीं॥हृदयींअ खंडमाझ्यातूंसदयेराहीं॥गोविंदात्मजविप्रास्वकदासींपाहीं॥जयदेवी०॥५॥

## आरतीश्रीमंगळागौरीची.-(स्त्रियांचेपद्धतीचेंचालीवर.)

जयमायमंगळागौरी॥तुजलापूजूंअंतरीं॥नानाविधिउपचारीं॥दीपवोंवाळूं सुंदरी॥ध्रु०॥मंगलागौरीनामतुझें॥तुलानमनअसोमाझें॥भवदुःखाचेंहेंओझें ॥देवीउतरावेंसहजें॥१॥गजाननाचीतूंमाता॥शंकराचीप्रियकांता॥हिमाचला चीतूंदुहिता॥भजतारितारिमाता॥२॥लागेंतुझ्याचरणासी॥जाळिंपापाचि याराशी॥भक्तिठसावीमानसीं॥अंबेन्यावेंपायांपाशीं॥३॥गौरीओंवाळी त्येदीप॥नेणेंतुझेंनामरूप॥वाढवावेंसौभाग्यअमूप॥विश्वाचीतूंमायबापं॥ ४॥रिकामीहीखटपट॥शुद्धमार्गीलावीनीट॥परब्रम्हींघनदाट॥धावीचार खणिंफेरा॥जयमायमंगळागौरी०॥५॥ ॥ ७॥ ॥ ७॥

## श्रीहरितालिकादेवीचीआरती. स्त्रियांनेचालीनें ह्मणावी.

जयदेवीहरितालीके॥ सखिपार्वतीअंबीके॥ आरतीओंवाळीतें॥ ज्ञानदीपककळीके॥ जय०॥ ध्रु०॥ हरअर्धांगीवसशी॥ जाशीयज्ञामाहेराशी॥ तेथेंअपमानपावसी॥ यज्ञकुंडींगुप्तहोसी॥१॥ रिघसीहिमाद्रिच्यापोटीं॥ कन्याहोसीनूंगोमटी॥ उग्रतपश्चर्यामोठी॥ आचरसीउठाउठी॥२॥ तापपंचाग्नीसाधनें॥ धूम्रपानेंअधोवदनें॥ केलिंबहुउपोषणें॥ शंभुभ्रतारकारणें॥३॥ लीलादाखविशीदृष्टी॥ हेंव्रतकरिसीलोकांसाठीं॥ पुन्हावरिसीधूर्जटी॥ मजरक्षावेंसंकटीं॥४॥ कायवर्णूंतवगूण॥ अल्पमतीनारायण॥ मानेदासवींचरण॥ चुकवावें जन्ममरण॥ जयदेवीहरितालीके०॥५॥

## मुरलीधरकृष्णाचीआरती.

बंधूबळरामासहगोकुळिंअवतरसी॥ मारुनिसकळांदुष्टांभूभाराहरिसी॥ गोपवधूसींरासक्रीडाबहुकरिसी॥ आत्मज्ञानाकथुनीत्यांसहिउद्धरिसी॥ जयकृष्णाजयकृष्णाजयजयकंसांता॥ वंशीवादनयोगेंभुलविशिसुरकांता॥१॥ ध्रु०॥ सीमासांडुनिइंद्रें करितांबहुकोप॥ गोवर्धनउचलोनीरक्षिसिगोगोप॥ त्याविसिगोरसरक्षकगोपीलाझोंप॥ सर्वहिचोरुनिभक्षिसिवांटिसीअमूप॥२॥ याजवुनीमुरलीलारमविशिवल्लीला॥ त्यांसहयमुनातीरींदाविसिबहुलीला॥ कंठींघालिसिमोहकसुफुल्लवल्लीला॥ स्कंधींघेउनिनाचसिरुसल्यागोपीला॥३॥ दमविशियमुनाडोहींकालीयासर्पा॥ नाचसिफणिवरथैथैशमविशितदर्पा॥ गोपीचित्तेंहरिसीउपभवुनिकंदर्पा॥ म्हणसीतनुमनधनकृतसर्वहिमजअर्पा॥४॥ नमितोंतवचरणांतेंजननामरणातें॥ नासावेंश्रीकृष्णाआलोंशरणातें॥ काढींदीनदयाळामायावरणातें॥ मजद्यावेंनारायणनामस्मरणातें॥ जय०॥५॥

## आरतीपंढरीनाथाची.

पंचदशीच्येसारींपंडितहीभ्रमले॥ षटमठरवटपरकरितांगुरुशिष्येंश्रमले॥ तवपदिंसुगमींनमलेस्वसुखींतेरमले॥ पंढरिनाथानयनींलक्षुनिविश्रमले॥ जयदेवजयदेवपंढरिच्याराया॥ भ्रूवैकुंठींवससीजगदुद्धाराया॥ ध्रु०॥१॥ ढकलतिचिरडतिपडतीवरडतिभेटाया॥ क्षीरापतिउडवितीकितिवणवतिवेंटाया॥ व

डयेबडविनिदेवाझालारवेराया॥पुनरपिजाणेंखुंटकालाच्याठाया॥२॥रिपु हीचरणींलोळतिसांडुनियांगर्व॥वर्याविर्णोह्मिनेणतिभेदतिसमसर्व॥नाचति अप्सरसागणगातीगंधर्व॥बहुजन्मींच्यापुण्येंसाधेहेंपर्व॥जय०॥३॥ना चावेंसंतांसहगावेंखेळावें॥आनंदेंडोलावेंप्रेमेंलोळावें॥न्हावेंभीमाजळिंमनभज नींघोळावें॥पुंडलिकाभेटावेंनयनपुरेंव्हावें॥४॥जयदे०॥थकलोंयेराझारींब हुविधसंसारीं॥तुजविणश्रमलोंदुःखेंअनुभविलींसारीं॥ध्यानींयावेंविठ्ठल पीतांबरधारी॥नारायणदासाच्याभवनिधिपरपारीं॥जयदेव०॥५॥

## आरतीमारुतीची.

मायाशोधाविषयींतरलासीसमुद्रा॥मध्येंभयंकरिलाकरिसीतच्छिद्रा॥न मुनीश्रीलादेशीदाशरथीमुद्रा॥लंकाजाळुनियेशीएकादशरुद्रा॥जयदेवा जयदेवाजयमारुतिराया॥जगदुद्धारकरायायेसीयाठाया॥धृ०॥१॥रुदनक रीरमतयाबहुसुखिकेला॥सेतूबांधुनीसकपीनेसीलंकेला॥दशवदनादिकम रुनआणिलिसीतेला॥दासबिभीषणालालंकापतिकेला॥२॥जय०॥नौका तींनयअतुलावर्णिलकोणजनीं॥तरलेदुःखसमुद्रींबहुनरतवभजनीं॥सत्व रपावसिऐसेंकथिलेंसेसुजनीं॥तवदर्शनरवियोगेंनिरसेभवरजनी॥जय० ॥३॥राहावेंममतदर्यासदयाकपिराया॥सकलहिआधिव्याधिनिर्मूलकराय ॥मन्मननिस्पृहव्हावेंनिर्मलविचराया॥नजसावित्लंबउदकींलवणासविशय ॥जयदेवा०॥४॥यादेहींयानयनींब्रम्हचिखेळावें॥ज्ञानाग्नीनेंसंचितसर्वहिज ळावें॥क्रियमाणहिबाधेनाऐसेंबाळावें॥नारायणदासातवचरणींपाळावें॥ज० ॥५॥

## विडा.

विडाघ्याहोनारायणा॥कृष्णाजगत्रयजीवना॥विनवितेरखुमाई॥दासीहे ईनमीकान्हा॥विडा०॥१॥वासनाफोडुनीयां॥चूर्णकेलीसुपारी॥भावार्थक पुरानें॥घोळियेलीनिर्धारीं॥विडा०॥२॥शांतिहेनागवेली॥पानेंघेउनीयांकरीं॥ मीपणजाळुनीयां॥चुनालावियेलावरी॥विडा०॥३॥विवेकहाकातरंग॥रंगि रंगलासुरंग॥वैराग्यजायफळ॥मेळविलेंसकळ॥विडा०॥४॥दयाहेजायपत्र ॥क्षमालवंगआणील्या॥शीतळवेलदोडे॥शिवरामीमेळवीले॥विडा०॥५॥स

माइनेंभावें॥त्यकितीहोकेळा॥श्रीकृष्णाघेईविडा॥मनोभावेंठेवियेला॥विडाघ्याहोनारायणा०॥६॥

## शेजारतीचेअभंग.

आतांस्वामीसुखेंनिद्राकरागोपाळा॥पुरलेमनोरथजातोंआपुलाल्यास्थळा॥१॥तुम्हासींजागविलेंआम्हींआपुल्याचाडा॥शुभाशुभकर्मदोषहरावया पीडा॥२॥पावलाप्रसादआतांविठोनीजावेंविठोनीजावें॥आपुलालेंश्रमकळों येतातिभावें॥३॥तुकाम्हणेदीधलेंउच्छिष्टाचेंभोजन॥नाहींनींवडीलेंआम्हां आपणाभिन्न॥४॥हरीचलामंदिराएेशाम्हणतीगोपिका॥भावेंओंवाळूनी यदुकुळटिळका॥५॥एकीकडेराईएकीकडेरखुमाई॥भावेंओंवाळितांहरि- जालादोंठायीं॥६॥अष्टादिकसोळासहस्त्रज्याच्यासुंदरा॥ज्यांनींप्रार्थीला गेलातयांचियाघरा॥७॥एकाजनार्दनींहरितूंलाघवीहोसी॥इतुक्याहीभोगू नब्रम्हचारिम्हणवीसी॥८॥पावलाप्रसादआतां०॥ ॥छ॥ ॥छ॥

## स्तुति.

घालिनलोटांगणवंदीनचरणडोळ्यांनिपाहिनरूपतुझें॥प्रेमेंआलिंगिनआनंदें पूजिनभावेंओंवालिनम्हणेनामा॥त्वमेवमाताचपितात्वमेवत्वमेवबंधूसखात्वमे व॥त्वमेवविद्याद्रविणंत्वमेवत्वमेवसर्वंममदेवदेव॥कायेनवाचामनसेंद्रियेर्वा बुद्ध्यात्मनावाप्रकृतिस्वभावात्॥करोमियद्यत्सकलंपरस्मैनारायणायेति समर्पयामि॥१॥ ॥इतिआरत्यासमाप्त॥ ॥छ॥ ॥

---

# अथपल्लीपतनकारिकाप्रारंभः

मनुष्याच्याआंगावरपाल पतनपावलीअसतां विशेषेंकरून काय फल आहे तें गर्ग, वराह, मांडव्य इत्यादिऋषींनीं जसें सांगितलें आहे त्याप्रमा णेंमीं येथें सांगतोंः-

## पुरुषाचेंफल.

.. मस्तकावर किंवा शेंडीवर पाल पडली असतां सुख प्राप्त होतें.

२.. डाव्या गालावर पडली असतां पितरांचें दर्शन होईल असें जाणावें.
३.. उजव्या गालावर पडली असतां इष्टसंपत्ति मिळेल.
४.. केशबंधाचेठाईं पडली असतां रोग उत्पन्न होईल.
५.. केशांच्या अग्रावर पडली असतां नाश जाणावा.
६.. ताळूवर पडली असतां मरण जाणावें.
७.. कपाळावर पडली असतां लक्ष्मी प्राप्त होते.
८.. भृकुटीवर पडली असतां द्रव्यनाश होतो.
९.. भृकुटीच्या मध्येंच जर पतन पावली तर द्रव्यलाभ जाणावा.
१०.. उजव्या नेत्रावर पडली असतां शुभ जाणावें.
११.. डाव्या नेत्रावर पडली असतां बंधन प्राप्त होतें.
१२.. मुखावर पडली असतां मिष्टान्न भोजन मिळतें.
१३.. नाकावर पडली असतां सौभाग्यप्राप्ति जाणावी.
१४.. नाकाच्या अग्रभागीं पडली असतां दुःख प्राप्त होईल.
१५.. उजव्या कानावर पडली असतां लाभ होतो.
१६.. डाव्या कानावर पडली असतां दुःख प्राप्त होतें.
१७.. गालाच्या मध्यभागीं जर पडली तर जेवण मिळेल.
१८.. मनुष्याच्या खालच्या ओंठावर पडली तर द्रव्य व ऐश्वर्य मिळेल
१९.. वरच्या ओंठावर पडली असतां कलह होईल.
२०.. ओष्ठसंपुटाचेठाईं पडली असतां मरण जाणावें.
२१.. चुबुकावर म्हणजे ओंठाचे खालीं व हनुवटीच्या वर पडली असतां राजाबरोबर द्वेष घडेल असें जाणावें.
२२.. कंठावर पडली असतां मित्राचें आगमन होईल.
२३.. कंठाचे बाहेर पडली असतां शत्रूपासून भय प्राप्त होईल.
२४.. उजव्या खांद्यावर पडली असतां जय प्राप्त होतो.
२५.. डाव्या खांद्यावर पडली असतां पराजय होतो.
२६.. स्तनावर पडली असतां द्रव्यनाश होतो.

२७.. मनगटावर पडली असतां अलंकारप्राप्ति होत्ये.
२८.. हाताच्या पृष्ठभागावर पडली असतां द्रव्याचा नाश जाणावा.
२९.. अंगुलीवर पडली असतां इष्टपदार्थप्राप्ति जाणावी.
३०.. नखावर पडली असतां द्रव्यनाश होतो.
३१.. हस्ताच्या मध्यभागीं पडली असतां महत्सुख प्राप्त होईल.
३२.. पाठीवर पडली असतां आपल्या मित्राची वातमी समजेल.
३३.. दोन्ही कुशीवर पडली असतां बंधूची भेट होईल.
३४.. पोटावर पडली असतां द्रव्यलाभ होईल.
३५.. हृदयाचेठायीं पडली असतां सौख्यवृद्धि होईल.
३६.. पुरुषाच्या स्तनद्वयाचेठाईं पडली तर सौभाग्य प्राप्त होतें.
३७.. उभय कांखांच्याठायीं पतन पावली तर स्त्रियांस सुख प्राप्त होतें.
३८.. डाव्या बाहूवर पडली असतां बहुत क्लेश होतात.
३९.. उजव्या बाहूवर पडली असतां यश प्राप्त होतें.
४०.. डाव्या हातावर पडली असतां आपल्या कुटुंबाशीं कलह होतो.
४१.. डाव्या मनगटावर पतन पावली तर द्रव्यनाश होतो.
४२.. डाव्यां हाताच्या पृष्ठभागावर आणि बोटांवर पडली असतां भूषणा–
४३.. डाव्या हाताच्या नखांवर पडली असतां नाश होईल.
४४.. डाव्या हाताच्या मध्यभागीं पडली असतां धन प्राप्त होईल.
४५.. कमरेवर पडली असतां वस्त्रालंकार प्राप्त होतील.
४६.. नाभीवर पडली असतां जय आणि कीर्ति हीं प्राप्त होतील.
४७.. बंधनाचेठाईं म्हणजे बस्तीवर पडली असतां रोगप्राप्ति जाणावी.
४८.. गुह्यस्थानीं पडली असतां मरण जाणावें.
४९.. मांड्यांवर पडली असतां वस्त्राचा नाश जाणावा.
५०.. जंघेच्याठायीं म्हणजे कमरेच्या पुढच्या बाजूवर पडली असतां द्रव्यनाश होतो.
५१.. गुदस्थानीं पडली असतां रोगाची प्राप्ति जाणावी.

५२.. दोन्ही गुडघ्यांवर पडली असतां बंधन प्राप्त होईल.

५३.. घोट्यावर पडली असतां स्त्रीचा नाश जाणावा.

५४.. जंघांवर म्हणजे दोन्ही गुडघ्यांचे खालीं पायांपर्यंत पडली असतां प्रवास घडेल.

५५.. दोन्ही पायांवर पडली असतां बंधन प्राप्त होईल.

५६.. खूर म्हणजे लक्षणेंकरून जोडलेले पाय यांवर पडली असतां मृत्यु प्राप्त होईल.

५७.. टांचेवर पडली तर सुखप्राप्ति होईल.

५८.. पायांच्या बोटांवर पडली तर पुत्रनाश होईल.

५९.. पायांच्या नखांवर पडली असतां पशू व चाकर यांचा नाश जाणावा.

६०.. पायांच्या तळव्यावर पडली असतां शत्रूचा नाश होईल असा निश्चय शास्त्रांत आहे.

येथपर्यंत जें फळ सांगितलें तें सर्व आपल्यासच प्राप्त होईल असें समजावें.

६१.. शयनावर निजतांना जर पाल पडली तर शुभ फल नाहीं. अशुभ असें जाणावें.

६२.. आसनाचेठाई बसल्यावर जर पाल पडली असें पाहिलें तर कांहीं शुभ व कांहीं अशुभ अशीं दोनही प्रकारचीं फळें जाणावीं.

६३.. आपल्या पात्रावर जें उच्छिष्ट अन्न त्याचेठाई जर पाल पडतांना पाहिली तर बंधूंचें परस्पर सख्य होईल असें जाणावें.

६४.. आपण गमन करीत असतांना जर आपल्या आंगावर पाल पडली तर जें फळ सांगितलें तें फळ आपले शत्रूस होईल असें जाणावें.

६५.. जेवावयाचे अन्नावर पाल पडली असतां तें अन्न टाकून द्यावें. अन्नरहित पात्राचेठाई पडली असतां ती पाल व्याधि, शोक, भय यांतें देणारी असें जाणावें.

६६.. ज्या अग्नीमध्यें स्वयंपाक करावयाचा त्यांत पडेल तर बायको मरेल.

६७.. देवळांत जर पडली तर राजाचा नाश होईल.

६८.. सभेमध्यें पडली तर सभापतीचा नाश होईल.

६९.. अर्ध घराच्या मध्यभागींजर पडेल तर घरधन्याचा नाश होईल.

७०.. दोघांचे मध्यभागींपडेल तर दोघांतजो उत्तमअसेल त्याचा नाशाहो.

७१.. पालींचें परस्पर युद्ध होत असतां जर खालीं पडलेली पाहिली तर सर्व दुःखांचा नाशहोऊन घरांतराहणाऱ्या माणसांस सुख प्राप्त होईल.

७२.. पालीच्या पडण्यानेंजर घरांतला दिवा मालवला गेला तर तें गृह नाश पावतें यास्तव तीन महिनेपर्यंतत्यांत राहूं नये.

७३.. आपले वस्त्रालंकारांवर पाल पडलेली पाहिली तर आपले योग्यतेचा नाश व कलह होईल.

७४.. तलवार वगैरेआयुधांवर पाल पडलीतर आपले हस्तें शत्रूचा नाश होईल.

७५.. आपलीं जीं अश्वादि वाहनें त्यांचेठायीं पडली तर कष्टयुक्त प्रवास घडेल.

७६.. आपल्या जन्म दिवशीं किंवा जन्मनक्षत्रीं, आपल्यास बारावा चंद्र असेल त्या दिवशीं, वैधृत. व्यतीपात. उत्पातदिवस, ग्रहणादिक. यमघंट. मृत्युयोग, दग्धयोग. कालनाडिका. विषनाडी, पापग्रहयुक्त व पापग्रहांचें अवलोकितअसें लग्न इत्यादिककालीं पाल जर चांगल्याठिकाणीं पडली तरजें फल पूर्वीं सांगितलें तें पूर्ण न होतां वाईट फल प्राप्त होईल.

७७.. याच रीतीवरून दुर्निमित्त झालें असतां नाश होतो असें जाणावें. याप्रकारेंकरून कुशलपुरुषांनीं पालीच्या पडण्याचें फल समजावें.

७८.. सरड आंगावर पडला असतां हेंच फल जाणावें. पालीचें पडणें व सरडाचें प्ररोहण हीं दोन्हीनाशार्थ होतात; परंतु विपर्यय असतां शुभ जाणावीं. सरड आंगावर पडून जर चढला तर चढण्याचें फल उत्तम व नुसत्या पडण्याचें फल त्यापेक्षां कमी.

**आरोहण व पतनाचीं लक्षणें.**- तोंड वर करून जर आंगावर चढला तर त्याला आरोहण म्हणावें आणि खालीं तोंड करूनजर उतरला तर त्याला पतन म्हणावें. असें लक्षणयुक्त जर सरडाचें आरोहण किंवा पतन झालें

तर शीघ्र फलप्राप्ति होईल असा निश्चय आहे.

**पालीच्या पडण्याचे दोषास उपाय**- पालीचा स्पर्श झाला असतां ला गलेंच वस्त्रसुद्धां स्नान करावें आणि पंचगव्य प्राशन करून तुपामध्यें मुख पाहावें. अशक्त असो किंवा सशक्त असो. ज्याला कल्याणाची गरज आहे त्याणें अगोदर असें करावें. नंतर पुण्याहवाचन करून शांतिकर्म आचरण करावें.

**पालीच्या शांतीचा प्रकार**- दहा पल सुवर्णाची पालीची प्रतिमा करावी. इतकें सामर्थ्य नसेल तर यथाशक्ति वित्तशाठ्य न करितां सुवर्णाची प्रतिमा करावी. ती प्रतिमा तांबड्या वस्त्रेंकरून वेष्टित करावी. नंतर गंध फुलादिकांनीं तिचें पूजन करावें. मग त्या प्रतिमेपुढें मृत्तिकेचा चांगला घट भरून ठेवावा आणि वस्त्र, पुष्प इहिंकरून तो कलश अलंकृत करून तांदुळांवर स्थापन करावा. त्या घटाचे ठायीं पंचामृत, पंचगव्यें, पंचरत्नें, पांच ताल्ली, पंचपात्री आणि सप्तमृत्तिका टाकाव्या. मग गंध, पुष्प, अक्षता, इत्यादिकेंकरून त्यांच्या त्यांच्या मंत्रांनीं भक्तीकरून लोकपालांची पूजा करावी. नंतर अग्निस्थापना करावी. नंतर मृत्युंजय मंत्रेंकरून चांगल्या खैराच्या समिधांनीं अग्नीचे ठायीं होम करावयास आरंभ करावा. आणि एकाग्रचित्त होऊन व्याहृती म्हणून अष्टोत्तर सहस्र अथवा अष्टोत्तरशत चांगल्या तिळांचा होम करावा. होमसमाप्त झाल्यावर पुण्यकारक वरुणसूक्त, शान्तिसूक्त इहींकरून ब्राम्हणाच्या हस्तें यजमानाच्या मस्तकावर अभिषेक करावा. अशा विधीनें जो शांतिकर्माचें आचरण करितो त्याला आयुष्य, श्री, जय, वृद्धि, यश, आरोग्य हीं प्राप्त होतात.

## स्त्रियांचे आंगावर पाल पडली असतां काय फल तें सांगतो.

१. स्त्रियांच्या मस्तकावर पाल पडली असतां लक्ष्मी प्राप्त होते.
२. ताळूवर पडली असतां मृत्यु देणारी जाणावी.
३. वेणीवर पडली तर रोगप्राप्ति जाणावी.
४. केसांच्या अग्रावर पडली तर मरणप्राप्ति जाणावी.
५. मानेवर पडल्यास नित्य कलह होतो.

६.. कपाळावर पडल्यास द्रव्यनाश.

७.. उजव्या गालावर पडल्यास विधवा होईल.

८.. डाव्या गालावर पाल पडली तर आपल्या प्रियाचें दर्शन होईल.

९.. उजव्या कानावर पडली असतां दीर्घायुषी.

१०.. डाव्या कानावर पडली असतां सुवर्ण अलंकार मिळतील.

११.. उजव्या नेत्रावर पडली तर दुःख.

१२.. डाव्या नेत्रावर पडली असतां पतीचें दर्शन होईल असें शास्त्रप्रमाण आ०

१३.. नाकावर पाल पडली असतां रोगप्राप्ति जाणावी.

१४.. वरच्या ओंठावर पडली असतां कलह होईल.

१५.. खालच्या ओंठावर पडली तर द्रव्य व ऐश्वर्य यांची प्राप्ति होइल.

१६.. ओष्ठसंपुटावर पडली तर नाश जाणावा.

१७.. चुबुक म्हणजे खालच्या ओंठाखालचा व हनुवटीच्या वरचा जो भाग-त्यावर पाल पडली तर कलह होईल.

१८.. तोंडांत जर पडली तर मिष्टान्नभोजन मिळेल.

१९.. कंठावर पडली असतां अलंकार प्राप्त होतील.

२०.. दोन्ही कानांवर पडली असतां सुखसंपत्ती त्वरित प्राप्त होईल.

२१.. पाठीवर पडली असतां बंधूंचा वियोग होईल.

२२.. दोहों कुशींवर पडली तर बंधूंची भेट होईल.

२३.. दोहों खांद्यांवर पडली असतां मणियुक्त अलंकारप्राप्ति जाणावी.

२४.. उजव्या हातावर पडली असतां द्रव्यनाश होईल.

२५.. डाव्या हातावर पडली असतां लाभ होईल.

२६.. उजव्या मनगटावर पडली असतां मनाला संताप व द्रव्याचा नाश होईल.

२७.. डाव्या मनगटावर पडली तर अलंकार प्राप्त होतो.

२८.. दोन्ही हातांच्या मध्यभागीं पडली तर महत्सुख.

२९.. दोन्ही हातांच्या पृष्ठभागीं किंवा बोटांवर पडली तर अलंकारप्राप्त होतो.

३०.. नखांवर पडली असतां नाश होतो.

३१.. दोन्ही स्तनांवर पडली तर बहुत दुःख होईल.

३२.. हृदयाचे ठायीं पडली तर सौख्यवृद्धि होईल.

३३.. कुक्षीचे ठायीं पडली तर सत्पुत्राची प्राप्ति होईल.

३४.. कन्येच्या पोटावर पडली तर लग्न होईल असें जाणावें.

३५.. स्त्रियांचे पोटावर पडली असतां मंगल म्हणजे कांहीं शुभ होईल.

३६.. नाभीवर पडली असतां सत्कीर्तिवृद्धि होईल.

३७.. गुह्यस्थानीं पडली असतां मरणप्राप्ति.

३८.. कमरेवर पडली असतां वस्त्राचा लाभ होईल.

३९.. गुदस्थानीं पडली असतां रोगाचा उपद्रव होईल.

४०.. दोन्ही मांड्यांवर पडली असतां कन्या किंवा पुत्र होईल.

४१.. उभय गुडघ्यांवर पडली असतां बंधनप्राप्ति होईल.

४२.. जंघेवर म्हणजे गुडघ्यांपासून पायांपर्यंत पडली असतां द्रव्याचा नाश हो०

४३.. उभय घोट्यांवर पडली असतां मरण प्राप्त होईल.

४४.. उजव्या पायांवर पडली असतां गांवास जाणें होईल.

४५.. डाव्या पायांवर पडली असतां पुत्र व पुष्कळ द्रव्य प्राप्त होईल.

४६.. पायांच्या नखावर पडली असतां धनप्राप्ति.

याप्रकारेंकरून पालीच्या पडण्याचें व सरडाच्या चढण्याचें फल ऋषींनीं स्त्रियांस सांगितलें आहे.

**अथदिशाफल—** आतां आपल्या आंगावर पाल पडून ती जर पूर्वेकडे जाईल तर ज्याच्या आंगावर पडली असेल त्याचें चिंतिलेलें कार्य सिद्धीस पावेल. आग्नेयीकडे गेली तर अग्नीपासून भय जाणावें. दक्षिणेकडे गेली तर मरणप्राप्ति जाणावी. नैर्ऋत्येकडे गेली तर कलह होईल. पश्चिमेकडे गेली तर द्रव्यलाभ जाणावा. वायव्येकडे गेली तर रोगप्राप्ति. उत्तरेकडे गेली तर कीर्तिलाभ होईल. आणि ईशान्येकडे गेली तर चिंतिलेलें कार्य होईल. हें सांगितलेलें फळ पाल आंगावर पडून गेली तर जाणावें.

**अथतिथिफल—** प्रतिपदेचे दिवशीं पाल आंगावर पडली असतां सर्व-

लोक अनुकूल होतात. द्वितीयेचे दिवशीं पडली असतां त्या पुरुषास राज्य प्राप्त होईल. तृतीयेचे दिवशीं पडली असतां लाभ होईल असें जाणावें. चतुर्थीचे दिवशीं पडली तर रोग प्राप्त होईल असें जाणावें. पंचमी, षष्ठी, सप्तमी या तीन दिवशीं पडली असतां धनप्राप्ति जाणावी. अष्टमी, नवमी, दशमी, ह्या दिवशीं पडली असतां मरण जाणावें. एकादशीचे दिवशीं पाल पडली असतां पुत्रलाभ होईल. द्वादशीचे दिवशीं पडली असतां पुत्र व संपत्ति प्राप्त होईल. त्रयोदशीचे दिवशीं पडली असतां हानि जाणावी. चतुर्दशीचे दिवशीं पडली असतां द्रव्याचा नाश होईल. आणि पौर्णिमा व अमावास्या या दिवशीं पडली असतां बंधुहानि व द्रव्यनाश हीं फलें जाणावीं.

## अथवारफलम्.

सोम, बुध, गुरु, शुक्र या चार वारीं जर पाल पडली तर धनलाभ होतो व रवि, मंगळ, शनि, ह्या वारीं पडली तर द्रव्यनाश होईल असें जाणावें.

## अथनक्षत्रफलम्.

अश्विनीवर पाल पडली असतां आयुष्य आणि आरोग्य प्राप्त होतें. भरणीवर पडली असतां रोगप्राप्ति होते. कृत्तिकावर पडली असतां धनहानि जाणावी. रोहिणी व मृग यांवर पडली असतां संपत्ति प्राप्त होईल. आर्द्रावर पडली असतां मृत्यु प्राप्त होईल. पुनर्वसूवर पडली असतां धनलाभ होईल. पुष्य नक्षत्रावर पडली असतां लाभ. आश्लेषावर पडली असतां मरण. मघा नक्षत्रावर पडली असतां कल्याणप्राप्ति. पूर्वा नक्षत्रावर पडली असतां रोगाधिक्य. उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती ह्या नक्षत्रांवर पडली असतां शुभ. विशाखावर पडली असतां धननाश. अनुराधावर पडली असतां राज्यप्राप्ति. ज्येष्ठावर पडली असतां नाश. मूळावर पडली असतां सुख. पूर्वाषाढावर पडली असतां मृत्यु, उत्तराषाढावर पडली असतां कल्याण. श्रवणावर पडली असतां राज्यप्राप्ति. धनिष्ठावर नाश. शततारकावर पडली असतां सुख. पूर्वा भाद्रपदावर पडली असतां शुभ उत्तरा भाद्रपदावर पडली असतां शुभ. आणि रेवती नक्षत्रावर पाल पडली असतां राज्यप्राप्ति जाणावी.

## अथलग्नफलम्.

बारा लग्नांवर पाल पडली असतां काय फल तें सांगतो. मेष, वृषभ या लग्नांवर पाल पडली असता लाभ जाणावा. मिथुन लग्नावर पडली तर कन्या होईल. कर्क लग्नावर पडली असतां आपला उत्कर्ष होईल. सिंह लग्नावर पडलीतर द्रव्यनाश. तूल, वृश्चिक या लग्नांवर द्रव्यप्राप्ति. धन, मकर या लग्नांवर धनप्राप्ति. कुंभ लग्नावर मोठी हानी. आणि मीन लग्नावर संतोषप्राप्तिजाणावी.

## अथयोगफलम्.

शूल, वज्र, व्यतीपात, व्याघात, परिघ, वैधृति या योगांवर पाल पडली असतां नाश होईल व याशिवाय जे योग त्यांवर पडली असतां शुभ.

## अथकरणफलं.

नाग, चतुष्पाद यांवर पाल पडली असतां शोककारक जाणावी. भद्रावर पडली असतां निश्चयेंकरून मरण जाणावें. व यांशिवाय बाकीच्या करणांवर पडल्यास शुभ दायक जाणावी.

## इतिपल्लीसरठयोः फलकारिका समाप्ता.

---

## अथस्वप्नाध्यायफकीका प्रारंभः

**स्वप्न पडण्याचीवेळ.**- सर्व व्यापारांपासून मन व इंद्रियें स्थिर झाले आणि नाना रूपाचें ज्ञान नाहींसें झालें म्हणजे तें स्वप्न.

हें स्वप्न दोन प्रकारचें.- एक चांगलें व एक वाईट प्रकारचें.- त्यांपैकीं चांगल्याचें सामान्य फल सांगतों.

नदी आणि समुद्र यांतून पोंहून पार जाणें, आकाशांत उडणें, सूर्य उगवला, प्रज्वलित अग्नि, सूर्यादि ग्रह, आश्विन्यादिक नक्षत्रें, ध्रुवादिनारे, चंद्रमं इत्यादि जो मनुष्य स्वप्नावस्थेमध्यें पाहतो त्यास सर्व सिद्धि होईल.

स्वप्नामध्यें मद्य पिणें, आंतडीं व मांस यांचें भक्षण, किडे, विष्ठा, रक्त हीं अंगास लेपन केलेलीं, दहींभात खाणें आणि पांढरें गंध व रत्नाचे अलंकार इत्यादिकांनी पांतलेलें असें जो मनुष्य पाहील तो धन्य होईल.

देव, ब्राम्हण, भारद्वाजादिक श्रेष्ठ पक्षी, कोंबडा, छत्र, कमलपुष्प, राजा व पांढरीं पुष्पें, पांढरें वस्त्र, व स्त्रियांचे जे उत्तम अलंकार तिहींकरून युक्त अशी स्त्री हीं स्वप्नामध्यें जो पाहील व बैल, पर्वत, ओदुंबर, फळें आलेला वृक्ष यांवर चढलेला, आरसा, मांस, पुष्पें हीं मिळालीं आणि पुष्कळ पाण्यांतपोहणें हीं जो मनुष्य स्वप्नामध्यें पाहील त्याला द्रव्य मिळेल व कांहीं रोग असल्यास तो दूर होईल.

आतां स्वप्नाचें साधारण वाईट फल सांगतों.

यज्ञस्तंभ, पळस, वारूळ, कडूनिंब इतक्यांवर चढणें; कापूस, ढोरखंड, पेंड, तेल, यांची प्राप्ति नाशकारक.

क्रीडा करणें, तांबडें वस्त्र धारण करणें, नदी अडवून आणणें, शिजलेलें मांस खाणें हीं सर्व नाशकारक जाणावीं.

दोन प्रकारचें जें स्वप्न सांगितलें त्याच्या पडण्याचे वेळापरत्वें फलाचे भेद सांगतों.

रात्रीच्या ठायीं पहिले प्रहरीं स्वप्न पडलें असतां एक वर्षानें फल, दुसरे प्रहरीं पडलें असतां आठ महिन्यांनीं, तिसरे प्रहरीं पडलें असतां तीन महिन्यांनीं, चवथे प्रहरीं पडलें असतां एक महिन्यानें, अरुणोदयीं पडलें असतां दहा दिवसांनीं, गाई सोडण्याची वेळ म्हणजे सूर्योदयीं पडलें असतां तत्काल याप्रमाणें शुभाशुभ जसें स्वप्न पडेल त्याप्रमाणें जाणावें.

**बहुतकरून शुभस्वप्नें**- जो स्वप्नाचे ठायीं राजा, हत्ती, घोडा, सुवर्ण, बैल, गाई इत्यादिकांतें पाहील त्याचे कुटुंबाची वृद्धि होईल.

जो गाय, बैल, हत्ती, शिवालय, पर्वताग्र, वृक्ष इत्यादिकांवर चढतो आणि विष्ठा आंगास लावलेली, रडणें व मरणें, आणि जी स्त्री प्राप्त न व्हावयाची तिशीं संग करणें, इतकीं स्वप्नाचे ठायीं पाहील तो मनुष्य धन्य.

वटवृक्ष, फळें यांवर एकटाच चढून तेथून जागा होतो त्यास द्रव्यलाभ लवकर होईल.

जो आपला उजवा हात                    नें गिळला असें पाहील त्यास हजारों

रुपयांचा लाभ होईल असें समजावें.

ज्यास सर्प व विंचू पाण्यांत चावले असें दृष्टीस पडेल त्याला जय व सर्व सिद्धि प्राप्त होईल

ज्यास देवालय, राजगृह, पर्वताग्र, यांवर चढणें व समुद्रामध्यें पोहणें असें दृष्टीस पडेल तो जरी शूद्रकुळांतला असला तरी निश्चयेंकरून राजा होईल.

जो नर तळ्यामध्यें तूप व क्षीर हीं फाटल्या खेरीज कमलपत्रांत घेऊन भक्षण करितो तो सार्वभौम राजा होईल.

जो नर स्वप्नामध्यें, मोर, कोंबडा, क्रौंचपक्षी यांतें पाहून जागृत होतो त्यास उत्तम कुळींची व मधुर बोलणारी कन्या भार्या मिळेल.

जो सांखळदंडांनीं बांधला व पुनः दोऱ्यांनीं दंड बांधले अशांतें आपणांस स्वप्नामध्यें पाहील त्याला पुत्र व धन हीं लवकर प्राप्त होतील.

जो बसण्याची गादी व निजण्याचा बिछाना, पालखी, गाडी, शरीर, घर इत्यादिकांतें आग लागलेली पाहून जागा होईल त्याला लक्ष्मी सार्वकाल सन्मुख राहील.

जो स्वप्नामध्यें सूर्यमंडळ व चंद्र यांतें पाहील तो रोगी असल्यास बरा होईल व निरोगी असल्यास धनप्राप्ति होईल.

जो स्वप्नामध्यें रक्तप्राशन करितो तो ब्राम्हण असल्यास विद्यावान् व तदीतरजातीय असल्यास धनप्राप्ति होईल.

ज्यास स्वप्नामध्यें पांढरें वस्त्र व पांढरे वस्त्रेंकरून भूषित गंध धारण केलेल्या स्त्रीनें स्नान घातलें असें जो पाहील त्याला निश्चयें लक्ष्मी प्राप्त होईल. ज्यास खडावा, छत्री, स्वच्छ धारेची तरवार मिळाली असें पाहून जागृत होईल त्याला उत्तमप्रकारचें अन्न मिळेल.

जो बैलाचे गाडींत एकटाच बसून जागा होतो त्यास लवकरच धनप्राप्ति होईल.

ज्यास दहीं मिळालें त्यास धनप्राप्ति, तूप मिळालें असतां यश, तूप भक्षण केलें असतां आरोग्य व दहीं भक्षण केलें असतां निश्चयेंकरून यश मिळेल.

ज्यास शहरामध्यें किंवा घरामध्यें अग्नीनें कोंडलें त्यास घरामध्यें कोंडलें असतां कांहीं गांवचें राज्य व शहरामध्यें कोंडलें असतां पृथ्वीचें राज्य मिळेल.
न्य होईल

स्वप्नाध्याय.

सर्व पांढऱ्या वस्तु स्वप्नामध्यें मिळाल्या किंवा पाहिल्या तर चांगल्या रारवाडी, भात, ताक हीं वाईट फळें देणारीं. व सर्व काळे पदार्थ वाईट; ती, देव, ब्राम्हण हीं उत्तम फळें देणारीं आहेत.

स्वप्नामध्यें फेंसासकट दूध पितो त्यास सोमपान घडेल. व तो स भोग भोगील.

आतां शौनकऋषी वाईट फळ देणारीं स्वप्नें सांगतात.

स्वप्नावेगायीं सूर्य व चंद्र यांना निस्तेज पाहील व अश्विन्यादि नक्षत्रें हेन व ध्रुवादिक तारे यांचें पतन पाहील त्याला मरण किंवा शोक प्राप्त ह

जो स्वप्नाचे शेवटीं अशोक, कण्हेर, पळस, इत्यादि वृक्ष फुललेले त्याला शोक प्राप्त होईल.

जो नावेवर बसून पार जाईल त्याला प्रवास लवकर प्राप्त होईल लवकर होईल.

ज्यास स्वप्नामध्यें तांबडें वस्त्र नेसलेल्याव आरक्तगंध लावलेल्या स्न- नाहूं घातलें तर मृत्यु लवकरच प्राप्त होईल.

ज्याचे शरीरास तेल, तूप, दहीं, दूध आदिकरून स्नेहन पदार्थांनीं म केलें असें पाहील त्याला व्याधि प्राप्त होईल.

ज्याचे स्वप्नांत केंस गळतात त्याचें धन जातें व दांत पडले तर पुत्रनाश होई

जो स्वप्नामध्यें गाढव, उंट, टोणगा यांचे रथावर एकटाच बसून जागा ह त्याला मृत्यु लवकर येईल असें जाणावें.

जो स्वप्नामध्यें नाक, कान, हात, यांचा छेद; चिखलांत बुडणें; दांत. केंस यांचे पतन; शिजलेलें मांस खाणें; गाढव, उंट, टोणगा, यांवर बसणें, तैलाभ्यंग हीं मृत्युप्रद

जो अरुंधती, ध्रुव, विष्णूचीं तीन हीं स्थानें, मातृमंडल देवता यांतें पाहील तो पूर्णश नायु जाणावा. वर देवता सांगितल्या त्या देहामध्यें आहेत. त्या पुढें सांगतो.

आपल्या मुखांत जी जिव्हा ती अरुंधती, नाकाचें अग्र तो ध्रुव, भ्रोगत्रयाचा जो मध्यभाग तो मातृमंडल, हीं स्वप्नांत पाहिलीं तर वरील फल जाणावें.

ज्याचे कानांत बोट घालतें असतां आकाशाचा, गंगेचा शब्द झाला असें ऐकेन

वीं चांदणें दिसत नाहीं त्याचें आयुष्य खपलें असें समजावें.
वीं पावलें स्वप्नांत तुटकीं दिसतील तो ८ महिन्यांचे आंत मृत्यु पावेल.
निरसनार्थ शांति:– दुष्ट स्वप्नांचे निरसनार्थ कालरात्र्यादिक देव
करावें. रात्रिसूक्ताचा जप करावा. होम प्रयत्नें करून रात्रीचे गर्यांकरा-
ायस यांच्या आहुतीनें उक्त विधि म्हणजे स्वशाखोक्त विधि करावा.
सूक्ताच्या ऋचेंकरून प्रत्येक पायसाचें हवन करावें व स्वप्नाची जी काल
ब ा तिच्या नाममंत्रेंकरून अष्टोत्तरशत होम करावा. नंतर स्विष्टकृत होमसं
१ शांतीचा अभिषेक करावा. मग गुरु जो उपाध्याय त्यास शांतिफ
र्थ दक्षिणा, वस्त्र व धेनू द्यावी.
ाचित् दक्षणा देण्याचें व होम करण्याचें सामर्थ्य नसेल तर त्यांनीं
गारं सोनें तत्क्षणीं द्यावें व ब्राम्हणभोजन यथाशक्त्या चांगलें शी-
वेद म्हणणारे-यांस द्यावें. किंवा नानाप्रकारचीं पक्वान्नें, भोजनें च र
ब्राम्हणांस द्यावीं. या विधीकरून जो शांति करील तो शंभर वर्षेपर्यं
तेंकरून मृत्युलोकीं राहील.

## इतिस्वप्नाध्यायसमाप्त.

---

## निद्रारंभीं सर्वविघ्ननिवारणार्थश्लोकपाठमा०

रक्षतुवाराहः स्थलेरक्षतुवामनः ॥ अटव्यान्नारसिंहश्च सर्वतःपातुकेशवः॥
जलेरक्षतुनंदीशः स्थलेरक्षतुभैरवः॥ अटव्यांवीरभद्रश्च सर्वतःपातुशंकरः॥
। कर्कोटकस्यभार्यादाहिनीमोहिनीसती ॥ तासांस्मरणमात्रेणचोरोभ
तिनिष्फलः ॥३॥ अर्जुनःफाल्गुनोजिष्णुःकिरीटीश्वेतवाहनः॥ बीभत्सुर्वि
नयीकृष्णःसव्यसाचीधनंजयः॥४॥ दशनामेंजपतांओगीं ॥ विघ्नेंपळतीबारा
वाटीं ॥ विजयलक्ष्मीवैसेपाठीं ॥ दारिद्र्य दृष्टीं दिसेना ॥५॥ कर्कोटक, कर्कोट
क, कर्कोटक म्हणून त्रिवार टाळी वाजवावी; नंतर आस्तिकाचें स्मरण करावें.

## इतिउपयुक्तकथासंग्रहसमाप्त.

---